श्री

# रामदास आणि रामदासी

## मासिक पुस्तक

श्रीसांप्रदायिक वृत्त, चर्चा, जीर्णोद्धार

वगैरे

खंड तिसरा

( १२७ )

॥ श्रीराम ॥

### श्रीसमर्थसंप्रदायजीर्णोद्धारकार्यांचा जमाखर्च वगैरे

१८५२ वैशाख शु. ४ ( ता. २।५।३० ) पासून

आषाढ शु. १५ ( ता. १०।७।३० ) पर्यंत

| जमा | खर्च |
|---|---|
| ७-९-० श्रीसेवक कृष्णाजी हरि कुळकर्णी विटेकर, यांचे मार्फत | १४१५-२-० स्थापत्यविशारद श्री. वासुदेवराव गोगटे यांच्या खातीं नावें |
| १ गणपत लालचद गुजर | ६-० ता. ३।५।३० |
| १ पा. कृ. दाढेकर | ५००-०-० ता. १४।५।३० |
| १ द. भि. वेलणकर | १०-० ता. ११।६ |
| ४-८-९ किरकोळांनीं | ३६ ४ ता. ११।६ |

१०-०-० V. N. Kalyanpur, २२५-० ता. १६।६
Bangalore, यांचेकडून ३२-६ ,, २१।६
प्रिय व सद्गुणी पुत्र २१०-० ,, २१।६
रामदास याच्या स्मरणार्थ ३५-८ ,, २५।६
चवथा, पांचवा व सहावा ४०-० ,, २७।६
हप्ता, अनुक्रमें ता. ६-० ,, २७।६
८।५।३०, ५।६।३० व २००-० ,, २८।६
५।७।३० ५-० ,, २।७
१-०-० ना. दा. खांडेकर, ३-० ,, ६।७
दादर ६-० ,, ९।७
२-८-० कै. परशुराम यशवंत ७-१० टपालखर्च
पुरोहित, मुंबई (द्वितीया- १४२२-३-० एकूण खर्च
न्दिकांचे दिवशीं स्मरणपूर्वक काढलेले) हस्तें ना. पां. नवरे, मुंबई

५०-०-० अनंत सखाराम वणीकर, अहमदाबाद
१० एप्रिल १० मे ३० इतर

२-०-० गोविंदबुवा रामदासी मु. पावनगड पो. पन्हाळा
७-०-० वासुदेव पुरुषोत्तम साठे, मुलुंद
१-१-० ' अक्षय्यमुपतिष्ठतु ' हस्तें ना. पां. नवरे, मुंबई
२-०-० नागोपंत गो. काजळे, लाहोर
२-०-० नीळकंठ काशीनाथ यत्ते, नागपूर
५-०-० भालचंद्र विष्णु सिधये पोस्ट मास्तर, नेवासे
५-०-० डॉ. शिवराम बळवंत रिसबुड, नेवासे
५-०-० दत्तात्रय त्रिंबक देव, नेवासे
१-०-० नारायण च. राजहंस पेनशनर पोस्टमन, नेवासे
१३-१२-० श्रीसेवक रामचंद्र धोंडो दास्ताने, पुणें, यांचे मार्फत
७ दि. वा. मंगाळे, पा. ह. नातु, ल. वि. तिळवणकर, ग. रं. देशपांडे, आबासाहेब मुजुमदार, रा. धो. जवळे, गोखले ब्रदर्स कॉन्ट्रक्टर्स, प्रत्येकीं १
६८१२ किरकोळींनें
२-०-० प्रभाकर लक्ष्मण वेळकर, पुणें

२-४-० रामचंद्र विष्णु पतकी, अकोले वंजाऱ्याचें, ता. इंदापुर

१००-०-० भवानीशंकर रामचंद्र हेबळे, विले पारले, यानीं मिळविलेल्या मदतीचे पहिले दोन हप्ते ७५+२५. सविस्तर नांवें पुढें देऊं.

३-२-० रा. ब. श्रीधर नारायण साठये, रिटायर्ड सबजज्य, सांगली

१-०-० माणीक विश्वेश्वर नाईक हस्तें भीमदास, किणी

११-०-० श्रीसेवक विष्णु गणेश गाडगीळ, मुंबई याचे मार्फत

५ विनायक बाळकृष्ण देसाई
२ वामन शंकर करंदीकर
१ महादेव कृष्ण भुस्कुटे
३ विष्णु गणेश गाडगीळ

५-०-० कै. चि. रा. परशुराम यशवंत पुरोहित याचे स्मरणार्थ हस्तें वामन यशवत पुरोहित, मुंबई

५-०-० कै. सौ. लक्ष्मीबाई वामन पुरोहित याचे स्मरणार्थ हस्तें वा. य. पुरोहित, मुंबई

५-०-० कै. सौ. अन्नपूर्णाबाई वासुदेव गोखले यांचे स्मरणार्थ हस्तें वासुदेव विठ्ठल गोखले, मुंबई

५-०-० प. विष्णु वा. जोशी व श्री. नारायण गो. तोडेवाले, पेष्कार, कल्लब

२०-०-० श्रीसमर्थकृपाकांक्षी, मुंबई

१-०-० श्रीसमर्थकृपा

२९५-४-० एकूण नवीन जमा

४९०५-१४-८ मागील शिल्लक

५२०१-२-८ एकूण जमा

१४२२-३-० एकूण खर्च वजा

३७७८-१५-८ एकूण शिल्लक, पैकीं

९०-७-२ धुळ्याचे पोस्टल बँकेंत
५००-०-० चाफळ सोसायटींत ठेव
२८४७-४-० सत्कार्योत्तेजक सभेकडे ठेव
३४१-४-६ चिटणीसाजवळ सरती

३७७८-१५-८

आजपर्यंत एकंदर रोख जमा रुपये २५२३१-११-८

टीप-चाफळउंबजपोस्टांतून आलेले १०५ अजून अनामत आहेत.

धुळें
१८५२ आषाढ शु. १५ } शंकर श्रीकृष्ण देव

( १२८ )

श्री

## मनाचे श्लोक, मनोबोध अथवा Auto-Suggestions

( लेखक-वामन दामोदर तळवलकर, पुणें )

( १ )

महाराष्ट्र सारस्वतांत समर्थांनीं तसें च वामन पंडितांनीं 'मनाचे श्लोक' रचिलेले आहेत. मानसशास्त्रदृष्ट्या श्रीसमर्थांनीं जी पद्धति स्वीकारली ती पंडितांच्या श्लोकांत दिसून येत नाहीं, त्यामुळें खालील विवेचन फक्त समर्थांच्या मनाच्या श्लोकांबद्दल केलेलें आहे.

बोध किंवा उपदेश हा नेहेमीं द्वितीय पुरुषीं असावयाचा. स्वतः च स्वतःला बोध करण्याचा प्रयत्न करावा हा प्रथम दर्शनीं च थोडा विचित्र प्रकार वाटतो व प्रथमतः तो प्रत्येकाचे मनास अडखळतो. 'दुसऱ्यास उपदेश करण्याची अपात्रता' असें एक कारण यावर सांगण्यांत येतें. परंतु तें पटण्यासारखें नाहीं. कारण असा दुसऱ्यास उपदेश समर्थांनीं काय केलेला नाहीं ! करितां या मनाच्या उपदेशाचें कारण इतरत्र शोधिलें पाहिजे. अद्वैती तत्त्वज्ञानी देह व आत्मा भिन्न समजतात. सामान्य मनुष्य दोन हि मानतो. देह व आत्मा यांतील भिन्नत्व समजल्यावर आत्मा प्रथम किंवा उत्तम पुरुषीं आणि देह द्वितीय पुरुषीं बोलण्यास पात्र होतो ही गोष्ट कोणाचे हि ध्यानीं येईल. मन हें देहाच्या अवयवापैकीं एक आहे म्हणून तें उपदेशास पात्र होतें. त्यांतून या श्लोकांत अखेर मोक्षोपायाचा विचार व्हावयाचा असल्यामुळें ज्याच्या हातीं मुख्यतः मोक्ष असेल त्यास गांठणें हें ओघासच येतें. आत्मा आणि शरीर यांचें ऐक्य किंवा तादात्म्य मानणें हेंच बंधन आणि तें मानण्याचें सोडून देणें व देहबंधनांतून आत्म्याला सोडणें किंवा आत्म्याला स्वतंत्र मानणें हा च मोक्ष. या बंधमोक्षाची किल्ली मनाजवळ आहे. जणुकाय आत्म्याला या देहरूपी तुरुंगांत अडकविलेलें असून त्या तुरुंगावरचा अधिकारी 'मन' आहे. तेव्हां या

तुरुंगांतून सुटका करून घ्यावयाची असेल तर या अधिकाऱ्याची विनवणी केली पाहिजे किंवा या अधिकाऱ्याजवळ सुटकेचें वारंट=हुकूम आणून दिला पाहिजे. असा हा प्रयत्न म्हणतां येईल. कारण उघड च आहे कीं मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयोः ॥ असें भ. गीता कंठरवानें सांगते. स्वतःस च उपदेश करावयाचा तर ' आत्म्या' स करतां आला असता. परंतु तो स्वयंमुक्त च आहे. तो बुद्धीस करतां आला असता. कारण बुद्धि निश्चय करणारी आहे, व एथें मोक्षोपायांत निश्चयाची अपेक्षा विशेष आहे. पण समर्थांनीं एथें मुळाला च धरलें आहे असें म्हणतां येईल.

पण यानंतर असा एक प्रश्न उद्भवतो कीं मानसशास्त्रज्ञ प्राण्याला अनेक मनें आहेत असें मानतात व प्रतिपादतात. हें खरें असेल तर मनुष्याला किती आहेत आणि त्यापैकीं कोणत्या एकाद्या विशिष्ट मनाला उद्देशून समर्थांनीं हे श्लोक रचले आहेत काय ? आमच्या वाचकांपैकीं बऱ्या च लोकांना अनेक मनांचें हें गौडबंगाल काय आहे याची कल्पना नसेल. त्यांच्या करितां मानसशास्त्रज्ञांच्या या अनेक मनांची मी फोड करणार आहे. परंतु त्यापूर्वी कित्येक वाचकांना दुसरी एक शंका येईल तिचें प्रथमतः निराकरण केलें पाहिजे. ती अशी, कीं अनेक मनांचें हें कोडें समर्थकालीं आणि समर्थांना ज्ञात होतें काय ? का हें अलीकडे च एकोणिसाव्या विसाव्या शतकांत च कोडें उद्भवलें व सुटलें आहे ? अशा वाचकांना हें कळविणें अवश्य वाटतें कीं अनेक मनांची ही कल्पना बिलकुल नवीन नाहीं. ही कल्पना प्राचीन दशोपनिषदांत देखील आहे. मात्र त्यांकडे लोकांचें जितकें लक्ष जावें इतकें गेलेलें नाहीं. मन, चित्त, बुद्धि व अहंकार यांस चित्तचतुष्टय म्हणतात हें बहुतेक वाचकांच्या परिचयाचें आहे. परंतु एका च अंतःकरणाचे हे चार प्रकार आहेत अशी त्यांची समजूत असेल. त्यांकरितां असें सांगणें अवश्य वाटतें कीं या चित्तचतुष्टयाची शारीर स्थानें हि भिन्न आहेत असें शारीर-उपनिषदांत सांगितलें आहे. जर स्थानें हि भिन्न, जर कार्यें हि भिन्न, तर तीं सर्व एक मानण्यांत तात्पर्य काय ? कित्येक उपनिषदांत शुद्ध मन आणि अशुद्ध मन अशीं दोन नावें येतात तर कित्येकांतून स्थूल मन आणि सूक्ष्म मन असे दोन प्रकार वर्णिलेले आढळतात. पण या पेक्षां ' अंतःकरण ' हा शब्द सर्व वाचकांच्या परिचयाचा आहे. मात्र मन आणि अंतःकरण असे भिन्न भिन्न प्रकार असतील काय ही शंका त्यांस उद्भवलेली नाहीं. समर्थ अंतःकरण याचे ऐवजीं ' अंतर ' असा शब्द योजतात ही गोष्ट बऱ्या च वाचकांचे परिचयाची आहे. हा शब्द मनाच्या

श्लोकांत अनेक वेळां आलेला आहे. समर्थ वाङ्मयांत ' उन्मन ' असा दुसरा शब्द येतो. शिवाय ' मन मारणें ' असा हि एक प्रयोग आढळतो, परंतु मनाचें नियमन करणें या अर्थी तो उपयोजिलेला आहे यांत शंका नाहीं. पण ' उन्मन ' म्हणजे काय ? मन पूर्णपणें ताब्यांत आल्यावरची अवस्था ती च उन्मनी अवस्था म्हणून संबोधिली जावे असें वाटत नाहीं. त्यापेक्षां कांहीं तरी जास्त अर्थ त्यांत समाविष्ट आहे. जागृति, स्वप्न, सुषुप्ति आणि तुरीय अशा शरीराच्या चार अवस्था अनेक ठिकाणीं वर्णन केलेल्या आहेत. त्या प्रत्येक अवस्थेंत एक निराळें च मन उदयास येतें अशी कल्पना कित्येकांची दिसून येते ( माण्डूक्योपनिषद पहा ). अर्वाचीन शास्त्रज्ञांनीं Conscious व Subconscious जागृत व जागृतांतरित किंवा स्वप्नस्थ अशी मनाची प्रक्रिया वर्णिलेली आहे. पण या भिन्न नांवावरून किंवा अवस्थांवरून मनें च भिन्न आहेत असें कां मानलें पाहिजे ? त्या केवळ भिन्न अवस्था असूं शकतील असें वाचकांस वाटेल, त्याकरितां मांडूक्योपनिषदांत यांचें स्पष्ट वर्णन आहे तिकडे प्रथम वळूं. समर्थांनीं दशोपनिषदांचा तरी अभ्यास केला होता यांत शंका नाहीं. अर्थात् माण्डूक्योपनिषदांत वर्णिलेल्या गोष्टी समर्थांच्या परिचयाच्या असतील असें समजण्यास कांहीं च हरकत नाहीं. मांण्डूक्योपनिषदांतील आपल्या विषया पुरता महत्वाचा भाग खालीं उतरून घेतला आहे.

सर्वं हि एतद्ब्रह्म, अयमात्मा ब्रह्म, सोऽयमात्मा चतुष्पात् । २
( १ ) जागरितस्थानः बहिष्प्रज्ञः स्थूलभुक् प्रथमः पादः । ३
( २ ) स्वप्नस्थानः अंतःप्रज्ञः...प्रविविक्तभुक् तैजसः द्वितीयः पादः । ४
( ३ ) यत्र सुप्तः न कंचन कामं कामयते ।
न कंचन स्वप्नं पश्यति तत्सुषुप्तम् ।
सुषुप्तस्थाने एकीभूतः प्रज्ञानघनः एव आनन्दमयः हि ।
आनंदभुक् चेतोमुखः प्राज्ञः तृतीयः पादः । ५
एष सर्वेश्वरः एष सर्वज्ञः एषः अन्तर्यामी एष योनिः ।
सर्वस्य प्रभवाप्ययौ हि भूतानाम् । ६
( ४ ) न अंतःप्रज्ञं न बहिष्प्रज्ञं न उभयतः प्रज्ञं ।
न प्रज्ञानघनम् न प्रज्ञं न अप्रज्ञम् ।
अदृष्टम् अव्यवहार्यम् , अलक्षणम् , अचिन्त्यम् ।
अव्यपदेश्यम् एकात्मप्रत्ययसारं प्रपंचोपशमं ।
शांतं शिवं अद्वैतं चतुर्थं मन्यते ।
स आत्मा स विज्ञेयः ॥ ७ ॥

यांतील व्यवहारांत विचारांत घेण्यासारखे पहिले दोन पाद आहेत, एक बहिष्प्रज्ञ व दुसरा अन्तःप्रज्ञ. यांना एथें जरी 'आत्मा' असें म्हटलें आहे तरी वास्तविक ते भिन्न आत्मे नसून तीं भिन्न मनें होत. ही गोष्ट चाणाक्ष वाचकाचे तेव्हां च लक्षांत येईल. एक 'जागरित' स्थितींत प्रत्ययास येतें तर दुसरें 'स्वप्न' स्थितींत प्रत्ययास येतें. एक बहिष्प्रज्ञ आहे तर दुसरें अन्तःप्रज्ञ आहे. एक स्थूलभूक् आहे तर दुसरें तैजस् आहे. अर्थात् हे आत्मे अथवा हीं मनें अगदीं भिन्न स्वरूपाचीं आहेत असें स्पष्टपणें दिसून येतें. एका च मनुष्य प्राण्याचे ठिकाणीं दोन अगर अधिक मनें कशीं असूं शकतील अशी प्रथम दर्शनीं मनुष्यास शंका आल्यावाचून राहात नाहीं. तथापि एका आत्म्याचे दोन पाद म्हटले काय अगर दोन भिन्न मनें म्हटलीं काय एक च. ते भिन्न प्रकार आहेत ही गोष्ट विसरून चालणार नाहीं. याचें आणखी स्पष्टीकरण करूं या.

बहिष्प्रज्ञ मन पंचज्ञानेंद्रियांपासून ज्ञान मिळवितें व बुद्धीन्द्रिय त्याचें पृथक्करण व संयोगीकरण करून किंवा चिकित्सा व विवेचन करून निरनिराळे सिद्धांत बनवितें. मनुष्याच्या या मनानें खरोखरी च अत्यंत मोठी कोणाहाही आश्चर्यचकित करून सोडणारी कामगिरी करून दाखविलेली आहे. जगांत आज जेवढे म्हणून शोध आणि सिद्धान्त प्रस्थापित झाले आहेत ते सर्व या च मानवी मनाचे पराक्रम आहेत. एकोणिसाव्या व विसाव्या शतकांतील 'चमत्कार' हे सर्व या च मानवी मनाचे खेळ आहेत. पंचमहाभूतांवर व सर्व मानवेतर सृष्टीवर मनुष्यानें जी छाप बसविली आहे ती या च मनाचे सामर्थ्याचें जोरावर. तथापि या अत्यंत पराक्रमी व समर्थ मनाला हि समुद्राप्रमाणें मर्यादा आहे. त्याला 'अंतर' ज्ञान होत नाहीं. तें थकतें व निद्रावश होतें व मग त्या मनाचे व्यापार थांबतात. निद्रेंतलें सूक्ष्मज्ञान त्याला मिळत नाहीं. स्वप्नज्ञान हि त्याला पुरतें होत नाहीं व स्मरत नाहीं. 'स्वप्न' ही मुळीं या मनाची क्रिया च नव्हे. जर या च मनाची क्रिया असती तर ती आपल्यास सुरवातीस च समजली असती व सर्व क्रियेचें भान हि राहिलें असतें. पण तसें होत नाहीं. कोणी म्हणतात 'संधी' अवस्थेंत स्वप्न पडतें. म्हणजे पूर्ण निद्रावश होण्यापूर्वी किंवा पूर्ण जागृति प्राप्त होण्या पूर्वी कांहीं वेळ असा असतो कीं ज्या वेळीं स्वप्न पडतें. परंतु अलीकडील शोधावरून ही कल्पना चुकीची ठरली आहे. स्वप्नस्थितींत आत्मा शरीराबाहेर हि जातो अशी हि

कांहीं उपनिषत्कारांची समजूत दिसते. ' झोपीं गेलेल्या मनुष्याला एकदम उठवूं नये ' ही आपली आजची च समजूत आहे असें नाहीं. ती उपनिषत्कालीं हि होती. ' या समजुतींत तथ्य आहे, कारण आत्मा एकादे वेळीं शरीराबाहेर गेलेला असल्यास एकाएकीं उठवल्यानें भलता च प्रकार व्हावयाचा ' असें उपनिषदांत म्हटलें आहे. ही उपनिषत्कारांची समजूत खरी असो या चुकीची असो, त्याशीं तूर्त आपणास कांहीं कर्तव्य नाहीं. कांहीं उपनिषदांतून स्वप्न-विषयक विचार आढळून येतात. पण उपनिषत्कारांनीं स्वप्न कसें पडतें किंवा स्वप्न कोण पाहतो या गोष्टीचा विशेष विचार केलेला नाहीं. वरील मांडूक्यो-पनिषदांत ' बहिष्प्रज्ञ ' आत्मा भिन्न मानला असून त्याजकडे मनुष्याच्या ' जाग्रतावस्थेंत ' सत्ताधिकार असतो असें म्हटलें असून ' स्वप्नस्थिती ' वर अंतःप्रज्ञ अशा वेगळ्या च आत्म्याची म्हणजे मनाची योजना केलेली आहे असें हें उपनिषद म्हणतें. एक स्थूलभुक् आहे तर दुसरें प्रविविक्तभुक् आहे. सारांश दोन हि मनांचे घटकावयव व व्यापार अगदीं भिन्न आहेत असें या उपनिषदांत स्पष्ट म्हटलें आहे. डॉ. गणपुले यांनीं आपल्या मानसोपचारपद्धति व ' मानसोन्नति ' या पुस्तकांत ही प्राचीन परिभाषा ठेवलेली नाहीं. कारण या उपनिषदाचा त्यांनीं विचार च केला नाहीं. त्यांनीं प्रथम अंतर्मन व बहिर्गत मन व नंतर सुटसुटित म्हणून अंतर्मन व बहिर्मन अशी परिभाषा मागाहून योजिली आहे. तरी मांण्डूक्योप-निषदांतील शब्दयोजना अधिक चांगली व अर्थनिष्पादक दिसते. पाश्चि-मात्य ग्रंथकार या अन्तर्मनाला the other mind दुसरें मन असें हि म्हणत असतात. बहिष्प्रज्ञ आत्मा किंवा बहिर्मन हें जाग्रतावस्थेंत असतें त्यावेळीं या दुसऱ्या मनाचे व्यापार दिसून येत नाहींत, त्या वेळीं तें एकप्रकारें लुप्त किंवा सुप्त आहे असें वाटतें, पण मनुष्याच्या निद्रावस्थेंत बहिष्प्रज्ञ मन लय पावलें म्हणजे अन्तर्मनाचे व्यापार सुरु होतात असें दिसून येतें व म्हणून त्यास ' जाग्रदंतरित ' ( Subconscious ) असें पाश्चिमात्य म्हणतात. वास्तविक तें अन्तर्मन सदोदित च जाग्रत असतें व त्याचे ठराविक व्यापार सारखे चालू च असतात. त्या मनाकडे सोंपविलेलें एक काम म्हणजे सर्व गोष्टींची यथावत् ' नोंद ' ठेवणें. या नोंदीच्या दृष्टीनें या मनाला ' चित्रगुप्त ' मन असें म्हणतां येईल. फोनोग्राफ् यंत्र ज्याप्रमाणें, असतील त्या बऱ्यावाईट हलक्या मोठ्या सर्व आवाजांची नोंद ठेवतें,

फोटोग्राफ ज्याप्रमाणें असेल त्या वस्तु—स्थितीचें चित्र काढतें त्याचप्रमाणें हें ' चित्रगुप्ती मन ' असेल ती वस्तुस्थिति नोंदून ठेवतें. एक क्षणभर कां होईना तुमच्या बहिर्मनांत आलेली गोष्ट हें मन, नोंदून ठेवल्या खेरीज राहात नाहीं. इतर शेकडो व्यापारांत गुंतलेलें बहिष्प्रज्ञ मन ती गोष्ट चट्कन विसरून हि जातें. परंतु या अंतःप्रज्ञ मनाचे पटावर त्या गोष्टीची एकदा नोंद झाली कीं ती वज्रलेप झाली! ही नोंद प्रसंगोपात् बहिष्प्रज्ञ मनाचे विशिष्ट कारणानें किंवा प्रसंगानें स्मरणांत येते किंवा मरण-काळीं या सर्व नोंदींचा एक चित्रपट बनून तो मनश्चक्षूंसमोर उघडला जात असतो. निदान अशा पाण्यांत बुडत असतां मोठ्या मुष्किलीनें जिवंत होणारांचा अनुभव कित्येकांनीं आपल्या पुस्तकांतून लिहून ठेवलेला आहे. अर्थात् यास वर जें ' चित्रगुप्ती मन ' अशी मी संज्ञा दिली आहे, ती अगदीं यथार्थ आहे. आपल्या शरीरांत च हा सदोदित जागृत असलेला चित्रगुप्त ठेवण्यांत आलेला असून तो मरणकाळीं आपली नोंद प्राण्याच्या पुढील आयुष्याच्या निश्चितार्थाकरितां प्राण्यापुढें सिनेमातील चित्रपटाप्रमाणें उकलून दाखवीत असतो ही गोष्ट मनुष्यास अगाऊ समजेल व मनुष्याच्या मनावर बिंबेल तर किती तरी फायदा होईल बरें! कोणती हि वाईट गोष्ट करण्यास प्रवृत्त होण्यापूर्वी तो दहादां विचार करील! यमधर्म चित्रगुप्ताच्या नोंदींचा विचार करून मनुष्यास त्याच्या कर्माचीं फळें देत असतो ही पुराणग्रंथांतून सांगितलेली गोष्ट यथार्थ असेल असें आजकाल फार च थोड्यांस वाटतें. अश्रद्धाळु मनुष्य अशा पौराणिक गोष्टींस भोळे-पणाच्या किंवा खुळेपणाच्या सदरात काढीत असला तरी त्या गोष्टी सत्य आहेत असें मरणप्राय स्थितीस जाऊन पोंचलेल्या वरील माणसाचा अनुभव आपल्यास स्पष्टपणें सांगत आहे. ही चित्रगुप्ती नोंद ही एक च गोष्ट झाली तरी हि तें सामान्य मनापेक्षां भिन्न मनाचें कार्य आहे ही गोष्ट विचारी मनुष्याचें लक्षांत आल्यावाचून राहणार नाहीं. अशा या चित्रगुप्ती नोंदी शिवाय आणखी हि अनेक कार्यें हें मन करीत असतें कीं जीं कार्यें बहिष्प्रज्ञ मनास करतां च येत नाहींत. उदाहरणार्थ एकादें विशेष अवघड उदाहरण करीत असतां मनुष्य व त्याचें मन अगदीं थकून व कंटाळून जातें. तें उदा-हरण सोडविण्याची त्याची उत्सुकता किती हि जोरदार असली तरी त्या क्षणीं तरी ती गोष्ट त्या थकलेल्या मनास अशक्य होऊन जाते! तो निजतो. पण

केव्हां केव्हां असें दिसून येतें कीं काहीं वेळानें तो उठतो तों तें उदाहरण 'सुटलें' अशा भावनेंत उठतो, तो दिवा लावतो व तें उदाहरण सोडवून फिरून निजतो. सकाळीं फिरून उठतो तों तें उदाहरण सोडविलेलें पाहून विस्मय हि पावतो व थोड्या वेळानें ते आकडे स्वहस्ताक्षराचे पाहून त्याला स्मरण होतें कीं रात्रीं आपण च उठून हें उदाहरण सोडविलें हि! ही कथा किंवा कादंबरी नसून वस्तुस्थिति आहे विद्वानाना या गोष्टीचा अनुभव आहे. या कथेंतील मुद्याची गोष्ट अशी कीं रात्रीं उठून सोडविलेलें उदाहरण लिहीत असताना त्या मनुष्याचे मनोव्यापार, रात्रीं थवून निजण्यापूर्वीचे नसून सोडविलेलें उदाहरण जणुकाय तयार च झालेलें आहे अशा स्थितीचे दर्शक असतात. थवून निद्रेनें आक्रमण केलेल्या पण पहाटे शांत असलेल्या मनाचें हें कार्य नसून दुसऱ्या कोणाचे तरी आहे हें खास. अशा तऱ्हेच्या अनेक अनुभवामुळें शास्त्रज्ञांनीं असा सिद्धांत प्रस्थापित केला आहे कीं बहिष्प्रज्ञ मन आणि अंतःप्रज्ञ मन हीं एका च मनाचीं भिन्नभिन्न अवस्थेंतील स्वरूपें नसून परस्परभिन्न स्वरूपाचीं तीं दोन भिन्नभिन्न मनें आहेत व म्हणून च शास्त्रज्ञ त्याला दुसरें किंवा सुप्त मन म्हणून संबोधित असतात. स्वप्नाचें खातें या च दुसऱ्या मनाकडे सोंपविलेलें आहे प्रत्येक मनुष्यास स्वप्नाचा अनुभव असतो. तथापि तो त्याविषयीं क्वचित च विचार करतो! जाग्रतावस्थेंत रचित बसलेल्या कादंबरीप्रमाणें निद्रावस्थेंत आपण एकादी कादंबरी रचित असतो काय? स्वप्न पडण्यापूर्वीं आपण काहीं विचार करीत नसतों हें खास. स्वप्नांतील क्रिया जाग्रतावस्थेंतील क्रियांच्या सदृश असतात तशा च अगदीं विसदृशहि असतात. या सदृश किंवा विसदृश क्रिया कोण घडवितो? त्यामध्यें क्वचित् विचाराची सांखळी असते व क्वचित् नसते हि. पण स्वप्न पडण्यापूर्वीचे मनोव्यापार सहसा आपल्यास ज्ञात होत नाहींत. ज्याना स्पर्शजन्य स्वप्नें म्हणतात त्यांत किंवा शरीराच्या विकृतावस्थेच्या दर्शक अशीं स्वप्नें पडतात त्यांत ही क्रिया अनुमानानें ज्ञात होण्याचा संभव असतो. उदाहरणार्थ मनुष्याला भूक लागलेली असता त्याला आपण खात आहोंत असें स्वप्न पडण्याचा संभव असतो किंवा मूत्राशय भरलेलें असता आपण सारखा लघवी करीत आहोंत असें स्वप्न पडतें. ही केवळ आपण लघवीस उठावें अशी सूचना असते. कारण प्रत्यक्ष लघवी झालेली प्रत्ययास येत नाहीं. पण ही सूचना येते कोणाला व देते कोण? निद्रित मनुष्याच्या मनांत ही चलबिचल

केव्हां सुरु झाली व कोणी उत्पन्न केली ? हें समजत नाहीं. एक मन निद्रित असतांना दुसरें एक ' द्वितीय मन ' जागृत असून आपले मनोव्यापार चालू ठेविते ही गोष्ट कबूल केल्यावांचून एथें सद्रत उरत नाहीं. जागृतावस्थेत अशक्य वाटत असलेल्या गोष्टी स्वप्नरियतींत घडत असतात असा हि प्रत्यय येतो. ' मनीं वसे तें स्वप्नीं दिसे ' अशी म्हण आहे. पण जागृत मनांत सदोदित खेळत असलेली गोष्ट स्वप्नांत दृष्टीस पडते च असा नियम नाहीं किंवा जागृतावस्थेत मनांत मुळीं च घोळत नसलेली गोष्ट हि स्वप्नांत दिसूं शकते असा पुष्कळांचा अनुभव आहे. याहिपेक्षां आश्चर्यकारक म्हणजे जागृतावस्थेत च कित्येकांना दिसत असलेलीं स्वप्नदृश्य दृश्यें. परंतु हा अनुभव फार च थोड्यांस असतो. म्हणून त्याचें वर्णन करण्याचा उपयोग नाहीं. परंतु त्याची थोडक्यांत कल्पना आणून द्यावयाची तर असें म्हणतां येईल कीं बाहिष्प्रज्ञ मनाचे व्यापार कांहीं तरी चालू असतां एकदम नजरे समोर कांहीं तरी अगदीं निराळें च दृश्य दिसूं लागतें, अचूक कांहीं शब्द ऐकूं येतात वगैरे. ज्यांना या गोष्टींचा अनुभव आहे त्यांना ' बुद्धीहून पलीकडच्या ' अशा या अनुभवांमुळें एका नवीन सृष्टीची कल्पना येते. परंतु इतरांना ही केवळ कादंबरी किंवा स्तोम वाटण्याचा संभव असल्यामुळें या जागृतीच्या स्वप्नांचा विचार करण्याचें सोडून देऊं. निद्रावस्थेतील स्वप्नांचा विचार करील त्यास हि वरील अनुमान काढतां येईल.

> या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी ।
> यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः ॥ भ. गीता २-६९

या श्लोकाचा अर्थ वेगळा आहे हें गीताभ्यासी जाणतात च. पण वरील दृष्टीनें विचार केला तर या श्लोकाचा शाब्दिक अर्थ ही खरा आहे असें वाटूं लागतें. जी प्राणीमात्रांची निशा ती मनःसंयमन करणाराला जागृतावस्थेसारखी अनुभवास येते. अर्थात् ज्या बाबतींत सामान्य मनुष्य घोरत राहतो त्या बाबतींत संयमी जागृत असतो असा एथें अर्थ आहे. परंतु असा हि अर्थ होण्यासारखा आहे कीं सामान्य मनुष्याचें जें मन सुप्त असतें तें संयम्याचें जागृत असतें व त्याचे व्यापार संयम्यास समजूं शकतात आणि सामान्य मनुष्याचें जें जागृत मन असतें तें या अन्तर्दृष्टि मुनीचें सुप्त असतें म्हणजे तिकडे या संयम्याचें च लक्ष नसतें. या श्लोकांत ' मन ' हा शब्द नाहीं, तथापि संदर्भानें तो घेतां येईल. तथापि या श्लोकांत हा अर्थ अभिप्रेत होत नाहीं असें कोणी म्हणाले

तरी त्याशीं आमचा वाद नाहीं. असो. मानसशास्त्रांत व मांडूक्योपनिषदांत अनेक मनांचें जें विवरण केलें आहे त्याचा येथवर थोडक्यांत आढावा घेऊन दोन मनांची एथवर सिद्धि किंवा थोडक्यांत समजूत करण्याचा प्रयत्न केला आहे. हड्सन् यानें हीं दोन मनें भिन्न समजून त्यांचे भिन्नभिन्न गुण एकत्र तौलनिक पद्धतीनें दाखविण्याचा प्रयत्न केला आहे. त्याचा सारांश एथें आतां उतरून घेतल्यास वाचकांना समजूं शकेल.

| बहिःप्रज्ञ मन Objective mind | अंतःप्रज्ञ मन Subjective mind |
| --- | --- |
| ( १ ) हें सूचनावर्ति असलें तरी चिकित्सक असतें | ( १ ) हें सूचनावर्ति असतेंच पण चिकित्सक नसतें. |
| ( २ ) यांतील विचार Inductive विगमन व Deductive निगमन पद्धतीनें चालतो | ( २ ) यांतील विचार केवळ Deductive प्रगमन पद्धतीनें चालतो बहिःप्रज्ञ मनाच्या विरुद्ध विचार हि हें ग्रहण करतें. |
| ( ३ ) साराසारविचारग्रहणशील. भलते विचार सोडून देण्याची पात्रता. | ( ३ ) एकांडीपणाच्या विचाराप्रमाणें क्रिया करतांना वाटेल ती अखेरची मजल गांठण्याचें सामर्थ्य असतें. |
| ( ४ ) विस्मरणशील | ( ४ ) चित्रगुप्त अखंड स्मरणशील |
| ( ५ ) अंशतः भावनात्मक. विचारप्रबलत्व | ( ५ ) विशेषतः भावनात्मक, श्रद्धावान् |
| ( ६ ) जडवस्तु शरीरानें मात्र ग्रहण करते. | ( ६ ) शरीरस्पर्शाशिवाय वस्तुग्रहण सामर्थ्य असतें. |
| ( ७ ) शरीरशक्तीच्या प्रमाणांत क्रियाशक्ति | ( ७ ) शरीरसामर्थ्याचे उलट प्रमाणांत क्रियाशक्ति. मरणोत्तर अत्यंत |
| ( ८ ) ज्ञानेंद्रियतः ज्ञानप्राप्ति | ( ८ ) अतींद्रियज्ञानसामर्थ्य |
| ( ९ ) उपजत बुद्धीचा सामान्यतः अभाव | ( ९ ) मनोव्यापारायांचून सृष्टिनियमांचें निश्चयात्मक ज्ञान प्राप्त होण्याची शक्यता |

परस्परविरुद्ध अशा या गुणांमुळें किंवा अवगुणांमुळें या दोन मनांना एकाचे मनाचे दोन विभाग समजणें अयुक्त नव्हे काय !

या परस्परभिन्नगुणांपैकीं भावनात्मकता, श्रद्धा, अतींद्रियज्ञानसामर्थ्य व शरीरसामर्थ्याच्या प्रमाणाविरुद्ध क्रियाशक्ति या गुणांकडे वाचकानें विशेषतः लक्ष द्यावें. परस्परभिन्न गुणामुळें हीं मनें भिन्न असलीं तरी या दोन हि मनांच्या गुणांचा विकास करून मनुष्याला दैवी शक्ति प्राप्त करून घेतां येतें व अंतःप्रज्ञ मनाचे अवगुण टाकतां येतात असा शास्त्रज्ञांचा समज आहे हें हि एथें लक्षांत ठेवलें पाहिजे. मात्र मनुष्यानें स्थिरबुद्धि किंवा स्थितप्रज्ञ झाल्याखेरीज ही गोष्ट साधूं शकत नाहीं, असा हि त्याचा सिद्धांत आहे. स्थितप्रज्ञता म्हणजे काय हें एथें विशेष विवरण करून सांगण्याची अवश्यकता नाहीं. भगवद्गीतेच्या दुसऱ्या अध्यायाच्या शेवटीं याचें भगवंतमुखानें स्पष्ट विवरण करण्यांत आलेलें आहे. तें वाचकांनीं पहावें. त्यांतील कांहीं श्लोक वा श्लोकापाद मात्र एथें उतरून घेतों.

> प्रजहाति सदा कामान् सर्वान् पार्थ मनोगतान्
> आत्मन्येव आत्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते ॥ २-५५
> दुःखेषु अनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः ।
> वीतरागभयक्रोधः................ ॥ ५६ ॥
> यदा संहरते चायं कूर्मोंगानीव सर्वशः ।
> इन्द्रियाणि इन्द्रियार्थेभ्य. ............ ॥ ५८ ॥
> वशे हि यस्य इन्द्रियाणि............ ॥ ६१ ॥
> संगात्संजायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते ॥ ६२ ॥
> क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः ॥
> स्मृतिभ्रंशात् बुद्धिनाशः बुद्धिनाशात् प्रणश्यति ॥ ६३ ॥

या अवतरणावरून वाचकाचे ध्यानीं येईल कीं कामक्रोधमोहांचा व अखेर नाशाचा अत्यंत निकट संबंध आहे आणि याचे उलट

> विहाय कामान्यः सर्वान् पुमांश्चरति निःस्पृहः ॥
> निर्ममो निरहंकारः स शांतिं अधिगच्छति ॥ २-७१ ॥

व्यक्तिविषयक कामनांना रजा देऊन निर्भय व सर्वभूतहितकर झाल्यानें मनुष्याला अत्युच्चस्थिति किंवा देवत्व आणि त्यां हि पलीकडचे परमात्मत्व प्राप्त होतें. *सारांश षड्विकारांतून सुटका, सुखदुःखाविषयीं बेफिकिरी, शिवाय* सदाचार, श्रद्धा, हरिनामाचें किंवा अहंब्रह्मास्मि याचें अखंड सेवन, इतक्या गोष्टी प्राप्त करून घेतल्या असतां मुक्ति प्राप्त होते.

## ( २ )

एथवर मानसशास्त्राचें व भगवद्गीतेचें जें थोडेसें अवलोकन केलें त्याचा व समर्थांच्या मनाच्या श्लोकाचा संबंध काय हें पुढें दाखवावयाचें आहे. प्रस्तुत विषयाशीं संबंध दाखविल्याखेरीज मूळचा संकल्प सिद्धीस जाणार नाहीं. मानसशास्त्राचा अभ्यास आपल्यात अद्याप अत्यंत अल्प असल्यामुळें त्या संबंधींचें थोडेसें दिग्दर्शन अजून हि करणें अवश्य वाटतें.

समर्थांनीं मानसशास्त्राचा अभ्यास केला होता काय ! असा प्रश्न आम्हास कोणी काढतील. त्यावर इतकें च उत्तर देता येईल कीं त्याचा उपनिषदांचा व योगवासिष्ठाचा अभ्यास होता. शिवाय ते ' निर्मम निरहंकार ' हि झालेले होते. अर्थात् मानसशास्त्रातील नियम समजण्याची व अनुभवण्याची त्याचे ठिकाणीं पात्रता होती. समर्थांनीं मनाचे २०५ श्लोक रचले आहेत. त्या श्लोकांच्या शेवटीं त्यांनीं या श्लोकाची फलश्रुति दोन प्रकारानें सांगितलेली आहे, तिचा प्रथमतः विचार करूं. ती फलश्रुति अशीः

> मनाचीं शतें ऐकतां दोष जाती ।
> मतीमंद ते साधना योग्य होती ।
> चढे ज्ञान वैराग्य सामर्थ्य अंगीं ।
> म्हणे दास विश्वासतां मुक्ति भोगी ।

या श्लोकाच्या श्रवणानें दोष जातात आणि मतिमंद हि साधक बनतो. पण जो श्रद्धापूर्वक यातील अर्थावर विश्वास ठेवील व त्याप्रमाणें आचरण ठेवील त्याचें ज्ञान, वैराग्य, सामर्थ्य वाढून तो प्रत्यक्ष मुक्ति भोगील, यातील ' विश्वास ' म्हणजे ' श्रद्धा ' हा दुसऱ्या किंवा अंतःप्रज्ञमनाचा गुण व विषय आहे ही गोष्ट वाचकाचे लक्षात अयेल च. अर्थात् हे श्लोक कोणत्या मनाला उद्देशून लिहिले आहेत याचा सहजीं च उलगडा होतो. गीतेंत हि या श्रद्धेला अनुलक्षून कांहीं विशेष विचार प्रगट केलेले आहेत. ते मानसशास्त्राचे व विशेषतः या अंतःप्रज्ञ मनासंबंधीं सिद्धांत आहेत. विशेषतः गीतेंतील खालील दोन उद्गार ध्यानात ठेवण्यासारखे आहेत.

श्रद्धामयोऽयं पुरुष , यो यच्छ्रद्ध स एव सः ॥ भ. गी. १७.३

पुरुष श्रद्धामय आहे. जशी ज्याची श्रद्धा तसा च तो होतो. श्रद्धेमुळें मनुष्यास तादात्म्य प्राप्त होतें. ' अहं ब्रह्मास्मि ' यावर श्रद्धापूर्व विश्वसून त्याचें

संतत चिंतन केल्यास मनुष्य मद्रूप होऊन जातो. जपाचें हि असें च सामर्थ्य आहे व म्हणून च भगवान्

यज्ञानां जपयज्ञोऽस्मि । गीता १०.२५

असें म्हणतात. फार काय सांगावें ?

श्रद्धाविरहितं यज्ञं तामसं परिचक्षते ॥ १७.१३

श्रद्धाविरहित यज्ञ तामस अर्थात् व्यर्थ. त्याचा कांहीं च उपयोग नाहीं. यज्ञाचें सर्वस्व श्रद्धेंत आहे ही गोष्ट भगवंतांनीं जाणून च यज्ञांतला मी जप यज्ञ असें म्हटलें आहे. एरवीं मी वाजपेय किंवा अश्वमेध यज्ञ किंवा ज्ञानयज्ञ असें त्यांनीं म्हटलें असतें. या गोष्टीकडे गीताभाष्यकारांचें जावें तसें लक्ष गेलेलें दिसत नाहीं. भगवंतांनीं यज्ञानां ज्ञानयज्ञोऽस्मि असें न म्हणतां यज्ञानां जपयज्ञोऽस्मि असें कां म्हटलें हें सांगण्याची कोणी तसदी घेतलेली नाहीं. तसें च श्रद्धाविरहित यज्ञ निष्फल कां हें हि कोणी सांगितलें नाहीं.

योगिनां अपि सर्वेषां मद्गतेन अंतरात्मना ।

श्रद्धावान् भजते यो मां स मे युक्ततमो मतः ॥ भ. गीता. ६-४७

भगवंतांनीं या ठिकाणीं 'माझ्या ठिकाणीं 'अंतरात्मा' तल्लीन होऊन जो श्रद्धेनें माझी उपासना करतो तो सर्व योग्यांत ' युक्ततम' असें मी समजतो' असें म्हटलें आहे. *

या श्लोकांतील ' अंतरात्मा ' शब्द विशेषतः लक्षांत ठेवण्यासारखा आहे. सर्व भाष्यकार अंतरात्मा म्हणजे अंतःकरण असा अर्थ देऊन स्वस्थ बसतात. अंतरात्मा म्हणजे अंतःप्रज्ञ श्रद्धावान् मन असा अर्थ मानसशास्त्रदृष्ट्या करणें च उचित होय. कारण श्रद्धा हा ह्या मनाचा विषय आहे. ध्यान, भक्ति

---

* याचें उलट

अश्रद्दधानाः पुरुषा धर्मस्य अस्य परंतप ।

अप्राप्य मां निवर्तंते मृत्युसंसारवर्त्मनि ॥ भ. गीता ९-३

आणि

श्रद्धावान् अनसूयश्च शृणुयात् अपि यो नरः ।

सोऽपि मुक्तः शुभान् लोकान् प्राप्नुयात् पुण्यकर्मणाम् ॥ १८-७१

यावरून अशी स्थिति प्राप्त होण्यास श्रद्धेचें सहाय्य किती असतें याची कल्पना होते. भगवंतांनीं श्रद्धेनें केवळ ऐकणारा मनुष्य हि उत्तम लोकांप्रत जातो आणि श्रद्धा नसलेला मनुष्य संसारचक्रांत फिरत रहातो असें दोन हि प्रकारानें श्रद्धेचें महत्त्व वर्णन केलें आहे.

हे विषय ही या ' द्वितीय ' म्हणजे आंतर मनाचेच होत, अर्थात् एथील ' अंतरात्मा ' शब्द सहेतुक घातलेला आहे यांत शंका वाटत नाहीं. भगवद्गीतेच्या सहाव्या अध्यायांत विशेषतः पातंजल योगाचा संबंध असून बाह्य शरीर आणि इंद्रियें यांना सर्वस्वीं कबजांत आणून ( समर्थांच्या भाषेंत मन मारून ) '

यदा विनियतं चित्तं आत्मन्येव अवतिष्ठते ।
निःस्पृहः सर्वकामेभ्यो ' युक्त ' इत्युच्यते तदा ॥ १८ ॥
यत्रोपरमते चित्तं निरुद्धं योगसेवया ।
यत्र चैव आत्मनात्मानं पश्यन् आत्मनि तुष्यति ॥ २० ॥
सुखं आत्यंतिकं यत्तत् बुद्धिग्राह्यं अतीन्द्रियम् ।
वेत्ति यत्र न चैव अयं स्थितः चलति तत्त्वतः ॥ २१ ॥
यं लब्ध्वा च अपरं लाभं मन्यते न अधिकं ततः ।
यस्मिन्स्थितः न दुःखेन गुरुणापि विचाल्यते ॥ २२ ॥
संकल्पप्रभवान्कामान् त्यक्त्वा सर्वान् अशेषतः ।
मनसैव इन्द्रियग्रामं विनियम्य समंततः ॥ २४ ॥
शनैः शनैः उपरमेत् बुद्ध्या धृतिगृहीतया ।
आत्मसंस्थं मनः कृत्वा न किंचिदपि चिन्तयेत् ॥ २५ ॥
प्रशांतमनसं ह्येनं योगिनं सुखमुत्तमम् ।
उपैति शांतरजसं ब्रह्मभूतं अकल्मषम् ॥ २७ ॥

आत्म्यानें च आत्म्याला पहावयाचें असतें. तो या वेळीं स्वतःचे ठिकाणीं अत्यंत संतुष्ट असतो व बुद्धिग्राह्य पण अतींद्रिय असें सुख अनुभवितो. दुःखाचे डोंगर कोसळले तरी तो डगमगत नाहीं. म्हणून सर्व कामना सोडून इंद्रियांना ताब्यांत आणून मन शांत करावें आणि यत्किंचित् हि चिंतन करूं नये. * असें केलें असतां पुढें त्याला अत्यंत सुख प्राप्त होतें व अखेर

ब्रह्मसंस्पर्शं अत्यंतं सुखं अश्नुते ॥ २८

ब्रह्मप्राप्ति होते. पुढें आत्मौपम्य दृष्टि प्राप्त होते, असें

सर्वभूतस्थं आत्मानं सर्वभूतानि चात्मनि ।
ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शिनः ॥ ६-२९

---

* मन मारणें व मन आंवरणें या वाक्यांचे अर्थ वास्तविक भिन्न वाटतात. मन हें संकल्पविकल्पात्मक आहे. तेव्हां पूर्ण संकल्पनाश होईल तेव्हां च त्याला ' मारणें ' ही संज्ञा लागू पडेल, तो पर्यंतच्या क्रियेला आंवरणें हा शब्द लावतां येईल. चिंतन च बंद होईल तेव्हां त्या स्थितींत मन मारणें व पुढील स्थितीस उन्मनी अवस्था म्हणावें असें वाटतें.

या २९ व्या श्लोकांत सांगितलें आहे. वरील श्लोकापैकीं २० व्या श्लोकांत सांगितलें आहे कीं हा योगी 'आत्म्यानें च आत्म्याला पहातो' व अतीन्द्रिय-सुख अनुभवितो. वरील मांण्डुक्योपनिषदांतील मनांचा विचार करतां ही एकंदर वर्णन केलेली स्थिति आत्म्याच्या तृतीय पादाची दिसते. तो तृतीय पाद असा:

यत्र सुप्तः न कंचन कामं कामयते न कंचन स्वप्नं पश्यति तत्सुषुप्तम्। सुषुप्तस्थाने एकीभूतः प्रज्ञानघन. एव आनंदमयः हि आनंदभुक् चेतोमुखः प्राज्ञ· तृतीयः पादः॥ एष सर्वेश्वरः एष· सर्वज्ञः एष. अंतर्यामी एषः योनिः सर्वस्य प्रभवाप्ययौ हि भूतानाम्॥

या सर्व उतार्‍यांचें तात्पर्य इतकें च 'द्वितीय' मनापलिकडें च एक तृतीय मन आहे. हें तृतीय मन हें च बंधमोक्षाचें द्वार आहे. द्वितीय मनावाटे तृतीय मनांत जाण्याची वाट आहे. त्यांतील मुख्य मुख्य पावलें अशीं:

(१) सर्व कामक्रोधादिकांचा क्षय; वासनांचा क्षय
(२) चित्तस्थिरता, 'न किंचिदपि चिंतयेत्', चिंतननाश
(३) आत्मनि आत्मानं पश्यति तुष्यति च।
(४) अतीन्द्रिय सुखप्राप्ति-ब्रह्मप्राप्ति

बहिःप्रज्ञ मनाच्या दृष्टीनें पाहिल्यास या सर्व अशक्य गोष्टी होत! हें बहिःप्रज्ञ मन म्हणजे च संकल्पविकल्पात्मक मन. या मनाचे सर्व व्यापार सर्वस्वीं बंद केल्याखेरीज अंतःप्रज्ञ मनाचे व्यापार उमगत नाहींत. याला च चित्तक्षय, 'मन मारणें' किंवा मनाची 'वृत्तिशून्यता' करणें किंवा समर्थांचे भाषेंत 'उन्मन' होणें असें म्हणतात. सामान्य मनाला अशक्य वाटणार्‍या या गोष्टी सत्य, अनुभविलेल्या व अनुभव घेण्यासारख्या आहेत. पण प्रथम दर्शनीं च 'अशक्यतेचा शिक्का' मारून स्वस्थ बसेल त्याला यांचा अनुभव कसा येणार! म्हणून प्रथम श्रद्धा पाहिजे. श्रद्धा ठेवून अल्प धारिष्टानें प्रयत्न सुरु केला म्हणजे हळूहळू अनुभव येऊं लागतो व अशक्य वाटणारी गोष्ट शक्य कोटींत येऊं पाहते. वास्तविक भगवद्गीतेंत सांगितल्याप्रमाणें आही स्थिति ही बुद्धिग्राह्य पण अतीन्द्रिय आहे. (६-२१) पण केवळ ज्ञानेन्द्रियाच्या द्वारानें सर्वज्ञान व अनुभव मिळविणाराला हें अतीन्द्रिय सुख कसें प्राप्त होणार! अतीन्द्रिय सुख मिळविण्याकरिता बाह्य ज्ञानेंद्रियांपलीकडचें एखादें ज्ञानद्वार शोधून काढलें पाहिजे. तें ज्ञानेन्द्रिय म्हणजेच हें 'अंतःप्रज्ञ' मन होय. जोंपर्यंत बहिःप्रज्ञ मनाचे व्यापार चालू आहेत तोंपर्यंत या

अंतःप्रज्ञ मनाशीं आपला कोणताहि व्यवहार सुरु होत नाहीं. म्हणून प्रथम बहिर्जगाशीं सर्व व्यवहार पूर्णपणें बंद करून झोपेसमान स्थिति उत्पन्न करावी तेव्हांच या अंतर्जगाशीं आपला संबंध येऊं शकणार हें जाणून मनुष्यानें त्या मार्गाला लागले पाहिजे. अंतःप्रज्ञ मन ही अशक्य वाटणारी गोष्ट, श्रद्धा असेल तर, करूं शकतें म्हणून समर्थ म्हणतात

म्हणे दास विश्वासतां मुक्ति भोगी ॥ २०५

'विश्वासतां' हें रूप च, प्रथम दर्शनीं, विश्वासाची अशक्यता दर्शविते. हड्सनच्या मताप्रमाणें बहिःप्रज्ञ मनाच्या कला विरुद्ध किंवा विचाराविरुद्ध हि हें अंतःप्रज्ञमन सूचना ग्रहण करूं शकते. ही सूचना, त्या मानानें, श्रद्धापूर्वक एकदां ग्रहण केली म्हणजे त्या सूचनांतर्गत विचाराची अगदीं अखेरची कड पोंचावेण्याचें सामर्थ्य त्या मनांत असतें. ही अखेरची कड म्हणजे च तृतीय मनांत प्रवेश. परंतु या सर्व सूचना ग्रहण कशाच्या जोरावर करणार ? बुद्धीच्या आणि विचाराच्या तर खास नव्हे. अर्थात् श्रद्धेच्या जोरावर. मात्र श्रद्धेच्या जोरावर सुरु करून कड पोंचविलेल्या मनुष्यांचा असा अनुभव आहे कीं यांत आपल्याला ब्रह्मप्राप्ति—अतींद्रिय सुखप्राप्ति-कीं ज्या सुखा-पुढें दुःखाचे डोंगर कोसळले तरी मन डगमगत नाहीं अशी स्थिति प्राप्त होते. सारांश सर्व उपायांचा श्रीगणेशा

श्रद्धा आणि तद्धारक अंतर्मन

यांत आहे. आणि मनाचे श्लोक या बहिःप्रज्ञ मनास उद्देशून नसून अंतःप्रज्ञ मनास उद्देशून आहेत. बहिःप्रज्ञ मन हा उपदेश प्रथमतः घेण्यास अगदीं च अपात्र आहे. आजच्या मानस शास्त्राच्या दृष्टीनें मनाचे श्लोक म्हणजे

Auto suggestions स्वयंसूचना

होत. मनाचे श्लोक भक्तिमार्गाचा उपदेश करतात असें समर्थ दुसऱ्या च श्लोकांत सांगतात.हा भक्तिमार्ग Path of devotion, sentiment असा आहे,आणि हडसनच्या मताप्रमाणें तो अंतःप्रज्ञावन्ताचाच 'स्वतंत्र मुलुख' आहे. भक्ति-मार्गमोक्षप्राप्तीच्या दृष्टीनें ज्ञानमार्गापेक्षा सुलभ आहे असें सर्व कबूल करतात. हें या दोन मनांच्या दृष्टीनें हि सत्य आहे. ज्ञानमार्ग हा बहिर्मनाचा मुलुख असून भक्तिमार्ग हा अंतर्मनाचा प्रांत आहे; व तो श्रद्धेवर अवलंबून आहे. तसा ज्ञानमार्ग केवळ श्रद्धेवर अवलंबून नाहीं. भक्तिमार्गांतील सुलभता या श्रद्धेमुळें च येते. ज्ञानमार्गांत अशक्य वाटणारी गोष्ट प्रथमदर्शनीं

ग्रहण करणें व निगमनतर्क पद्धतीनें निघतील ते सिद्धांत तसें च श्रद्धेनें सत्य मानून चालणें व त्यांशीं तादात्म्य मानणें यामुळें हि सुलभता उत्पन्न होते. या हि दृष्टीनें पाहिलें तरी मनोबोध हा दुसऱ्या मनास उद्देशून आहे हें सिद्ध होतें.

मना सज्जना भक्तिपंथें चि जावें।
तरी श्रीहरि पाविजेतो स्वभावें ॥ २ ॥

या श्लोकांतील ' सज्जना ' हें पद ' गौरवार्थ, ' ' ओंजारून गोंजारून वळविण्याकरितां ' आहे असें कांहीं लोक समजतात. वास्तविक तसा अर्थ नव्हे. आतांपर्यंत केलेल्या विवेचनावरून दिसून येईल कीं मन बहिर्विषया-पासून पूर्णपणें अलिप्त केल्याखेरीज अंतरंगीचें मनाशीं हितगुज करतां येत नाहीं. तसेंच त्या मनाला सत्, सदाचारसंपन्न, निर्विषय, निर्विकार केल्याखेरीज तशी अलिप्तता येत नाहीं व त्याशिवाय ब्रह्मप्राप्ति अथवा श्रीहरिप्राप्ति होऊं शकणार नाहीं. पुढील श्लोकांतून-याच २ ऱ्या श्लोकाच्या दुसऱ्या अर्धापासून व ' सज्जना ' या पदाचें समर्थ विवरण करीत आहेत. मनास खरोखरीच 'सज्जन' बनविण्याचा समर्थांचा हेतु आहे. यांत ' गौरवार्थ ' असें बिलकुल कांहीं नाहीं. इन्द्रियाणां मनश्चास्मि । मन ही माझी विभूति आहे असें भगवान् म्हणतात. अर्थात् असन्मन हे भगवद्रूपी किंवा भगवंतांची विभूति नव्हे. धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ असें हि भगवान् म्हणतात. अर्थात् धर्माविरुद्ध व धर्म-विरुद्ध काम असे कामाचे दोन प्रकार झाले. केवळ ' धर्मविरुद्ध काम ' हा सामान्य मनाचा गुणधर्म आहे, नव्हे ? अर्थात् ' इन्द्रियाणां मनः ' अशें म्हणतांना ' शुद्ध सज्जन मन ' असाच अर्थ ग्रहण करणें भाग आहे. मन एव मनुष्याणां कारणं बंधमोक्षयोः । यावरून हि मनाचे दोन प्रकार होतात. एक दैवी किंवा मोक्षप्रवण शुद्ध मन आणि दुसरें आसुरी किंवा पाशवी किंवा बंध-प्रवण मन होय. मन शुद्ध म्हणजे सदाचारसंपन्न निर्विषय निर्विकार झाल्या-खेरीज तें मोक्षप्रवण होऊं शकत नाहीं. अशा दृष्टीनें मनाचे दोन मार्ग होतात.

दैवी अ. मोक्षप्रवण ( मन ) बंधप्रवण अ. पाशवी

असें हि म्हणतां येईल कीं मनुष्य हा ज्या पाशवी योनींतून विकास पावला आहे त्या योनींचें पाशवी मन प्रथमतः त्याचे जवळ असतें. परंतु त्यावर शुद्ध विचारांचा जसजसा संस्कार होत जाईल तसतसें तें दैवी होऊं पहातें. वास्तविक केवळ पाशवी मनापेक्षां सामान्य मानवी मनाचे ठिकाणीं हि पुष्कळ च विकास झालेला आहे आणि या मानवी मनापासून दैवी मन हें

फार दूर आहे. अर्थात्

पाशवी मन मानवी मन दैवी मन

असे तीन प्रकार होतात. असें म्हणतात कीं ज्या भिन्नभिन्न योनींतून मनुष्याचें शरीर विकास पावलें आहे त्या त्या योनींचे अवशेष मानवी शरीरांत आढळतात. त्या च दृष्टीनें असें हि म्हणतां येईल कीं ज्या ज्या अवस्थांतून मानवी मन विकसित झालें आहे त्या अवस्थांचे अवशेष अथवा अंश मानवी मनांत असले पाहिजेत. आणखी असा हि तर्क धावतो कीं ज्या दैवी अवस्थेपर्यंत मनुष्याचा विकास व्हावयाचा त्या दैवी अवस्थेला योग्य अशा मनाचा अंश हि त्याचे ठिकाणीं असला च पाहिजे. या दैवी मनाचा अंश म्हणजे च हें अंतः प्रज्ञ मन होय. प्रत्यक्ष दैवी मन म्हणजे वरील मांडुक्य उपनिषदांत सांगितलेलें तिसरें 'प्रज्ञानघन, आनंदमय, प्राज्ञ, सर्वेश्वर, सर्वज्ञ' असें विभूतिरूप मन. या अन्तःप्रज्ञ मनाच्या द्वारें च ही मोक्ष-प्राप्ति व्हावयाची म्हणून सर्व मनोबोध या अंतःप्रज्ञ किंवा अंतर मनाला उद्देशून असतो. पाश्चिमात्य शास्त्रज्ञ या अंतर्मनाला कमी दर्जाचें समजतात. परंतु मला वाटतें कीं अंतर्मनाचे वर लिहिल्याप्रमाणें दोन प्रकार संभवतात: एक पाशवी व दुसरें दैवी. पैकीं दैवी मनाचा अंश विकसित करण्याचा हा प्रयत्न आहे. बहिर्मन सुप्त झालें म्हणजे अंतर्मनाचे व्यापार चालू होतात, म्हणून या मनाला ते Subconscious जागरितांतरित मन असें हि म्हणतात. परंतु हें मन तर सदैव जागृत व कार्यव्याप्त असतें. त्याचा व्यापार आपल्यास किंचिदंशानें स्वप्नस्थितींत प्रतीत होतो. इतर वेळीं तो प्रतीत होत नाहीं इतकें च. बहिर्व्यापारापासून पूर्णपणें अलिप्त झाल्या खेरीज सहसा ही स्थिति प्राप्त होत नाहीं. बहिर्व्यापारापासून पूर्णपणें अलिप्त कसें व्हावयाचें हा च मोठा व अवघड प्रश्न आहे. अर्थात् बहिर्व्यापाराचें मूळ शोधून काढलें पाहिजे. या बहिर्व्यापाराचें मूळ प्रकृति आणि तिचे त्रिगुणात्मक धर्म यांमध्यें आहे.

> न तदस्ति पृथिव्यां वा दिवि देवेषु वा पुनः ।
> सत्त्वं प्रकृतिजैर्मुक्तं यदेभिः स्यात्त्रिभिर्गुणैः ॥ १८-४०
> सत्त्वं रजस्तम इति गुणाः प्रकृतिसंभवाः ।
> निबध्नंति महा बाहो देहे देहिनमव्ययम् ॥ १४-५
> नान्यं गुणेभ्यः कर्तारं यदा द्रष्टानुपश्यति
> गुणेभ्यश्च परं वेत्ति मद्भावं सोऽधिगच्छति ॥ १४-१९

भगवान् म्हणतात: त्रैलोक्यांत असें सत्त्व नाहीं कीं जे गुणां पासून मुक्त आहे.

हे त्रिगुण च आत्म्याला बंधत्व आणतात. यचावत् सर्व कर्म हें या गुणांमुळें उत्पन्न होतें, अर्थात् गुण हे च कर्ते होत. गुणांवांचून दुसरा कोणी कर्ता नाहीं असें मनुष्यास कळूं लागलें आणि गुणापलीकडे कोण आहे हें त्यास समजूं लागलें म्हणजे तो माझ्या स्वरूपाला प्राप्त होतो. यावरून दैवी मनाची प्राप्ति होण्याचा अनुक्रमार्ग आपल्यास सांपडतो. बहिर्व्यापाराचें किंवा अखिल कर्माचें मूळ प्रकृति आणि तिचे गुण ही गोष्ट प्रथम स्पष्ट समजली पाहिजे. कर्म हें कामनेमुळें उद्भवतें असें प्रत्येकास समजतें. पण या कामना प्रकृतीच्या, आपल्या नव्हत, ही गोष्ट कोणास सहसा कळत नाहीं. कामना आपल्या च असें प्रकृतीशीं तादात्म्य पावल्यामुळें सामान्यतः प्रत्येक जण मानतो. प्रकृति जशी सजीवाच्या ठिकाणीं आहे तशी निर्जीव द्रव्याचे ठिकाणीं हि आहे. जीवाला जसे काम क्रोध हे विकार आहेत तसें च निर्जीव असें ज्यास आपण समजतों त्यांचे ठिकाणीं हि कामक्रोध आहेत असें रसायनशास्त्र सांगतात. त्याला ते Chemical affinity & repulsion रासायनिक स्नेहाकर्षकता व अपकर्षकता असें म्हणतात. सारांश कांहीं शास्त्रज्ञ निर्जीव मानलेले पदार्थांना atoms किंवा कण यांना हल्लीं या कारणानें च सजीव मानूं लागले आहेत व सजीव सृष्टींतील चारहि खाणींतील सर्व जीवांना, जे विकार सामान्य आहेत, त्यांना प्राकृतिक च मानले पाहिजेत. असे हे प्राकृतिक विकार व तदुत्पन्न कर्में हीं सर्व प्राकृतिक च मानली म्हणजे, मनुष्य या कर्माशीं आपलें तादात्म्य मानीत नाहींसा होतो. भगवान् कंठरवानें सांगतात कीं कर्में आपलीं असें मानणारे ' ते सर्व मूर्ख ' ! पहा:

> प्रकृतेः क्रियमाणानि गुणैः कर्माणि सर्वशः ।
> अहंकारविमूढात्मा कर्ताऽहमिति मन्यते ॥ भ. ३-२७
> तत्त्ववित्तु महाबाहो गुणकर्मविभागयोः ।
> गुणा गुणेषु वर्तन्त इति मत्वा न सज्जते ॥ ३-२८
> प्रकृतेर्गुणसंमूढाः सज्जन्ते गुणकर्मसु ॥ ३-२९

मनुष्याच्या अखिल कर्माचें किंवा बहिर्व्यापारांचें मूळ या तादात्म्याच्या मानीव कल्पनेंत आहे. तथापि या मानीव कल्पनेचा संस्कार इतका जबरदस्त आहे कीं मनुष्याला ही मानीव कल्पना सहसा सोडवत अगर सुटत नाहीं. पण एक मात्र वाटतें कीं ही मानीव कल्पना सोडली कीं बहिर्व्यापार चालून हि मनुष्य अंतर्मनाकडे वळूं शकेल. अंतर्मनाकडे वळणें ही च अंतर्दृष्टि. बहिर्वासना व बहिर्व्यापार सर्वस्वीं सुटणें

ही अगदीं सोपी गोष्ट तत्वत दिसते पण प्रत्यक्ष आचरणात ती अत्यंत अत्यंत अवघड आहे. म्हणून प्रत्यक्ष अनुभवी अशा सद्गुरूची जोड मिळाल्या-शिवाय याचा प्रत्यय आपल्यास पटत नाहीं. अनुभवी सद्गुरूची अवश्यकता दुसरी ही एक अशी दिसते कीं अनुभवी सद्गुरूला अंत प्रज्ञ मनाच्या सूचना देता व घेता येतात व साक्षात्कार घडवून आणता येतो. कोणत्या हि बोलक्या गुरूचें हें काम नव्हे. इतर गुरु ' अडक्याचे तीन ' मिळतील पण असा सद्गुरु क्वचित् च आढळेल कीं जो प्रत्ययाचें ज्ञान अनुभवाला आणून देईल. समर्थ काय, तुकाराम बुवा काय, किंवा इतर साधुसंत काय,

जग उद्धरीन हेळामात्रें ।

असें म्हणू शकतात ! केवढा प्रचण्ड आत्मविश्वास हा ! ! कोणत्या पुस्तकी गुरूची अशी प्राज्ञा आहे बरें ! "पुस्तकें सद्गुरूचें काम सहज करू शकतील" असें कित्येकास वाटतें आणि कोणी असें स्वकृत पुस्तकात लिहून ठेवतात हि. पण आम्ही त्याना एवढे च म्हणतों कीं समर्थांसारखे छातीला हात लावून त्यानीं सागावें कीं

> हेळामात्रें मुक्त करीन या जना । तरीच पावना राघवाचा ।
> राघवाचा दास मी जालो पावन । पतित तो कोण उरों शके ।
> उरों शके ऐसे कल्पातीं घडेना । जो कोणी पुसेना त्यासी उणें ।
> घेणें काळें मोक्ष जरी मी देईना । दास म्हणवींना राघवाचा ।
> राघवाचा वर पावलो सत्वर । जनाचा उद्धार करावया ॥

असो. बहिर्व्यापार किंवा अखिल कर्मे यांशीं असलेलें तादात्म्य देहसगानें उत्पन्न होतें. आपण च देह, देहाच्या प्रकृतीचें कर्म तें अर्थात् आपलें च अशी सार्वत्रिक भावना आहे. पण आपण देह नव्हे आणि देहव्यापार आपल्या प्रकृतीचा आहे, आपला नव्हे अशी दृढतर भावना होत जाईल तसतसा देहसग आपोआप सुटेल आणि तो सुटला म्हणजे अतर्मनाची किंवा अत प्रज्ञमनाची व आपली भेट अधिकाधिक होत जाईल. इतकें तत्वज्ञान नको असेल तर—बाकी तत्वज्ञान नको म्हणून मागत नाहीं—दुसरा मार्ग म्हणजे बहिर्व्यापारी मनावर सदाचाराचा, सद्वर्तनाचा, न्यायबुद्धीचा, लोकहितबुद्धीचा, आत्मौपम्यबुद्धीचा आळा घालणें व पगडा बसविणें हा.याला च चित्तशुद्धि म्हण-तात. संगशुद्धि सुटून गेली म्हणजे मनुष्याच्या वर्तनावर मर्यादा घालण्याचें कारण उरत नाहीं, तो कसाहि वागला तरी चालतें. उलटपक्षीं असें म्हणता येईल कीं त्याचे हातून असत्कर्म होऊ शकत नाहीं. पण समर्थांचा सद्वर्तनावर विशेष

कटाक्ष आहे. ते म्हणतात ' जळो तयांची महंती ' !! पाश्चिमात्य देशांतील मानसशास्त्री हि सद्वर्तनावर कटाक्ष ठेवतात. किंबहुना मानसिक सामर्थ्याची उपासना व वाढ करूं इच्छिणाराकडून

मी यावगी इच्छा बाळगणार नाहीं अशी प्रथम शपथ

घेववितात. सद्वर्तनाच्या जबरदस्तीनें मनुष्याच्या स्वभावाचें अभ्यासानें तें एक अंग बनूं शकतें. Habit becomes second nature. सद्वर्तन म्हणजे दैहिक वासनांवरील दडपण, दुसरें काय ! मग हें दडपण स्वतःचे फायद्याकरितां असो कीं दुसऱ्याच्या फायद्याकरितां असो. जे लोक सामाजिक नीति, लोकसंग्रह, किंवा जगद् धारणा किंवा धर्म या दृष्टीनें या दडपणाकडे पाहतात ते याला नीति किंवा धर्म म्हणतात. परंतु जे अंतःसामर्थ्यविकास या दृष्टीनें इकडे पाहतील ते हें दडपण केवळ स्वोद्धारक आहे असें म्हणतील. आत्मोद्धार आणि जगद् धारणा किंवा धर्म ही केवळ भिन्नभिन्न दृष्टिकोणामुळें उत्पन्न होणारी परिभाषा आहे असें यावरून दिसून येईल. असो. कर्म, बहिर्व्यापार किंबहुना संकल्प-विकल्प सोडण्याचें कारण अंतःप्रज्ञ मनाकडे लागलेल्या निश्चळ नजरेची अवश्यकता. सोडण्याचे उपाय असे आतां पर्यंत दोन आपण पाहिले ( १ ) संग, तादात्म्य किंवा देहबुद्धि नष्ट करणें ( २ ) सद्वर्तनाचें दडपण अविच्छिन्न-पणें बाळगणें. यापुढें आणखी एक उपाय आपले कडील साधुसंतांनीं योजिलेला आहे व तो बेमालूम आहे अशी त्यांची खात्री आहे. तो उपाय म्हणजे

हरिनामाचा अखंड गजर.

या हरिनामाच्या गजराचें तत्त्वज्ञान मानसशास्त्राचें अध्ययन केल्याखेरीज समजणार च नाहीं. गेल्या ५।५० वर्षांत विद्वान् लोकांनीं या ' टाळकुटीचा कीस ' काढणारांची सडकून थट्टा केली आहे. परंतु साधुसंतांनीं त्याची अत्यंत प्रशंसा केली आहे. किंबहुना हरिनामाचा गजर हरिभेट करवितो अशी ते ग्वाही देतात ! दोघांपैकीं एक खास चुकला आहे यांत शंका च नाहीं. साधुसंत अलीकडील विद्वानांइतके शास्त्रज्ञ व चिकित्सक नाहींत म्हणून आजवर या विद्वानांच्या मताला बरा च मान असे. पण हरिनामाची थट्टा करणाऱ्या या अलीकडील विद्वानांना श्रद्धा आणि मनोव्यापारांचें सूक्ष्म ज्ञान बिलकुल नव्हतें. मानसशास्त्राची त्या वेळीं इतकी वाढ झालेली नव्हती. मानसशास्त्रानुरोधानें आतां असें निखालसपणें सांगतां येईल अलीकडील विद्वानांची ही थट्टा मूर्ख-

पणाची आहे. हरिनामगजराचा महिमा विलक्षण आहे. नामाच्या गजरांत शरीराचें भान विसरविण्याचें व अंतःप्रशमनाचें द्वार उघडण्याचें सामर्थ्य आहे. भगवद्गीतेमध्यें नामाचा महिमा अत्यंत थोडक्यांत फार काय एका शब्दांत च वर्णिलेला आहे. भगवंतांनीं आपल्या विभूतींत

यज्ञानां जपयज्ञोऽस्मि । गीता १०-२५

असें म्हटलें आहे. एरवीं ज्ञानयज्ञाची भगवंतांनीं अत्यंत स्तुति केली आहे. आणि ज्ञान आणि मोक्ष यांचा संबंध लक्षांत घेतां तो सर्वथैव युक्त च आहे. पण यज्ञांतला यज्ञ ' ज्ञानयज्ञ ' असें ते सांगत नाहींत. सोमयाग, वाजपेय किंवा राजसूय यज्ञ यांची ऋग्वेदांत किंवा भारतांत इतरत्र भरपूर स्तुति आढळते. परंतु एथें भगवंत जपयज्ञाचा महिमा ' विभूति ' म्हणून वर्णन करतात. याचें कारण काय असावें इकडे टीकाकारांपैकीं कोणाचें च लक्ष गेलेलें नाहीं. कारण नामस्मरण किंवा जपयज्ञ याची उपपत्ति कोणी लावलेली च नाहीं. समर्थांनीं त्रयोदशकोटि रामनामाचा जप करून त्या जपाचें सामर्थ्य अनुभविलें आहे. ' आधीं केलें मग सांगितलें ' हा त्यांचा बाणा. ' क्रियेविण वाचाळवा ' त्यांना आवडत नाहीं. सारांश समर्थांचा या बाबतींत जर कांहीं कटाक्ष असेल तर तो अनुभवाच्या जोरावर आहे असें म्हटलें पाहिजे. समर्थांचा कटाक्ष सदा मानसीं तो निदिध्यास राहो ॥ अशा अखंड ध्यानाकडे आहे असें आपल्याला पुढें दिसून येणार आहे.

रघूनायकावीण वांयों शिणों हो । सदा मानसीं तो निजध्यास राहो ॥ म. ४३
मना सज्जना राघवीं वस्ति कीजे । म. श्लो. ३८ ते ४२

रामनामा विषयीं ते म्हणतात:—

समस्तांमधें नाम हें सार आहे ।
दुजी तूळणा तूळितां ही न साहे । म. श्लो. ८१
मुखीं राम विश्राम तेथें चि आहे । सदानंद आनंद सेऊनि राहे ॥
तयावीण तो सीण संदेहकारी । निजधाम हे नाम शोकापहारी ॥ म. श्लो. ८६
मुखीं राम त्या काम बाधूं शकेना । गुणें इष्ट धारिष्ट त्याचें चुकेना ॥
हरिभक्त तो शक्त कामास मारी । म. श्लो. ८७
करी मूळ निर्मूळ घेतां भवाचें । जिवां मानवा हें जि कैवल्य साधे ॥ ८८

या २०० श्लोकांत रामनामावर च केवळ २५ म. श्लोक आहेत. या अखंडध्याना बरोबर ते अखंड नामस्मरण हि सुचवितात. इकडील सर्व च साधुसंत नाममहिमा गातात. पुढील अंकीं नामस्मरणाच्या थोरवीचा विचार करीत करीत आपण प्रत्यक्ष मनाच्या श्लोकांत प्रवेश करूं.

---

( १२९ )

॥ श्रीराम ॥

## श्रीसमर्थसंप्रदायजीर्णोद्धारकार्याचा

## जमाखर्च वगैरे

१८५२ आषाढ व. १ ( ता. ११-७-३० ) पासून

भाद्रपद शु. १ ( २५-८-३० ) पर्यंत

| | जमा | | खर्च |
|---|---|---|---|
| २०-०-० | श्रीसेवक अनंत सखाराम | ९६५-८-० | स्थापत्यविशारद श्री.वासु- |
| | मणीकर, अहमदाबाद, | | देवराव गोगटे यांच्या |
| | १० जून, १० जुलै करितां | | खातीं नांवें |
| २५-०-० | डॉ. भा. गो. घाणेकर, | | २८८ ता. ११।७।३० |
| | हिंदु युनिव्हरसिटी, के. | | २ ता. ११।७।३० |
| | वडिलांचे स्मरणार्थ | | ५ ता. १२।७।३० |
| ४-०-० | श्री. दत्तात्रय खंडेराव कुळ- | | ५ ता. १४।७।३० |
| | कर्णी, बोरसकर, कन्नड | | ४२० ता. १६।७।३० |
| १०-०-० | श्री. रंगराव विनायक कुळ- | | ६ ता. १६।७।३० |
| | कर्णी बोरसकर, कन्नड | | ४०० ता. २६।७।३० |
| १-४-० | श्रीशनैश्वरप्रीत्यर्थ,हस्तें विष्णु | | १२५ ता. ३१।८।३० |
| | रामचंद्र शेंबेकर, मुंबई | ५-१४-६ | टपाल, रजिस्ट्रेशन, |
| २-०-० | श्री. वामन वासुदेव जोशी, | | इत्यादि खर्च |
| | मुंबई | ९७१-६-६ | एकूण खर्च |

१०-०-० V. N. Kalyanpur, Bangalore, यांचेकडून प्रिय व सद्गुणी पुत्र रामदास याच्या स्मरणार्थ सातवा हप्ता ता. ७।८।३०

१-४-०, पितृव्यतीर्थ० वामन गणेश नवरे, धोपेश्वर, राजापुर, ( श्राद्धदिनीं काढलेले ) हस्तें ना. पां. नवरे, मुंबई

१०५-०-० अनामत असलेली रक्कम चाफळ सोसायटीकडून व त्याजपोटीं

[ १३० ]

# सर्वांच्या समाधानाची जागा

( हें प्रकरण कोरेगांवीं मिळालें )

॥ श्री शिव प्रसन्न ॥

॥ श्री राम सद्गुरु समर्थ ॥

भूत भविष्य वर्तमान । जे काळीं होणें जाण ।
श्रीहरिसंकल्पप्रमाणें । सहज होती अनायासें ॥ १ ॥

अनादि भगवत्संकल्पप्रमाणें । चलें च होतसे जाण ।
करणें आणि न-करणें । स्वाधीन नाहीं ॥ २ ॥

अनंतकोटीब्रह्मांडधारी । सूत्रधारी श्रीहरि ।
तो जैसा नाचवितो त्यापरी । विश्वपुतळा नाचतसे ॥ ३ ॥

प्राणी वर्तती संसारीं । कर्माकर्मीं प्रवर्तती जरी ।
परी स्वसत्तेची कुसरी । कांहीं च नाहीं ॥ ४ ॥

जेव्हां केला हा पिंड निर्माण । तत्समईं ठेविला क्रम करून ।
त्या त्या प्रमाणें घडतें जाण । चिंता करणें व्यर्थ चि ॥ ५ ॥

सुख अथवा दुःख भोगणें । हानि मृत्यु यश लाभ जाणें ।
श्रीहरिसंकल्पप्रमाणें । आपोआप होतसे ॥ ६ ॥

लौकिक व्यवहार करणें । येकामेका देणें घेणें ।
ऋणानुबंधानुसार घडणें । पूर्वप्रवाहरूप ॥ ७ ॥

कोण देता कोण घेता । याचा विचार पाहिजे पुरता ।
मिथ्या भ्रांतीस पडूं नये तत्वतां । सारासार विचारित ॥ ८ ॥

मोलाचें आयुष्य गमाऊन । पुढें काय मिळवणें ।
लक्ष चौऱ्यासी हिंडणें । सुख कांहीं दिसेना ॥ ९ ॥

कैची जाया कैची माया । कां भ्रमलासी मूर्खा वाया ।
गंधर्वनगरीची छाया । साचपणें दिसेना ॥ १० ॥

तरी या संसारासी असोन । दृढ धरावे सद्गुरुचरण ।
सारासारविवेकलक्षण । सर्वदा हि करावें ॥ ११ ॥

मुळीं दृष्टी घालून । चौदेहाचे शोध करून ।
आपण हें वोळखणें । कोण आहे ॥ १२ ॥

आपुली माता पिता कोण । कोण वर्ण कोण स्थान ।

पुढें आपुलें आगमन । होईल कोठें पाहवे ॥ १३ ॥
अंगुष्ठापासोन मस्तकपर्यंत । नख रोमावळी समस्त ।
सर्वत्र हि क्रियाभूत । आपुले आपण करिताती ॥ १४ ॥
पूर्वप्रारब्धास्तव जाणें । देह वावरे बळेंच आपण ।
मी कर्ता हा अभिमान । कासयासी धरावा ॥ १५ ॥
उठणें बसणें । चालणें बोलणें ।
कर्ता करणें । प्रारब्ध भोग ॥ १६ ॥
आपुलें आपण वळखणें । दुसऱ्या दान्द न ठेवणें ।
आपुले क्रियमाण प्रमाणें । आपणासी घडतें ॥ १७ ॥
बहुत ज्ञान बहुत विचक्षण । करून कांय सार्थक जाण ।
येक स्थळीं विश्वास न धरी पूर्ण । तरी अवघे व्यर्थ चि ॥ १८ ॥
विश्वास करूनी भक्ति उत्तम । विश्वास करूनी मद्य होणें ।
विश्वास करून वळखणें । भगवद्रूप ॥ १९ ॥
भाव धरी तया तरी पाषाण । ऐसें थोरांचें वचन ।
ह्या अन्वयें होतो चि जाण । भगवंत समीपा ॥ २० ॥
जगद्रूप हे रामचंद्र । स्थूल सूक्ष्मादि कारण खरें
शोधितां सर्व चराचर । रामरूप ॥ २१ ॥
मुख्य विश्वास असावा । गाळून टाकावे भावाभाव ।
मग प्रत्यक्ष स्वयमेव । राम होतो प्रसन्न ॥ २२ ॥
जेथें जेथें प्रकटे सद्भाव । तेथें तेथें प्रसन्न होतो देव ।
विश्वेश्वर श्रीराघव । सर्वां सर्वं भरला असे ॥ २३ ॥
रिता नाहीं कोठें ठाव । सर्वा भूतीं वासुदेव ।
अणु रेणु तृण सर्व । तो चि व्यापिला श्रीराम ॥ २४ ॥
देवद्विजमातृवचन । विश्वास धरावें अंत.करण ।
विश्वास धरितां चि पूर्ण । करणें प्राप्त देवासी ॥ २५ ॥
मुळीं च विश्वास होत नाहीं । जरी यद्यपि करिता पाही ।
नाना प्रकार अविश्वास हि । येऊन पडती आपुले गळा ॥ २६ ॥
प्राण गेले तरी जावोत । सद्गुरु प्रबोधिला वचनार्थ ।
दृढ मानुनी निश्चित । राहिला तो सत्सिय्य ॥ २७ ॥
गुरुवचन सत्य मानिला । प्रत्यक्ष होतो देव त्याला ।
नाहीं विश्वास आपुला । देवावरी दान्द काये ॥ २८ ॥

देव भक्ताचा साहाकारी । देव भक्ताचा कैवारी ।
देव भक्ताचा मनोरथ पूर्ण करी । भक्ताभिमानी श्रीराम ॥ २९ ॥
भक्तासी संकट पडले जरी । आपण स्वयें श्रीहरि ।
त्याचें संकट निवारण करी । स्वयमेव ॥ ३० ॥
ऐसें जाणोनी मूर्ख जन । कवणासी भक्ति नाहीं उत्पन्न ।
जवळी असतां निधान । उगा चि होती रानभरी ॥ ३१ ॥
आतां असो हें बोलणें । आपुले अनुभव आपण घेणें ।
दुसऱ्या चिंता करून । कासया श्रमावे ॥ ३२ ॥
प्रपंचीं असावें । लौकिक करावें ।
आपुले आश्रम चिंतावे । लौकिकार्थ ॥ ३३ ॥
दातृत्व करावें । परोपकार करावे ।
सुखदुःख जाणावे । आत्मानुभवें ॥ ३४ ॥
नम्रत्वें बोलावे । उत्तम क्रिया करावे ।
सर्वां भूतीं अनन्यभावें । भगवद्भजनीं ॥ ३५ ॥
रामापरते न बोलावे । विश्व अवघे ।
केलें कर्म कृष्णार्पण । कर्म धर्म सर्व जाण ।
कर्म करून अकर्तेपण । सहज चि होये ॥ ३६ ॥
परवनिता सीतासमान । पुरुष तो श्रीराम जाण ।
सर्वांभूतीं समान । जाले पाहिजे ॥ ३७ ॥
परनिंदा विष्ठाभक्षण । परद्रव्य वमन पूर्ण ।
परवनिता माता जाण । तरी तो धन्य संसारी ॥ ३८ ॥
रामापरते कांहीं नाहीं । सर्वा ठाई पूर्ण पाही ।
ऐसे जाणोनी निश्चयी । सदा सुखी असावे ॥ ३९ ॥
देता घेता श्रीराम । कर्ता करविता श्रीराम ।
बुद्धीचा प्रेरक श्रीराम । प्राणियाची सत्ता कैंची ॥ ४० ॥
अनंतकोटीब्रह्मांड । जे करिती घडामोड ।
थोर थोर हे प्रचंड । त्यासी स्वसत्ता पै नाहीं ॥ ४१ ॥
इतर प्राणियाचें काय सामर्थ्य (आहे) । जैसी बुद्धि देतो श्रीराम पाहे ।
तैसी प्राणी मर्तती आहे । शब्द ठेवणें मूर्खवद ॥ ४२ ॥
हसणें फुगणें द्वेष करणें । अथवा घात पात करणें ।
सदा चिर्णी वळमळणें । व्यर्थ कायसें करावें ॥ ४३ ॥

माता पिता बंधु असति । पुत्रदारादिधनसंपत्ति ।
इष्ट मित्र हि भास जाती । गणगोतादि सोयरे ॥ ४४ ॥
कृष्ण शालक रमा भगिनी । पिता समुद्र असोनि ।
परी शंखाचे प्राक्तनीं । भिक्षा मागणें घरोघरीं ॥ ४५ ॥
सर्वत्र आपणासी असोन । परी आपलें पूर्व कर्म गहन ।
सुखदु खादि भोगणें । कर्मानुसारें ॥ ४६ ॥
जसे आपण पेरिलें । संचितानुसार घ्यावें ( लागलें ) ।
तें चि उगवोनी येती फळें । कवणावरी काय बोल ॥ ४७ ॥
मातापित्याचें ऐश्वर्य । पुत्रासी जाण होतें काय ।
पुत्राचें सौख्यसुख । मातापित्यासी होत नाहीं ॥ ४८ ॥
भा इतरावर बोल काये । ऋणानुबंधानुसार होतो पाहे ।
कवणावरी रुसूं नये । सहसा हि ॥ ४९ ॥
शरीरेंकरून सेवा करणें । द्रव्य जोडून सुख देणें ।
सर्वत्राचा मनोदय पूर्ण करणें । ऋणानुबंधानुसार ॥ ५० ॥
अथवा आपुली सेवा ते करिती । परोपरी सरक्षती ।
परी त्यास आपण कां न करती । कदा काळीं ॥ ५१ ॥
ऐसे हे व्यवहार माईक । पूर्वीचे ऋणानुबंधानुसार देख ।
बळें च होतसे ऐक । आपोआप ॥
येकापासून सहस्रपर्यंत । ज्याचें ज्याचें देणें असेल सत्य ।
त्या त्या प्रमाणें देणें प्राप्त । पळारकारें ॥ ५२ ॥
इष्ट मित्र होऊन मागती । माता पिता बंधु याति ।
देणीं घेणीं करावीं लागतीं । ऋणानुबंधानुसारें ॥ ५३ ॥
अधिक उणें येकास करणें । हे हि आपुले स्वाधीन नाहीं जाणे ।
जितकें जितकें असेल देणें । तितुकें च देणें प्राप्त ॥ ५४ ॥
कायावाचामनें करून । अथवा अन्न आच्छादन ।
जें जें देणें असेल जाण । दिल्याशिवाय सुटका नाहीं ॥ ५५ ॥
आपण पूर्वी दिल्हें नाहीं । येथें मागितल्या मिळत नाहीं ।
दिल्याशिवाय प्राप्त नाहीं । ऐसें म्हणे वेदश्रुति ॥ ५६ ॥
येक समर्थ येक दरिद्री । लौकिकीं हे दोनी प्रकारी ।
पापा पुण्याचा अर्जवापरी । फळ घ्यावें ॥ ५७ ॥
आतां जे ज्ञानी लोक । समजावें ते हे चि आईक ।

काया वाचा मानसिक । करावे परोपकार ॥ ५८ ॥

आपले शरीरीं दुःख देणें । दुसऱ्याचें कल्याण करणें ।
हें चि चित्तातें धरणें । वारंवार ॥ ५९ ॥

आपण येकासी करून । फिरून त्याची अपेक्षा करणें ।
हे ते करून व्यर्थ जाणे । भस्मीं अवदान दिल्यापरी ॥ ६० ॥

निरापेक्ष निरहंकार । निःसंग आणि निर्वैर ।
सर्वां भूतीं दयापर । तो चि ईश्वरी पुरुष जाण ॥ ६१ ॥

ऐसी जयाची वासना । दैन्य नाहीं त्याचा भुवना ।
समस्त दैवत्य त्या जाणा । कृपा करिती ॥ ६२ ॥

आपुलें कल्याण व्हावें जरी । ऐसें असेल निर्धारीं ।
पराची गोष्टी कदापि वरी । ऐकूं नये ॥ ६३ ॥

जेणें करूनी कल्याण। हें चि सर्वदा चिंतन ।
परकड भ्रम टाकून । स्वकार्यार्थ साधिजे ॥ ६४ ॥

राजे रंक दोघे जण । उभयतांचें सुखदुःख भोगणें ।
वो ठाईं समान पूर्ण । सम विषम नव्हे चि ॥ ६५ ॥

मुळींच हा देह मिथ्या । तरी च सुखदुःख कैसें सत्य ।
त्यांत आपुलें संचित । त्याप्रमाणें घडतसे ॥ ६६ ॥

राम प्रल्हादादीप्रमाणें । दासीपुत्रास राज्य होणें ।
कोणें केले प्रयत्न । अनयासें लाधले ॥ ६७ ॥

आपुले दैवीं संपदा भोगणें । जरी गेला आरण्यासी जाणे ।
तेथें चि भेटे कल्पवृक्ष पूर्ण । चिंतिले मनोरथ पुरविती ॥ ६८ ॥

आपुले दैवीं दुःख भोगणें । सुख असोनी काय होणें ।
आपुले प्रारब्धाप्रमाणें । आपणासी घडते ॥ ६९ ॥

सार्वभौमराजपत्नी । असोनिया दरिद्रपणीं ।
सुख भोगी दिवसरजनी । चिंता न सुटे कदापि ॥ ७० ॥

पूर्वींचे ऋणानुबंधाविरहित । चिंता केल्या काय होत ।
ऋणानुबंधासारिखें घडत । प्रयत्न केल्याविण ॥ ७१ ॥

ऐसें सद्गुरूनें बोधून । कडें केले संसारापासून ।
मग दाविले आनंदघन । रामरूप ॥ ७२ ॥

दृष्टांतलक्षण समस्त । उघडून दाविले यथार्थ ।
तेणें ज्ञाहालें चित्त शांत । आनंदमय ॥ ७३ ॥

मस्तकीं हस्त ठेउनी । रूप याळ पाहोन नयनीं ।
समस्त अज्ञान निरसोनी । दाविते जाहाले रामरूप ॥ ७४ ॥
पिंडब्रह्मांडसमवेत । जे जे दिसती पदार्थ ।
रामरूप भासत । सद्गुरनायकृपेनें ॥ ७५ ॥
आणीक दाविती निजखूण । विराट पुरुषाचें रक्षण ।
तें माझा च ठाईं परिपूर्ण । करोनि दाविले ॥ ७६ ॥
हा विश्व तुझा चि विस्तार । तूं चि नटलासी चराचर ।
तुजपरी विश्व स ( म ) ग्र । ह्मणोनि दृष्टांत दाविती ॥ ७७ ॥
जैसे आपुले देह जाण । हस्तपादादि अवयव पूर्ण ।
प्रत्येक दिसती परी ते अभिन्न । देह चि जैसे ॥ ७८ ॥
दंत जिव्हा प्रत्येक । दिसती सकळासी वेगळीक ।
परी मुख येक । ऐसे चि विश्व जाणिजे ॥ ७९ ॥
नातरी सूत्रांतील मणी । वर्ण भेद प्रत्येकपणी ।
परी ते सूत्रपर्णी । तैसे विश्व जाणिजे ॥ ८० ॥
दंत जिव्हा प्रत्येक हे आपुले । जिव्हेसी दंत दंशिले ।
ह्मणोनी काय दंत पाडिले । रागेजोनी ॥ ८१ ॥
उभयपक्षीं आपणे । दुःख तें आपणासी च जाणे ।
आपुलें आपण समजणें । विवेकबळें ॥ ८२ ॥
आपुले हस्त आपुले नेत्रीं । जरी जाय अवचिती ।
तरी काय हस्त कापिती । क्रोधेंकरोन ॥ ८३ ॥
तैसें जग हें आपण । सर्वा ठाईं समसमान ।
राग द्वेष टाकून । सर्वज्ञ व्हावें ॥ ८४ ॥
मृत्तिकेची मूर्ति निर्मिली । बैल घोडे मनुष्यें केलीं ।
प्रत्येक करूनी बैसविली । अवघे मृत्तिका चि जाणावे ॥ ८५ ॥
येक दुग्ध नाना वर्ण गायी । हेम अळंकार नानापरी ही ।
उदक येक तरंग बहु ते हि । तैसें चि विश्व जाणिजे ॥ ८६ ॥
जग समस्त पंचभूतात्मक । अनेक दिसे परी येक ।
ऐसे जाणोनि निर्टंक । भेदरहित व्हावें ॥ ८७ ॥
वस्त्र येक नाम अनेक । धोत्र लुगडी चोळी देख ।
तैसे स्त्री पुरुष नपुंसक । अवघा ओतला श्रीराम ॥ ८८ ॥

[ १३१ ]

## मनोबोध Auto—Suggestions

(२)

### अखंड नामस्मरण, निदिध्यास किंवा जपयज्ञ

समर्थांनीं नाममहिमा या २०५ श्लोकांपैकीं सुमारें ३० श्लोकांत गाईलेला आहे असें मागील प्रकरणांत सांगितलें च आहे. त्या ३० श्लोकांपैकीं सु. ७ श्लोक किंवा त्यांपैकीं काहीं भाग एथें उतरून घेणार आहे, त्यावरून नामाचा महिमा कां व कसा आहे तें समजून येईल. समर्थ म्हणतातः

समस्तांमध्यें सार साचार आहे । कळेना तरी सर्व शोधूनि पाहे ॥
जिवा संशयो वाउगा तो त्यजावा । प्रभाते मनीं राम चिंतीत जावा ॥ ७५ ॥

नामाचा हा उपाय सर्व उपायांत 'सार' असून 'सत्य' आहे हें कोणास समजत नसेल तर त्यानें सर्व उपायांचा शोध घ्यावा. मनांत उगाच संशय पाळगूं नये. खरोखर जर कोणास ही गोष्ट कळत नसेल तर तो अभागी च समजला पाहिजे !!

बहू नाम या राम नामीं तुळेना । अभाग्य नरा पामरा हें कळेना ॥ ८२ ॥
समस्तांमध्यें नाम हें सार आहे । दुजी तूळणा तुळितां ही न साहे ॥ ८१ ॥

असें बहुमोल अतुल्य असें या नामांत काय आहे ? एक तर ईश्वरप्राप्तीच्या अनेक मार्गांपैकीं हा 'स्वस्त, सोपा आणि फुकाचा मार्ग' आहे च. पण या नामानें काय काय होऊं शकतें, पहाः

जयाचेनि नामें महा दोष जाती । जयाचेनि नामें गती पाविजेती ।
जयाचेनि नामें घडे पुण्य ठेवा । प्रभाते मनीं राम चिंतीत जावा ॥ ७१ ॥
करी काम निःकाम या राघवाचें । करी रूप स्वरूप सर्वां जिवांचें ॥
करी छेद निर्द्वंद्व हे गूण गातां । हरीकीर्तनीं वृत्तिविश्वास होतां ॥ ७७ ॥
मुखीं राम विश्राम तेथेंचि आहे । तयावीण तो दीण संदेहकारी ॥ ८६ ॥
म्हणोनी अतीआदरें नाम घ्यावें । मुखे बोलतां दोष जाती स्वभावें ॥ १०१॥

म्हणून

मना मत्सरें नाम सांडूं नको हो । अती आदरें हा निजध्यास राहो ॥ ८१ ॥

नामानें स्वभावतः च दोष निघून जातात, पुण्य गांठीं पडतें, त्यामुळें राघवाचें काम हातून निष्काम पद्ध लागते एवढें च नव्हे 'वरनाम हें सर्वां

जिवांचे रूप स्वरूप करूं शकतें ' आणि ' विश्राम तेथें चि आहे ' इतकी समर्थ स्पष्ट ग्वाही देतात.

नुसत्या हरिनामाचे इतके परिणाम कसे होऊं शकतील ? असा प्रश्न, मला च किती तरी दिवस, पडला होता. मला वाटे कीं सदोदित पापविचारांत गढून गेलेल्या मनुष्याचा जो काल रामनाम घेण्यांत गेला तो काल एरवीं पापकल्पनांत, चिंतनांत किंवा पापाचरणांत जाण्याचें टळलें, म्हणून वाटलें तर त्यानें समाधान मानून घ्यावें ! परंतु हा फायदा केवळ अभावरूप होय ( negative ). त्या नामस्मरणापासून प्रत्यक्ष भावरूप ( positive ) फायदा काय व कसा होऊं शकेल ? आणि अलीकडच्या कित्येक सुशिक्षितांना ही शंका येत च असेल. म्हणून समर्थांची ही मीमांसा अत्यंत मननीय आहे असें मी समजतों. केवळ ' अनुमानाचें ' किंवा ' परंपरेच्या ' ( परिपाठीच्या ) जोरावर आपण कोणास कांहीं सांगत नाहीं आणि कोणी या परमार्थांचे बाबतींत केवळ अनुमानावर विसंबून राहूं हि नये असें समर्थांनीं सडेतोड-पणानें दासबोध १०-८ या समासांत बजावलें आहे.

प्रचीत न येतां निरूपणीं । वैसोंचि नये ॥ १०-८-२
अनुमानें जें कार्य करणें । तें चि मूर्खपण ॥ १०-८-९
एथें अनुमान राहिला । तरी परमार्थ केला तो वायां गेला ।
प्राणी संशयीं बुडाला । प्रचीतीविण । १०-८-२४
हें परमार्थांचें बोलणें । लटिकें बोलेल तो अद्धम
लटिकें मानी तो अद्धमोद्धम । यथार्थ जाणावा ॥ १०-८-२५
परिपाठेंचि जरी बोलिलें । तरी प्रचीत समाधान बुडालें ॥ १०-८-३२

अशा स्थितींत समर्थांचें नामस्मरणासंबंधाचें विवेचन आजच्या सुशिक्षितांनीं नुसतें च वाचून नव्हे तर परीक्षून पाहावें अशी विनंति आहे.

सारांश ' संशय ' नको आणि ' मत्सर ' हि नको. स्वहितार्थ च पण निःसंदिग्धमनानें मनुष्यानें नामाचा निदिध्यास चालवून आत्मौपम्य बुद्धि आणि ' विश्राम ' पावून घ्यावा. नामानें मुक्ति मिळते असा समर्थांचा ठसठशीत खडसून जबाब आहे. या उपर संशय धरून बसेल तो ' अभागी पामर ' किंवा करंटा म्हणावयाचा, दुसरें काय ?

असा हा नाममहिमा केवळ चिकित्सक पण कुत्सित मत्सरी मनुष्याला समजला नाहीं आणि समजून न घेण्याची च त्यानें प्रतिज्ञा केली तर त्याला

समर्थांनीं काय करावें ? मानवी मनाचें एक प्रकारचें हें दौर्बल्य च समजलें पाहिजे. गोल्डस्मिथनें आपल्या ' डेझर्टेड व्हिलेज ' नामक काव्यांत म्हटलें आहे कीं मनाचा धर्म च असा कीं ' एका पापाचें प्रायश्चित घेत असतांना च त्यानें दुसऱ्या पापाचा संकल्प करीत रहावें ! ' अशा पापकर्मांत सदोदित गटंगळ्या खाणाऱ्या किंवा तसें नसल्यास संशयखोर चिकित्सक बहिष्प्रज्ञ मनास समर्थ पामर म्हणून खोडून देतात ! असें हें पाशवी किंवा ' दोषी ' मन—मनुष्य पशूंतून मानवाच्या जन्मास आल्यामुळें त्याचें मन मूळ पाशवी ( विषयासक्त ) असतें किंवा होतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. पण उलट पक्षीं असें हि म्हणतां येईल कीं प्रत्यक्ष पशूंत देखील इतकें पापविचारांत निढावलेलें मन सांपडणार नाहीं. म्हणून असें नीच मन मानवानें स्वतः च संपादन केलें आहे ! म्हणून अशा मानवी पण निकृष्ट ( infra ) मनाला अति मानवी ( ultra ) किंवा दैवी बनविण्याचा योग्य उपाय म्हणजे

समस्तांमध्यें नाम हें सार आहे ।

अधी त्यास शिकवण द्यावयाची आणि सांगावयाचें कीं प्रथम विश्वासानें व श्रद्धेनें

प्रभाते मनीं राम चिंतीत जावा ।

आणि अधी सुरवात करून, ' अती आदरें हा निजध्यास राहो. ' तेणें करून हळू हळू ' मन निष्काम ' होऊन किंवा बहिर्व्यापारापासून सुटून देहसंग सुटेल आणि अखेर आत्मारामीं च रत होईल. असा हा अनुभव आल्यावांचून राहणार नाहीं.

तथापि नाना सन्देनें नटणाऱ्या आणि रंगणाऱ्या अर्थात् ' नाना वृत्तींच्या ' ( ९-८-१२ दासबोध ) मनाला हा जरी सर्वोत्तम आणि सुलभ उपाय असला तरी तो एकदम घटणार नाहीं. म्हणून समर्थ दुसरे अनेक उपाय सुचवीत आहेत कीं ज्या उपायांनीं मन सज्जन ( दा. ६।१।२३–२४ ) होईल, सज्जनांना संतोषवील, बहुजनाच्या मनोगतींचा व्याप हातीं घेऊन त्यांत गढून जाईल, कीर्ति संपादन करील, इ. इ. यांत हि वास्तविक चित्त-शुद्धि आणि चित्तैकाग्र्य होण्याचें च ध्येय आहे. मनाला जी ' ममत्वा ' ची ओढ असते ती बदलून तें ' निर्मम ' करण्याचे दोन प्रकार सहजीं च दिसून येतात. एक एकदम ' ममत्व ' सोड म्हणून निवृत्त मार्गांत आणावयाचें, दुसरें प्रवृत्ति मार्गांत ममत्वाचा घेर वाढवून तें विश्वकुटुंबी बनवावयाचें.

सज्जनांचा संतोष अशा निवृत्ति आणि प्रवृत्तींच्या दोन प्रकारानें होऊं शकतो. तथापि त्यांतील हेतु केवळ प्रवृत्ति, लौकिक, इत्यादि नसून एका बाजूनें ममत्वाचा घेर वाढवून दुसऱ्या बाजूनें केवळ वैयक्तिक असें ममत्व नाहींसें च करावयाचें हा असतो. मनाच्या श्लोकाच्या पहिल्या कांहीं श्लोकांत हा मार्ग या च हेतूनें सांगितलेला आहे. केवळ सद्गुणांचा पुतळा बनविणें व लौकिकी बुद्धि वाढविणें हा नव्हे. कारण सर्वांचें ध्येय शुद्ध दुष्ट सर्वच कल्पना ( अल्प-संकल्प हि ) मालविणें हा आहे. ( १३० ) पण प्रथम प्रथम

मना वासना दुष्ट कामा नये रे। मना सर्वथा पापबुद्धि नको रे ॥

मना सज्जना लागि संतोषवावें। देह त्यागितां कीर्ति मार्गे उरावी ॥

असा नैतिक आणि व्यावहारिक उपदेश केलेला आहे. नैतिक उपदेश नेहेमीं च विश्वकुटुंबीय दृष्टीचा असतो. पण ज्या अर्थी ' सर्व च कल्पना ' या बाजार मोडावयाचा आहे, त्या अर्थी प्रथमदर्शनीं सांगितलेल्या नैतिक कल्पना केवळ अभ्यासाच्या दृष्टीनें सांगितल्या आहेत अशी कल्पना करणें भाग आहे. अर्थात् अशा श्लोकांचा सामान्य व उत्तान अर्थ हा च खरा असें धरून चालणें योग्य नव्हे. संगति लावावयायाची तर पुढें ठेवलेलें ध्येय महत्त्वाचें मानून त्याच्या आनुषंगानें होईल तो च अर्थ खरा असें समजावें लागतें. आणि म्हणून च एथें या अर्थांची फोड करणें भाग पडलें. सर्व श्लोकांत केंद्रीभूत असलेली कल्पना

न कंचन कामं कामयते ( मांडुक्य उप० )

किंवा विहाय कामान् यः सर्वान् पुमांश्चरति निःस्पृहः ॥

निर्ममो निरहंकारः ... ... ॥ भ. गीता

किंबहुनाः न किंचिदपि चिंतयेत्। भ. गीता

ही असून तिच्या धोरणानें च बाकीचे श्लोकांची संगति लावली पाहिजे. नाम-महिमा गायलेला आहे तो तरी स्वतंत्र नाहीं च. रामनामनिदिध्यासाचा हेतु हि वरील प्रकारचा च म्हणजे इतर अर्थात् असत् कल्पनांची व्यावृत्ति करून सत्-कल्पनेचा निदिध्यास घ्यावयाचा आणि तो हि अखेर टाकून ' ब्रह्मानंदीं टाळी ' अशी अवस्था प्राप्त करून घ्यावयाची असा च आहे. अशा स्थितींत समर्थांनीं अखंड नामाच्या गजराचे किंवा नामाचे जे परिणाम सांगितले आहेत ते सर्वथा योग्य च होत; असो.

मनाचें कार्य संकल्पविकल्प करणें. हें 'संकल्पविकल्पा' चें कर्म बंद केल्या-वर मन काय करूं शकणार ? मनाचें कार्य गेले च मनत्व च खुंटविल्यावर मग अर्थात् त्या पुढील उपदेश कोणाला करणार ?

**नमन घडतां चि न मन । मनास कैंचें मनपण ॥**

भक्तमंजरी अ. ३१ नवनाथ वर्णन

अर्थात् मन 'मनातीत' होऊन जातें त्या वेळीं अगर त्यानंतर देहाचे हातून घडणारें कार्य कोण व कसें करीत असतें ? किंबहुना तत्पूर्वी तरी 'मनातीत हो' अशी आज्ञा किंवा असा हा उपदेश कोण कोणास करीत असते किंवा करूं शकणार ? 'मना अल्प संकल्प तो ही त्यजावा' असें म्हणून मनाचें मनपण च घालविल्यावर त्या च मनाला सत्संकल्प धरण्यास कसें सांगतां येईल याचा विचार केल्यास मनाचें हित समर्थांचें डोळ्यापुढें होतें की नाहीं हें आपल्यास समजून येईल. तथापि या बाबतींत आणखी जास्त पुरावा आपल्यास प्रत्यक्ष मनाच्या श्लोकांत व इतरत्र सांपडतो तो आपण पाहूं च. त्यापूर्वी दुसऱ्या एका गोष्टीचा खुलासा एथें करणें अवश्य वाटतें. या बाबतींत कदाचित् मतभेद होण्याचा संभव आहे. कदाचित् दोन भिन्न मार्गांनीं एका च ठिकाणाकडे जात असता कांहीं काळपर्यंत रस्त्यांची सहजहृतीनें एक मिळणी होत असेल. प्रत्यक्ष काय होत असेल तें अनुभवी च जाणत असतील. तूर्त आपण तात्विक दृष्ट्या विचार करीत असल्यामुळें आलेल्या शंकेचा खुलासा करणें अवश्य आहे. शंका अशी की समर्थांनीं मनाचे श्लोकांत आणि दासबोधांत परस्परविरुद्ध असे दोन मार्ग उपदेशिले आहेत कीं काय ?

## (४)

## परस्परविरोध

जपयज्ञ किंवा नामस्मरण कैवल्यकारक आहे काय ?

मनाचे श्लोक आणि दासबोध यांतील मार्ग भिन्न नसतील तर दोहींचा मेळ कसा घालता येईल ? समर्थ दासबोधात तर म्हणतातः—

महावाक्य उपदेश भला । परी त्याचा जप नाहीं बोलिला ।
तेथींचा तो विचार चि केला । पाहिजे साधकें ॥ ५-६-११
महा वाक्य उपदेशसार । परी घेतला पाहिजे विचार ।
त्याच्या जपे अंधकार । न फिटे भ्रांतीचा ॥ १२

> महां वाक्याचा अर्थ घेतां । आपण वस्तुचि तत्वतां ॥
> त्याचा जप करितां, वृथा । शीणचि होये ॥ १३
> महां वाक्याचें विवरण । हें मुख्य ज्ञानाचें लक्षण ।
> शुद्ध लक्ष्यांशें आपण । वस्तुच आहे ॥ १४

या समासांत तर समर्थ ' जपा ' चा मार्ग अंधकाराचा, निरर्थक शीणाचा सांगतात. आणि एथें मनाचे श्लोकांत तर म्हणतातः

> समस्तां मधें नाम हें सार आहे । दुजी तूळणा तूळितां ही न साहे ॥ ८१ ॥
> मुखीं राम विश्राम तेथें चि आहे ॥ सदानंद आनंद सेवूनि राहे ॥
> तयावीण तो शीण संदेहकारी । निजधाम हे नाम शोकापहारी ॥ ८६
> करी मूळ निर्मूळ घेतां भवाचें ॥ जिवां मानवां हें चि कैवल्य साचें ॥ ८८

किंबहुना हर, पार्वती (९४) वगैरेंचीं अनेक उदाहरणें देऊन या विषयाची खात्री करण्याचा हि प्रयत्न केला आहे.

दोन उतारे परस्परविरोधी आहेत यांत शंका नाहीं. एकांत जपानें शीण तर दुसऱ्यांत जपाविणें शीण होईल असें सांगितलें आहे हें आश्चर्य होय. एक तर हे सर्व नामाचे श्लोक अर्थवादपर किंवा स्तुतिपर मानून सोडून दिले पाहिजेत. नाहींतर दोहोंतील विरोध केवळ आभास म्हणून स्पष्टपणें दाखविला पाहिजे. भिन्नरुचि लोकांकरितां भिन्न मार्ग ( प्ररोचनार्थ ) असें म्हणावें तर ज्या एका विषयीं तो अंधकाराचा व व्यर्थ शीणाचा मार्ग म्हणून म्हटलें आहे, त्या विषयीं बोलतांना अर्थात् अर्थवाद रहात च नाहीं. सायणांनीं तैत्तिरीय संहितेच्या उपोद्घातांत अर्थवादाचें जें एक उदाहरण घेतलें आहे त्याचा विचार केल्यास हे श्लोक ( मनाचे ) अर्थवादपर वाटण्याचा संभव आहे " ग्रावाणः प्लवन्ते " असें कोणी सांगूं लागला तर त्यावर विश्वास कसा ठेवावा? पण समर्थांनीं हि ' हरीनाम नेमस्त पाषाण तरी ॥ बहू तारिले मानवें देहधारी ॥ ९८ ॥ असें उदाहरण घेतलें आहे. तेव्हां हे सर्व श्लोक अर्थवादपर म्हणजे भक्तजनांचे ठिकाणीं प्रवृत्ति उत्पन्न करण्याकरितां, त्यांच्या भोळसर मनाचे समजुतीकरितां म्हणून आहेत कीं या श्लोकांत कांहीं अर्थ आहे? केवळ अर्थवादपर असले तर आतां पर्यंतचा हा सर्व खटाटोप व्यर्थ गेला म्हणावयाचा.

---

1 ' व ' अक्षरावर वैदिक स्वराप्रमाणें स्वर देऊन त्याचें दीर्घत्व एथें सुचविलें आहे.

दुसरी हि एक गोष्ट विचारांत घेण्यासारखी आहे. समर्थ अखंड ध्यानासंबधानें दासबोधाच्या १४।८ मध्यें म्हणतात.

अखंड ध्यानाचें लक्षण । अखंड देवाचें स्मरण ॥ २४ ॥
देव ओळखोन, जीव । तेथेंचि लावावा ॥ २९ ॥ अंतरनिष्ठ ध्यान ऐसे ॥
दृढंकध्यान अनारिसें । प्रत्ययेविणें सकळ मिसें । अनुमानध्यान ॥ ३० ॥
सकळां ठायीं विभागला । देह प्रकृतीनें जाला । भिन्नभिन्न ॥ ९ ॥
भिन्नभिन्न देहाकारे । प्रस्तुत एकचि अंतरें ॥ १० ॥
समस्त जाणीवेनें पहाती ।...। त्याची आपुली संगती । अखंड आहे ॥१३॥
ध्यान धरितें तें कोण । ध्यानीं आठवतें तें कोण । दोहींमध्ये अनन्यपण ।
असिलें पाहिजे ॥ ३८ ॥ अनन्य सहज चि आहे ।
अखंड ध्यानें घडे हित । तरी तो जाणावा पंडित ॥ ३७

सारांश या अखंड ध्यानाच्या विवरणावरून सुष्ट दुष्ट सर्व प्राण्याच्या ठिकाणीं एक च एक आत्मा भरून राहिला आहे अशा देवाचें ध्यान, ज्याचे व आपले ठिकाणीं अनन्यता आहे अशा देवाचें ध्यान, तें अखंड ध्यान असा दासबोधात उघड अभिप्राय आहे. उलटपक्षीं मनाच्या श्लोकात

सदा रामनामें वदा पूर्ण कामें ॥ ७०
अती आदरें हा निजध्यास राहीं ॥ ८१
जपू नेमिला नेम गौरीहराचा ॥ ८५
जनीं भोजनीं नाम वाचे वदावें ॥ ८९
जपे आदरें पार्वती विश्वमाता ॥
म्हणोनि म्हणा तें चि हें नाम आतां ॥ ९४
जपे रामनामावळी नित्य काळीं ॥ ९६
मुखें रामनामावळी नित्य काळीं ॥ ९९

सदासर्वकाळ ( अखंड ) नामाचा गजर करावा असा एथें उघड अर्थ आहे. यावरून या दोन अर्थांत हि अत्यंत विरोध वाटत नसला तरी बहुत फरक आहे, यात शंका नाहीं.

तेव्हा या शंकाचा परिहार कसा करावयाचा ?

( १ ) एक तर भगवद्गीतेंत हि असे भिन्न प्रकार आढळून येतात ( गी. ८–१५ पहा. ) शिवाय

( २ ) साधकाच्या अधिकारान्वयें व आवडीप्रमाणें या दोन परस्पर विरोधी मतांचा समन्वय केला पाहिजे. म्हणजे दासबोधाचा हा ज्ञान्याकरिता आणि मनोबोध हा भक्तिमार्गीयाकरिता आहे. मनाचे श्लोक हे कर्म, उपासना आणि ज्ञान असे त्रिकांडात्मक असून हे नामस्मरणाचे सर्व श्लोक उपासनाकांडात येतात अशी एक पूर्वपरंपरा हि आहे. परंतु

( ३ ) मनाच्या भिन्नपणामुळें हा भेद उत्पन्न होतो असें या शंकाचें दुसरें समाधान आहे. दासबोध हा बाह्य किंवा विचारी मनाचे दृष्टीनें तर्कप्रतिष्ठ असा ग्रंथ आहे. तर मनाचे श्लोक हे विकारी किंवा भावनात्मक मनाचे दृष्टीनें, श्रद्धा आणि विश्वास या भूमिकेवरून स्वरूपीं जाण्याकरिता लिहिलेले आहेत. दोहींचा दृष्टिकोण भिन्न आहे. वास्तविक आत्मज्ञान हें तर्कप्रतिष्ठ नाहीं. श्रीमच्छंकराचार्यां सारख्या विद्वानांनीं या बाबतींत

तर्को ऽप्रतिष्ठ ।

असा सिद्धांत ठरविला आहे आणि तो सर्वमान्य आहे. आणि श्रीमद्भगवद्गीतेनें हि

यो बुद्धे परतस्तु सः ॥

असें म्हणून तीच गोष्ट प्रतिपादली आहे. समर्थांनी हि

स्फुरे ब्रह्म रे ॥ १७२ म. श्लोक

या श्लोकात त्याच गोष्टीस पुष्टि दिली आहे. आत्मज्ञान आपण विवेकानें संपादित करणें शक्य असलें आणि केवळ ज्ञानावर अवलंबून आपण असतों तर हजारो विद्वानांना याचा भ्रम पडला च नसता. ॐ ब्रह्मज्ञान स्वयमेव स्फुरत असते. तो केवळ ज्ञानाचा विषय नव्हे, असा याचा उघड अर्थ आहे. बहिष्कृत मनाचें सर्वच ज्ञान ज्ञानेंद्रियापासून प्राप्त होणारें असतें. पण आत्मा बहिष्प्रज्ञ मनाचा विषय होऊं शकत नाहीं व म्हणून च तो अतीन्द्रिय ज्ञानाचा विषय समजतात. अतीन्द्रिय आणि अबुद्धिग्राह्य अशा विषयाचें ज्ञान मानवाला कसें होऊं शकेल? असा प्रश्न या ठिकाणीं उत्पन्न होतो. आणि त्याचें उत्तर

---

ॐ ब्रह्मज्ञान आणि जगन्मिथ्यत्व, सुखाभास, मोक्ष इ. बाबतींत S. Laing यानें आपल्या Modern Science & Modern thought या ग्रंथांत (१८९६ ६ वी आवृत्ति पा. २२९) म्हटलें आहे कीं या कल्पना बद्ध कोठ्याच्या अशक्त व क्षीण मनात प्रसवतात. सशक्त, निरोगी व व्यवहारज्ञ इंग्रजाच्या मनांत प्रसवत नाहींत!!

ब्रह्मज्ञान स्वयमेव स्फुरत असते असें देण्यावाचून गत्यंतर नाहीं. या स्वयंस्फूर्ती करतांहि साधकाला कांहीं तयारी करणें अवश्य असते. आणि सद्गुरूचा हि उपयोग होऊं शकतो. ही तयारी ज्ञानमार्गानें, ध्यानमार्गानें किंवा भक्तिमार्गानें होऊं शकते. ज्ञानमार्गानें तयारी झाली तरी आत्मप्रत्यय घडेपर्यंत तें ज्ञान सार्थकीं लागलें असें होत नाहीं. ध्यानमार्गाचे व भक्तिमार्गाचे उपाय ज्ञान-मार्गापेक्षां सोपे गणले गेले आहेत. याचें कारण ज्ञानमार्गांत शंका प्रतिशंकांना अवकाश ( Scope ) आहे. उपासना किंवा भक्ति मार्गांत शंका कुशंकाचें द्वार अजिबात बंद करून श्रद्धा आणि विश्वास यांचे पायावर सर्व इमारत रचलेली आहे. जितक्या शंका कुशंका अधिक, इतके आयास अधिक आणि म्हणून ज्ञानमार्ग ' क्लेशोऽधिकतर ' असें भगवान म्हणतात. या बाबतींत कमी आयासाचा मार्ग म्हटला म्हणजे

> नित्य जपाचा ( पण ज्ञानाचा नव्हे म्हणून अंधकाराचा ) किंवा अखंड ( सदोदित ) नामस्मरणाचा

पण अखेर ' न किंचिदपि चिंतयेत् ' मना कल्पना लेश तोहि नसावा अशा स्वरूपाचा आहे. असा हा मार्ग अंतःस्थ मनाच्या द्वारें साध्य होतो असें मागील प्रकरणांतील विवेचनावरून दिसून आलें च आहे. श्रद्धा, विश्वास, आणि अखंड नामस्मरणानें काय साध्य होतें आणि एकंदरींत वरील विचारसरणीला उपनिषद् वाङ्मयांत कितीसा आधार आहे या बद्दल उपनिषद् वाङमयांतले, वगैरे आधार देऊन हें प्रकरण संपवूं.

( १ ) आत्मा स्वेच्छेनें जाणला जातो, ज्ञानानें किंवा बुद्धीनें मानवेच्छेनें नव्हे.

नायमात्मा प्रवचनेन लभ्यते न मेधया न बहुना श्रुतेन ।
यमैवैष वृणुते तेन लभ्यः तस्यैष आत्मा विवृणुते तनुं स्वाम् ॥
मुण्डकोपनिषद् ३-२-३

( २ ) भगवद्गीतेच्या १३ व्या अध्यायाच्या २४ व २५ व्या श्लोकांत आत्मज्ञान चार प्रकारानें होतें असें सांगितलें आहे ( १ ) ध्यानानें ( २ ) सांख्य योगानें ( ३ ) कर्म योगानें ( ४ ) स्वतःस ज्ञान न होतां हि दुसऱ्याचे ऐकून ( श्रद्धापूर्वक ) उपासनेनें. पैकीं क्रमांक १ व ४ खालीं उतरून घेतो.

ध्यानेनात्मनि पश्यंति केचिदू आत्मानं आत्मना । भ. गीता. १३-२४

अन्ये सांख्येन योगेन......................

अन्ये तु एवम् अजानंतः श्रुत्वा अन्येभ्यः उपासते

तेऽपि च अतितरन्त्येव मृत्युं श्रुतिपरायणाः ॥ भ. गीता १३-२५

मनाच्या श्लोकांत यांपैकीं ( १ ) ध्यान योग आणि ( २ ) उपासना योग सांगितला आहे. हा सांख्याप्रमाणें ज्ञानाचा नसून ( अजानंतः ) श्रद्धेचा ( श्रुत्वान्येभ्यः ) आणि उपासनेचा ( उपासते ) होय. पण या मार्गानें हि श्रद्धावान् लोक मृत्यूपार तरून पलीकडे जातात ! ध्यानाचे योगानें " आत्मनि आत्मानं आत्मना पश्यंति । स्वतःचे ठिकाणीं आत्म्याला मनाचे योगानें (ध्यानानें) पाहतात. हा ध्यान योग ६ व्या अध्यायांत सांगितला असून त्यांत बहिष्प्रज्ञ मन सर्वस्वीं ताब्यांत आणून मारावें लागतें. अर्थात् ही पाहण्याची क्रिया विचारी मनाची नसून अंतर्मनाची आहे आणि बहिश्चक्षूची नसून अंतश्चक्षूंची आहे. किंवा असें हि म्हणतां येईल कीं सर्व भूतांचे ठिकाणीं आत्मतत्वच सारखें भरून राहिलेलें आहे हें जाणून ध्यानानें मनुष्य आत्मतत्वीं स्थिर होतो. दासबोधाच्या १४।८ मध्यें हा च ध्यानयोग सांगितला असून मनाच्या श्लोकांत हि त्या च अर्थाचा बोध होतो. फरक असला च तर अखंड (अनन्य) किंवा निरंतर एवढ्या च अर्थाचा होऊं शकेल. परंतु याशिवाय ' अजानंतः श्रुत्वान्येभ्यः उपासते ' हा जपध्यानाचा च प्रकार या मनोबोधांतील नाममहिम्यांत सांगितला आहे. ध्यानयोग आणि उपासना भक्ति दोन हि अंतर्मनावर अवलंबून आहेत. ध्यानयोगांतील ' न किंचिदपि चिंतयेत ' म्ह. ' मना कल्पनालेश तोहि नसावा ' ही गोष्ट मनोबोधात प्राधान्यानें सांगितली आहे. उपासनेचा परिपोष हि तेव्हां च म्हणजे निरंतर भजनानें किंवा नामस्मरणानें होतो. म्हणून उपासनेला हि मनोबोधात प्रमुख स्थान आहे यांत शंका नाहीं. कर्मयोग आणि सांख्ययोग असे आणखी दोन योग १३ व्या अध्यायांत सांगितले आहेत. त्यापैकीं कर्मयोगांत देहबुद्धीचा त्याग किंवा असंग हा मुख्य आहे. मनोबोधांत हि या च देहबुद्धीच्या त्यागावर अत्यंत भर दिलेला आहे खरा. पण हा भर बहिष्प्रज्ञ मनापासून व्यावृत्ति करण्याचे हेतूनें दिला आहे हें पूर्वी सांगितलें च आहे.

नाहं प्रकाशः सर्वस्य ॥ भ. गी. ७-२५ मां तु वेद न कश्चन ॥ गी. ७-२६ या वचनावरून हि परमात्मतत्व कांहीं निवडक लोकानां प्रकाशतें ( स्फुरतें ) सर्वांना नव्हे. आणि कोणी हि मानव स्वतःच्या सामर्थ्यानें मला जाणूं शकत

नाहीं.- मी त्यांना म्हणजे त्यांचे ठिकाणीं दृश्यमान होतो.

यथा निरिंधनो वन्हिः स्वयोनौ उपशाम्यति।
तथा वृत्तिक्षयाच्चित्तं स्वयोनौ उपशाम्यति ॥
स्वयोनौ उपशांतस्य मनसः सत्यगामिनः।
इंद्रियार्थानमूढस्य अनृताः कर्मवशानुगाः ॥
चित्तमेव हि संसारः तत्प्रयत्नेन शोधयेत्।
यच्चित्तः तन्मयो भवति गुह्यमेतत्सनातनम् ॥ मैत्रायणी उपनिषद्
नायमात्मा प्रवचनेन लभ्यः न मेधया न बहुना श्रुतेन।
यमेवेष वृणुते तेन लभ्यः तस्यैष आत्मा विवृणुते तनुं स्वाम् ॥
समाधिनिर्धूतमलस्य चेतसः निवेशितस्यात्मनि यत्सुखम्।
न शक्यते वर्णयितुं गिरा तदा स्वयं तदंतः करणेन गृह्यते ॥

मैत्रयणीय उपनिषद्

यांपैकीं मुण्डकोपनिषदांत आत्मा ज्ञानादि साधनांनि लभ्य नसून त्याची पसंती पडेल त्याला ( व त्यावेळीं ) तो प्राप्त होतो असें सांगितलें असून मैत्रायणीय उपनिषदांत समाधीनें ज्याच्या चित्तांतील मल गेला आहे त्याणि जें आत्म्याचे ठिकाणीं निवेशित झालें आहे त्याला जें सुख मिळतें तें वाणीनें वर्णन करणें अशक्य, तें त्याच्या अंतःकरणास च केवळ आकलन करण्यासारखें होय असें सांगितलें आहे. अर्थात च समाधीचे वेळीं बहिष्प्रज्ञ मन लय पावलेलें असल्यामुळें त्या मनाला तें ज्ञान होत नाहीं, अंतःकरण म्हणून जो भाग, मन लय पावलें असतां हि, जाग्रत असतो त्याला च तें ज्ञान असतें. तथापि तें अवर्णनीय असतें. कारण एक तर त्याचें वर्णन करणें अशक्य असतें ( तें नेति नेति या स्वरूपानें च सांगता येतें ) आणि दुसरें तें वर्णन करूं लागलें कीं त्या च ठिकाणीं असलेली अनन्यता व अद्वैत जातें व तें सुख हि अदृश्य होतें. दुसऱ्या श्लोकांत चित्त हें च संसार रूप आहे. तें प्रयत्नेन शोधलें पाहिजे.पण एक रहस्यात्मक आणि सनातन. असा सिद्धांत सांगतात कीं ' यच्चित्तः तन्मयो भवति ' म्हणजे ज्याचें ज्या ठिकाणीं लय लागलें असेल तो तद्रूप होतो. हा सिद्धांत दोन हि मनांसंबंधीं खरा आहे. तथापि निरन्धन अग्नि जसा आपल्या ठिकाणीं शम पावतो तसें ' वृत्तिक्षयामुळें ' मन हि आपल्या ठिकाणीं च उपशम पावतें. अशा या उपशांत मनाचें वर्णनानंतर ' यच्चित्तः ' इत्यादि सिद्धांत सांगितल्यामुळें तो अंतःप्रज्ञ मनासंबंधानें च असला पाहिजे हें उघड आहे.

नामाची महति थोडक्यांत पाहिजे असल्यास श्रीसमर्थांचें "सगुणध्यान" प्रकरण वाचावें. प्रत्यक्ष समर्थांनीं त्रयोदशकोटी रामनामाचा जप केला ही गोष्ट महशूर च आहे. जो त्रयोदश कोटी रामनामाचा जप करील त्याला प्रत्यक्ष रामदर्शन होईल अशी ते ग्वाही देतात. 'मंत्र हा तारक रामनाम एक' ही गोष्ट 'संतसंगें मज काय प्राप्त झालें। सांगतो वहिलें' या अभंगांत त्यांनीं सांगितली आहे. तुकारामबोवांना स्वामींनीं जें चरित्र सांगितलें त्यांत आपल्या पित्याला सूर्यनामा ब्राह्मणानें 'कर्णी रामनाम' मंत्र सांगितला व आपल्याला हि खुद्द श्रीरामानें

'निद्रा केली तेथें श्रीरामें उठवूनि। तो चि मंत्र कानीं सांगितला॥

असें सांगितलें आहे. दासबोधांत 'तत्त्वमसि' या वाक्याचा 'जप सांगितला नाहीं' इतकें च सांगितलें आहे. कोणता हि जप निरर्थक च असा तेथील भाव नव्हे. समर्थ म्हणतातः—

आतां ही जयास वाटे भेटावें। रामें मज संभाळीत जावें।
ऐसें दृढ घेतलें जीवें। तरी ऐका मी सांगेन।
श्रीराम जयराम जयजयराम। ऐसा कांहीं एक करूनिया नेम॥
जप कीजे तेणें आत्माराम। जोडेल नियमें॥

ज्ञानेश्वर यज्ञानां जपयज्ञोऽस्मि या वरील टीकेंत म्हणतात

समस्तां ही यज्ञांच्या पैकीं। जपयज्ञ तो मी ये लोकीं।
जो कर्मत्यागें प्रणवादिकीं। निफजविजे॥ ३२
नाम जपयज्ञ तो परम। बाधूं न शके स्नानादिकर्म॥
नामें पावन धर्माधर्म। नाम परब्रह्म वेदार्थें॥ ३२
वास्तविक यज्ञानां जपयज्ञोऽस्मि। १०-२५

यांतील भूमिका आणि

एवं बहुविधा यज्ञाः...कर्मजान् विद्धि तान्सर्वान्॥ ४-३२
श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञात् ज्ञानयज्ञः परंतप॥ ४-३३

यांतील भूमिका या वेगवेगळ्या होत. ज्ञान यज्ञाखेरीज इतर सर्व यज्ञ श्रद्धेवर अवलंबून आहेत [ प्रत्यक्ष ज्ञान देखील श्रद्धेवर अवलंबून आहे (४-३९) ] त्या सर्व यज्ञांत जपयज्ञ 'किंवा नामस्मरण रूपी यज्ञ मी' असें भगवान् स्पष्ट सांगत आहेत. अर्थात् या जपयज्ञानें भगवंतांची प्राप्ति होते असें

म्हणण्यास कांहीं च हरकत नाहीं. जपयज्ञांतील तत्व आणि ' यच्चितः तन्मयो भवति ' ( मै. उ. ) यांतील किंवा

यं यं वाऽपि स्मरन्भावं ( त्यजत्यन्ते कलेवरम् ) ।
तं तं एवैति कौंतेय सदा तद्भावभावितः ॥ गी. ८-६

यांतील तत्व एक च आहे. हें च तत्व

ॐ इत्येकाक्षरं ब्रह्म व्याहरन् मामनुस्मरन् ।
यः प्रयाति त्यजन्देहं स याति परमां गतिम् ॥ गी. ८-१३

( १ ) अनन्यचेताः सततं यो मां ( २ ) स्मरति नित्यशः ।
तस्याहं सुलभः पार्थ नित्य-युक्तस्य योगिनः ॥ गी. ८-१४

## ( ५ )

### प्रत्यक्ष मनाचे श्लोकांतील दोन मनांचा पुरावा.

मनें दोन असून त्यांपैकीं अंतःप्रज्ञ मनास उद्देशून मनाचे श्लोक लिहिले आहेत असें दाखविण्याकरितां पहिल्या दोन प्रकरणांत मानसशास्त्राचे कांहीं सिद्धांत दोन मनाचे विशिष्ट स्वरूप आणि त्या संबंधानें भगवद्गीतेंतील जपयज्ञ आणि ध्यान योगाशीं त्यांचा संबंध दाखवून मनाच्या श्लोकांसंबंधानें अगदीं सामान्य विवरण आणि नामस्मरणाचा विशेष संबंध दाखवून दिला.

तिसऱ्या प्रकरणांत नामस्मरणाचें महत्व कां व कसें आहे याचें विवेचन करून चवथ्या प्रकरणांत समर्थांच्या दासबोधांत आणि मनाच्या श्लोकांत जो परस्परविरोध दिसतो त्याचा या दोन मनांच्या कल्पनेनें कसा उत्कृष्ट रितीनें उलगडा होतो हें स्पष्ट करून दाखविलें. या बाबतींत भगवद्गीतेचे आणि इतर उपनिषदांचे या कल्पनांशीं जें साम्य आहे तें हि थोडक्यांत सांगण्याचा प्रयत्न केला.

आतां या प्रकरणांत मनाच्या श्लोकापैकीं कांहीं श्लोकांत दोन मनांची कल्पना घेतल्यावांचून अर्थोत्पत्तीस कशा अडचणी येतात आणि ती कल्पना गृहीत धरल्यानें अर्थनिष्पत्ति कशी सुगम होते हें पहावयाचें योजिलें आहे. यानंतर जमल्यास मनाच्या सर्व च श्लोकांची चर्चा करावी असा हेतु आहे. पण ती अन्य प्रसंगीं केव्हां तरी करूं.

( १ ) मना सज्जना भक्तिपंथें चि जावें ॥ तरी श्रीहरी पाविजेतो स्वभावें॥२
या श्लोकांत च प्रथम मानवाचा राघव करण्याकरितां भक्तिपंथाचा जो स्वीकार

केला आहे तो च श्रद्धेवर अवलंबून असल्यामुळें द्वितीय मनाची त्यांत भूमिका आहे हें दिसून येतें. या विषयीं पूर्वी विवेचन केल्यामुळें एथें पुनरुक्ति करण्याचें कारण नाहीं.

(२) नको रे मना द्रव्य तें पूढिलांचें
..............................
न होतां मनासारिखें दुःख मोठें ॥ ९

या श्लोकांत पहिल्या चरणांतील मन आणि अखेरच्या चरणांतील मन हीं दोन हि एक च कीं दोन ? पहिल्या चरणांत 'मना' चे ऐवजीं 'जना' शब्द असता तर हा प्रयोग व्याकरणशुद्ध झाला असता. परतु दोन मनें मानलीं आणि पहिलें अंतःप्रज्ञ आणि दुसरें सुखदुःखाचा प्रत्यय येणारें बहिष्प्रज्ञ मानलें तर अर्थ सुलभ होऊन प्रयोगाबद्दल शंका येत नाहीं. अतःप्रज्ञ मनाला सर्व उपदेश करण्याचीं पूर्वी कारणें दिलेलीं च आहेत. तथापि अंतःप्रज्ञ मनाची बहिष्प्रज्ञ मना सुद्धां सर्व शरीरावर हुकमत चालते, किंबहुना त्या सदैव जागृत मनाची त्यांतील सर्व साधारण कर्मावर सर्वदा देखरेख असल्यामुळें हा सर्व उपदेश योग्य ठिकाणीं च आहे यात शका नाहीं. ( डॉ. गणपुले यांची 'मानसोपचार पद्धति' आणि 'मानसोन्नति' ग्रंथ पहा ) ही च गोष्ट खालील श्लोकाची. एरवीं 'मना' चें 'मानस' कोणतें असावें बरें ! -

(३) मना मानसीं दुःख आणूं नको रे ॥
मना सर्वथा शोक चिंता नको रे ॥ १२

आतां (४) मना सज्जना हीत माझें करावें ॥
रघूनायका दृढ चित्तीं धरावें ॥ २२

हा श्लोक घेऊं. यांतील ठकळ तीन हि शब्दाचा विचार केल्यास असें दिसून येईल कीं 'चित्तीं' या शब्दाचे ऐवजीं 'तुवां' असा शब्द योजल्यानें कांहीं बिघडत नसतां हि 'चित्तीं' हा शब्द घातला आहे, त्या अर्थीं त्यांत कांहीं तरी हेतु असला पाहिजे. 'मन' आणि 'चित्त' यात समर्थ भेद करीत आहेत. समर्थ उपनिषदां प्रमाणें चित्तचतुष्टय मानीत नसून मनपंचक मानतात असें समजण्यास हरकत नाहीं.

(दासबोध ९।५।६-८ स्फुट कविता पचीकरण योग १५-१८ पा. ३२२-पहा )

एरवीं जें पिंडीं तें ब्रह्मांडीं । ऐसी बोलावयाची प्रौढी ॥
हें वचनें प्रचीतीनें घडीं । तरयज्ञ बोलती ॥ ९-५-२

परी प्रलयाचे परीपाटी । तगों न शके ॥ ९-५-३

तथापि अंतःकरण, मन, बुद्धि आणि अहंकार हे 'शास्त्रांतरीं' सांगितले आहेत असें ते सांगतात (९-५-८). या समासांत इतर वेदांती किंवा तत्त्वज्ञ लोकांपेक्षां आपली विचारपद्धति वेगळी असून आपण दुसऱ्या लोकांप्रमाणें केवळ 'पिछेसे आई' म्हणून कोणती हि गोष्ट मानण्यास तयार नाहीं असें त्यांनीं निर्भिडपणें सांगितलें असून हि हें अंतःकरणपंचक खोटें असें दर्शविलें नाहीं. उलट ब्रह्मांडीं जशीं पंचमहाभूतें त्याप्रमाणें पिंडीं हें मनपंचक आहे असें दर्शविलें आहे. शास्त्रांतरीं या मनपंचकास विष्णु, चंद्रमा, ब्रह्मा, नारायण, आणि रुद्र असे प्रतियोगी ब्रह्मांडीं असल्याचें प्रतिपादिलें आहे तें आपल्यास पटत नाहीं असा च त्यांचा सदर समासांत अभिप्राय दिसून येतो.

पृथ्वी आप तेज वायो । अंतरात्म्याचि पांचवें ॥
अंतःकर्ण मन बुद्धि । चित्त अहंकार आलया ॥ श्लो. १८

असें वर्णन स्फुट कविता पा. ३२२ (पंचीकर्ण योग) यांत दिलें आहे. त्यावरून हें अंतःकरणपंचक ते मानतात असें स्पष्ट दिसून येतें. अर्थात् वरील श्लो. २२ यांतील 'मन' आणि 'चित्त' हे शब्द भिन्नार्थी योजिले आहेत असें म्हणण्यास या दृष्टीनें बळकटी च येते. मन हें तेजस्वी आणि चित्त हे वायु रूप. चेतवितें तें अर्थात् प्राणस्वरूपी असावें असा हि त्याचा अभिप्राय असेल. परंतु तो आपण आज मानला च पाहिजे असें मला वाटत नाहीं. दोहींचें भिन्नत्व त्यांस मान्य आहे ही च गोष्ट महत्त्वाची असून त्या भिन्न अर्थानें त्यांनीं श्लो. २२ मध्यें हि हे शब्द योजिले असतील असें यावरून सिद्ध होतें एवढें तूर्त पुरें आहे. कारण चिंतन (विचार) करतें तें चित्त असा हि अर्थ असू शकेल. छांदोग्योपनिषदांतील विचार हि या दृष्टीनें महत्त्वाचे आहेत ते असे:—

मनो हि आत्मा, मनो हि ब्रह्म संकल्पो वाव मनसो भूयः
चित्तं वाव संकल्पाद्भूयः ।

यदा वा चेतयतेऽथ संकल्पयते अथ मनस्यति (अथ वाचमीरयति)
तानि ह वा एतानि चित्तैकायनानि चित्तात्मनि चित्ते प्रतिष्ठितानि ।...
चित्तमात्मा चित्तमुपास्व इति । ध्यानं वा चित्ताद्भूयः ।
विज्ञानं वा ध्यानाद्भूयः । ......
एष एवं पश्यन् एवं मन्वानः एवं विजानन् अति वादी भवति ॥

चित्ताचें स्थान ' नाभि ' असें शारीरिकोपनिषदांत सांगितलें आहे. पंचदशी-मध्यें असें सांगितलें आहे कीं जाग्रतावस्थेंत पंच कर्मेंद्रियें, पंच ज्ञानेंद्रियें, आणि अंतःकरणचतुष्टय अशा चवदा साधनांनीं मनुष्य सज्ज असतो. परंतु स्वप्नस्थितींत फक्त चित्तचतुष्टय च त्याच्याजवळ असतें, सुषुप्ति स्थितींत तर त्यांपैकीं एक च ' चित्त ' तेवढें त्याजजवळ असतें. आणि तुरीयावस्थेंत तो केवल जीवयुक्त असतो. या दृष्टीनें पाहिलें तरी जाग्रतींतलें चित्त आणि स्वप्नसुषुप्तींतलें चित्त एक च मानणें अशक्य आहे ही गोष्ट पूर्वीं दर्शविली च आहे. एतावता कोणत्या हि दृष्टीनें पाहिलें तरी श्लो. २२ यांतील मन आणि चित्त हे शब्द भिन्न मानणें हें च युक्त होय.

श्लोकार्थः चिंतन करणाऱ्या मनाचे इतर सर्व व्यापार बंद ठेवून त्या ठिकाणीं राघवाची मूर्ति दृढ धरावी किंवा राघवाचें संतत ध्यान करावें आणि तेणें करून माझें हित करावें अर्थात् श्रेयःप्राप्ति करून घ्यावी असा या श्लोकाचा अभिप्राय आहे.

चिंतन करणाऱ्या संकल्पविकल्पात्मक बहिःप्रज्ञ मनाचा च पगडा सामान्य माणसावर बहुशः असतो. पण एथें तें अंतःप्रज्ञ मनाचें जणु काय अंकित आहे असें दर्शविलें आहे. तें हि योग्य च होय. कारण तें अंकित झाल्यावांचून मोक्षोपायाचा विचार शक्य च नाहीं. ' माझें हित ' ( श्रेयः ) साधावयाचें तर बहिर्मन राघवीं रत झालें पाहिजे, त्यानें राघवीं वस्ति केली पाहिजे व त्याकरितां विचारानें नाहीं तर श्रद्धेनें किंवा भक्तिभावानें अंतःप्रज्ञ मनाचा आपल्यावर पगडा बसवूं दिला पाहिजे आणि रामनामाचा सदैव जप केला पाहिजे. सारांश भावनोद्दीपित मन आणि संकल्पविकल्पात्मक चित्त असा भेद केला पाहिजे. ही च गोष्ट दुसऱ्या श्लोकापासून आपल्या निदर्शनास येत आहे. मानवी मनाचें दैवी मन ( माझें हित ) बनवावयाचें तर

रघूनायका दृढ चित्तीं धरावें ॥ २२

न बोले मना राघवेंवीण कांहीं ॥ २३

रघूनायकावीण वायां शिणावे ॥ २४

सदासर्वदा नाम वाचे वसों दे ॥ २४

रघूनायकावीण बोलों नको हो । सदा मानसीं हा निजध्यास राहो ॥ ४३

हा उपाय एथें वारंवार मनावर ठसविण्याची सुरवात केली आहे. या च स्वयंसूचना एथें मनास मुख्यतः दिल्या आहेत. Habit becomes second

nature असा मनाचा स्वभाव आहे. भावनेनें, संवय उत्पन्न करावयाची तर या अंतःप्रज्ञ मनाकडे च धांव घेतली पाहिजे. कोणतेंहि कार्य संवयीनें आत्मसात् झाल्यावर त्यावर निरीक्षण ( Superintendence ) करण्याचें हि काम या च मनाकडे सोंपविलेलें असतें असा मानसशास्त्रज्ञाचा सिद्धांत आहे. तो हि एथें सहजगत्या दृष्टीस पडतो. पुढें अनेक ठिकाणीं त्याचा प्रत्यय येणार आहे

( ५ ) असें हो जया अंतरीं भाव जैसा ।

वसे हो तया अंतरीं देव तैसा ॥ ३५

या ठिकाणीं मन भिन्नता न मानून हि चालेल. तथापि अंतःप्रज्ञ मन तें च भावनात्मक होय असें जें सुरवातीस गृहीत धरलें आहे तो हि अर्थ एथें ' अंतरीं भाव ' या शब्दांनीं सहजगत्या लागू पडतो. अनन्यास रक्षीतसे चापपाणी या तिसऱ्या चरणांतील ' अनन्य ' शब्द अखंडित ध्यानास लागू पडत नाहीं. कारण अखंडित या शब्दानें अनन्य मानल्यावर निराळ्या रक्षणाची अवश्यकता राहत च नाहीं. अर्थात् हा ' भावाचा ' देव होय, ' तादात्म्याचा नव्हे. '

( ६ ) विचारें बरें अंतरा बोधवीजे

मना सज्जना राघवीं वस्ति कीजे ॥ ४१ ॥

या श्लोकाचे तिसऱ्या चरणाचे अन्वयासंबंधानें, तसा च, अर्थासंबंधानें हि विचार करण्यासारखा आहे. सामान्यतः ' विचारें अंतरा ( ला ) बोधवीजे ' असा अन्वय करण्यांत येतो. मी ' अंतरा, बरें विचारें बोधवीजे ' किंवा ' अंतरा, विचारें बोधवीजे, बरें ' असा अन्वय घेतों.

सामान्य अन्वयाप्रमाणें ' विचार करून स्वतःच्या अंतःकरणास बोध करावा ' ( स. स. प्रत ) हा अर्थ होतो. यांतील विचार करणारी व्यक्ति ( कर्तृपद मन ) आणि बोध केला जाणारी व्यक्ति ( कर्मपद मन च ) स्वाभाविकपणें दोन असावयास नकोत काय ? ' मना ' हें संबोधन वरील चरणांत हि अध्याहृत घेतलें पाहिजे. नाहीं तर ' तुवा ' असा द्वितीय पुरुषी व्यक्तिवाचक कर्ता घ्यावा लागतो. परंतु ' तुवा ' अगर ' मना ' या शब्दांवांचून अर्थनिष्पत्ति होण्यासारखी आहे मग अध्याहृत शब्द का घ्यावा ? शिवाय ' तुवा ' हा कर्ता तर शक्य तितका टाळला पाहिजे. कारण समर्थांनीं मानवाच्या किंवा स्वतःच्या मनाला उपदेश करून नवीन भूमिका उत्पन्न

केली आहे. ती अशक्य होईपर्यंत कायम ठेवली पाहिजे. एथील क्रियापद प्रयोजक भेदी असल्याकारणानें विशेषतः ही अडचण उत्पन्न झाली आहे.

( २ ) अंतरा, बरें विचारें बोधवीजे

या अन्वयांत इतरत्र आलेल्या ' मना ' शब्दाप्रमाणें ' अंतरा ' हें संबोधन मानलें आहे. अर्थ–हे अंतःप्रज्ञ मना, बऱ्याविचारानें बहिःप्रज्ञ मनाला किंवा त्याच्या वृत्तीला शुद्ध कर ( बोधवीजे ) किंवा सत्यसंकल्पी कर आणि तिकडून राघवीं वस्ति करीव.

पहिला अन्वय कायम ठेवला तर ' विचारी ( बहिःप्रज्ञ ) मनानें अंतःकरणाला ( अंतःप्रज्ञ मनाला ) बोध ( कर ) बावा ( उपदेश करावा किंवा शुद्ध करावें ) आणि सज्जन झालेल्या ( शुद्ध झालेल्या ) मनाची राघवपदीं किंवा राघव नामीं वस्ति ( योजना ) करवावी. ' असा हि अर्थ माझ्या पद्धतीनें म्हणजे दोन मनें गृहीत धरून करतां येईल. परंतु यांत दोन मनाच्या कार्यांत व्युत्क्रम दिसून येतो म्हणून अंतरा हें संबोधन घेणें च बरें. शिवाय आतांपर्यंत अंतःप्रज्ञ मनाला स्वयंसूचना केलेल्या आहेत असें धरून चाललों असतां एथें च बहिःप्रज्ञ मनाला च उपदेश आहे असें म्हणणें प्रथम दर्शनीं तरी अयुक्त वाटतें.

( ३ ) ' *मना सज्जना राघवीं वस्ति कीजे* ' ( असा ) बोध हे अंतरा मना, बरें विचारें कीजे ( किंवा असें अंतरा मना बोधवीजे ) असा हि अन्वय होण्यासारखा असून तो अर्थ सर्वांत चांगला.

अर्थ–सज्जन ( शुद्ध ) झालेल्या ( अर्थात् कामनादि टाकून निर्मन किंवा निर्मम बनलेल्या ) मना, तूं राघवीं वस्ति करावी ( किंवा केली पाहिजे ) असा बोध हे अंतरा मना, तूं सयुक्तिक विचारानें ( बहिःप्रज्ञ मनाला ) कर ( किंवा असें, अंतःप्रज्ञ मना, तूं बऱ्या विचारानें करावेंस ) असा अर्थ हि करतां येण्यासारखा आहे.

अंतरा या शब्दांत च अंतःकरण, अंतःप्रज्ञ मन या शब्दांची कल्पना सहजवृत्त्या मनास येते. माण्डूक्योपनिषद् मनश्चक्षुपुढें असल्यामुळें हि ही शब्दयोजना केलेली असावी. किंवा ' अंतरा ' हा शब्द या नवीन मनास उद्देशून लिहिला जाण्याचा अधिक संभव आहे. केवळ मन हें अंतरींद्रिय समजून हा शब्द वापरणें असंभवनीय नाहीं. पण मग बोध केली जाणारी

आणि करणारी अशा दोन व्यक्ती कोण मानाव्या ही शंका राहते. ती वरील अर्थानें शिल्लक राहात नाहीं.

बहिष्प्रज्ञ मनाची ' वृत्ति ' बदलण्याचा हा सर्व खटाटोप दिसतो. वृत्ति बदलविण्याचें कार्य अंतःप्रज्ञ मनाकडून च अधिक सुलभ रीतीनें होऊं शकेल किंवा होऊं शकते. अर्थात् या हि दृष्टीनें ' अंतरा ' हा शब्द संबोधन मानून त्याचे मार्फत उपदेश केला आहे हें मानणें च प्रशस्त होय. पहा :

( १ ) जेणें वृत्ति हे पालटे दुर्जनाची ॥ म. श्लो. १३५

( २ ) करी वृत्ति जो संत तो संत जाणा ॥ श्लो. १५०

सारांश ही वृत्ति पालटण्याची दृष्टि मान्य असल्यास ' बोधवीजे ' किंवा बोध कीजे हें क्रियापद योग्य आहे असें च वाटतें. ' सज्जन ' या विशेषणानें ही कल्पना अधिक च पटते.

( ७ ) नसे मानसीं नष्ट आशा दुराशा ।
नसे अंतरीं प्रेम पाशा पिपाशा ॥ ५५ ॥

या दोन चरणांतील ' मानसीं ' आणि ' अंतरीं ' हे दोन शब्द भिन्नार्थानें योजिलेले उघड दिसतात. एकाच्या ठिकाणीं नष्ट आशा दुराशा असून ती काढावयाची आहे तर दुसऱ्याचे ठिकाणीं ' प्रेमपाशा पिपाशा ' भरावयाची आहे. नष्ट आशा म्हणजे च दुराशा किंवा दुष्ट आशा. ही टाकावयाची म्हणजे च भगवद्गीतेच्या शब्दांत

प्रजहाति यदा कामान् सर्वान् पार्थ मनोगतान् ॥ गीता. २-५५
किंवा
विहाय कामान् यः सर्वान् ॥ २-७१

व्हावयाचे. दुसऱ्या चरणाचा अन्वय ' प्रेमपाशा पिपाशा अंतरीं वसे ' म्हणजे भूतमात्रांचे ठिकाणीं आत्मौपम्य बुद्धि ( किंवा ममत्वाचा विस्तार ) धारण करावयाचा आहे ( Kingdom of love ). अर्थात् व्यतिरेकानें सांगावयाचें म्हटल्यास ' निर्ममो निरहंकारो ' ( २-७१ ) असें व्हावयाचे किंवा अन्वयानें ' सर्वभूतहिते रतः ' किंवा विश्वकुटुंबी व्हावयाचे. अर्थात् या मनाचे ठिकाणीं असलेल्या भावनेचा च हा विस्तार होय. हीं मर्में एथें उघड आणि स्पष्ट अशी वर्णिलेली आहेत. मन हा शब्द एरवीं अंतःप्रज्ञवाचक असला तरी मन आणि

अंतर असे दोन शब्द एकत्र वापरल्यास एक बहिःप्रज्ञ आणि दुसरें अंतःप्रज्ञ मन असें समजावयाचें आहे. ' अंतर ' शब्द भावनात्मक मनाचा बोधक आहे हें एथें स्पष्ट च निर्विवाद सिद्ध होतें. एक कामनात्मक व दुसरें भावनात्मक.

( ८ ) नसे अंतरीं कामकारी विकारी ।
निवाळा मनीं लेश नाहीं तमाचा ॥ ५० ॥

वरील श्लोकाप्रमाणें हा श्लोक आहे. अंतरींचें मन भावनात्मक आहे म्हणून त्याला ' विकारी ' म्हटलें आहे. ' कामकारी ' शब्दानें त्याचे ठिकाणीं ' कामनोत्पादकता ' आहे असा अर्थ होतो. प्रत्यक्ष कामनांचें स्थान बहिर्मन हें च. कारण त्याचा च विषयाशीं संबंध पोंचतो. परंतु अभ्यासानें जें बीज उत्पन्न होतें तें आंतर मनाचे ठिकाणीं राहतें. हें च अंतर्मन या बीजरूपी वासनांसह पुनर्जन्म घेतें. कारण शारीरिक ( Physical ) बहिर्मन त्यावेळीं मरून जात असतें. ज्ञान व अज्ञान हा विषय बहिर्मनाचा असलेमुळें चवथा चरण योग्य च आहे.

( ९ ) सदा सर्वदा मोकळी वृत्ति राहे ॥ ५७ ॥

( १० ) नको वासना वीषयीं वृत्तिरूपें ॥
मना कल्पना लेश तो ही नसावा ॥ ५८ ॥

हें ध्यान योगांतील लक्षण आहे. याचा पूर्ण विचार पूर्वी केला आहे. दासबोधांत या मोकळ्या वृत्तीविषयींचें विवेचन नाहीं असें वाटतें. याचें कारण त्यांतील मार्ग भिन्न आहे हें च. या मोकळ्या वृत्तीचें किंवा भ. गीतेच्या शब्दांत बोलावयाचें तर ' प्रशांत मनाचें ( गीता ६-२०एथील पा. १३ पहा ) ' फल ब्रह्मप्राप्ति असें सांगितलें आहे. समर्थांच्या मनाच्या श्लोकांचें व गीतेच्या सहाव्या अध्यायांतील मार्गाचें किती साम्य आहे हें पहिल्या दोन प्रकरणांत दाखविलें च आहे. त्याची एथें पुनरुक्ति नको.

( ११ ) प्रभातें मनीं राम चिंतीत जावा ॥ ( ६७-७६ पालुपद )
प्रभातें मनीं राम चिंतीत जावा ॥
पुढें वैखरी राम आधीं वदावा ।
सदाचार हा थोर सांडू नये तो
जनीं तोचि तो मानवीं धन्य होतो ॥ ३

या तिसऱ्या श्लोकाचा विचार करण्याचा राहिला. समर्थांनीं ६७-७६ यांत तें पालुपद घेतलें आहे. परंतु श्लो. ३ मध्यें हा एक थोर अनुल्लंघ्य सदाचार आहे असें सांगितलें आहे. हा प्रभातींचा अनुल्लंघ्य सदाचार इतर स्मृतिग्रंथांत

किंवा नित्य कर्मांच्या ग्रंथांत किंवा दुसऱ्या कोणा कवीच्या काव्यांत सांपडणारा नाहीं. त्याला हें अपूर्वस्वरूप या मनाच्या श्लोकांत कां देण्यांत आलें आहे ? या सदाचाराची फलश्रुती ' मानवी धन्यता ' असें अखेरच्या चरणांत सांगि-तलें आहे. ही ' मानवी धन्यता '

' जैसी विद्या तैसी हाव । जैसा व्याप तैसें वैभव ' । दासबोध ९-४-१२
विद्या नाहीं बुद्धि नाहीं । विवेक नाहीं साक्षेप नाहीं ।
कुशळता नाहीं, व्याप नाहीं । म्हणून प्राणी करंटा ॥ ९-४-९

अशा प्रकारची ' ऐहिक वैभवाच्या ' स्वरूपाची दिसत नाहीं. मनाच्या श्लोकांतील फलश्रुति सर्व पारमार्थिक स्वरूपाची दिसते.'मना सर्व लोकासि रे नीववावें ॥७॥ देह त्यागितां कीर्ति मागें उरावी ॥ ८ ॥ अशी वर्णनें आढळतात व तीं प्रथम दर्शनीं ऐहिक स्वरूपाचीं वाटतात. परतु सर्वसामान्य विचारसरणी पारमार्थिक स्वरूपाची असल्यामुळें यातील वर्णन हि पारमार्थिक च असलें पाहिजे. दासबोधांत समर्थ लोकसंग्रहाचीं कार्ये ( सकल लोकांचे मनो-गतीचीं कार्यें ) हातीं घ्यावीं आणि ' निर्मम ' व्याप वाढवावा असें सांगत'त तसें एथें क्वचित् च सागतात. ' निजकर्म ' किंवा ' देवकाज ( ४८ ) अशा एक च शब्द आणि तो हि द्व्यर्थी किंवा त्र्यर्थी स्वरूपाचा या श्लोकांत येतो. निजकर्म = ( १ ) ज्याला भगवद्गीतेंत जन्म कर्म च मे दिव्यं ( गी. ४. ९ ) असें म्हणतात तें किंवा ( २ ) मत्कर्म किंवा मदर्थी कर्म असें भगवान् ( म. गीता १२-१० ) सांगतात तें

किंवा ' यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत् ।
यत्तपस्यसि कौंतेय तत्कुरुष्व मदर्पणम् ॥ ९-२७

या प्रमाणें परमेश्वरार्पण बुद्धीनें करण्याचें कर्म ( सर्व कर्म संन्यास १२-६ ) असे तीन अर्थ संभवतात. यातील ( ४-९ आणि ९-२७ ) यांतील कर्म मात्र लौकिक आणि सामाजिक स्वरूपाचें आहे. तो अर्थ एथें हि घेतल्यास ऐहिक ' धन्यते ' चा समावेश एथें हि करितां येईल परतु एथील सर्व च विवेचन ' मानवी मन दैवी स्वरूपी ' करावें या हेतूनें केलें आहे असें या श्लोकांच्या फलश्रुतीवरून वाटतें. या श्लोकाची कर्मउपासना ज्ञान अशी त्रिकांडस्वरूपाची रचना आहे असें मानण्यांत येतें परंतु तें सर्वथा पटत नाहीं. ' मना सर्व लोकासि रे नीववावे ' ( ७ ) यातील मतलब ' सर्व कामना ' सोडण्याचें अत्यंत अवघड काम होत नसेल तर त्यापेक्षां स्वल्पतर कार्ये सांगून तीं च

गोष्ट घडवून आणणें हा आहे. त्या च प्रमाणें येथील धन्यता हि ऐहिक स्वरूपाची नसून पारमार्थिक स्वरूपाची आहे असें वाटतें. ' जगीं धन्य तो.दास सर्वोत्तमाचा ' या पालुपदांत किंवा ' जगीं होइजे धन्य या रामनामें (५७) या श्लोकात जो पारमार्थिक अर्थ आहे तो च वरील श्लो. ३ मध्यें आहे. असो.

इतका विस्तार करण्याचें कारण इतकें च कीं रामनामाचा आणि ऐहिक धन्यतेचा म्हणण्यासारखा संबंध नसल्यामुळें तो घेण्यांत येऊं नये हा एक. पण मुख्य मतलब या अपूर्व सदाचाराचा आणि या पारमार्थिक धन्यतेचा अन्योन्य संबंध होय. धन्यकृतकृत्य, मुक्त असा अर्थ होय. ज्या योगानें श्रीहरि पावला असें म्हणतां येईल. असा हा अपूर्व सदाचार कोणता ?

प्रभाते मनीं राम चिंतीत जावा ।
पुढें वैखरी राम आधीं वदावा ॥ ३

समर्थांचा हा उपदेश मानसशास्त्रदृष्ट्या फार च महत्त्वाचा आहे व म्हणून तो एथें केलेला आहे. त्या शास्त्राचें ' एक वैशिष्ट्य ' यांत गोवलें आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. सकाळीं उठून एकदां देवाचें स्मरण करावें आणि नंतर दिवसभर पोटापाण्याचा ' बगळुरा ' धंदा करावा याकरितां एक प्रकारची स्वैरवर्तनाची परवानगी ( license ) किंवा आगाऊ सभावना ही नव्हे उलट ' मुखें राम नामावली नित्य काळीं ' केली पाहिजे असें घयोदश कोटिरामनामाचा स्वतः जप करणारे समर्थ सांगत आहेत. स्फुट ओंव्या म. ३८-६,४६-४ ( पा. २२९ समर्थांची कविता पहा ). एकंदरींत काय कीं रात्रंदिवस राममंत्राचा घोष घ्यावा, क्षणभर हि वेळ, इतर कामांत, व्यर्थ घालवूं नये. फार काय, पण रामनामाशिवाय दुसरें कांहीं च बोलूं नये ( म. श्लो. २६,४३ ) किंवा बोलल्यास शीण वाटावा असें समर्थ बजवजावून सांगतात. त्या अर्थी असा या स्वयंसूचनेचें वैशिष्ट्य काय असावें बरें ? वैखरींतून कोणता हि दुसरा उच्चार निघण्यापूर्वी रामनामाचें च चिंतन व रामनामोच्चार च झाला पाहिजे असें शक्य आहे काय ? नसल्यास असें सांगण्यांत कांहीं मतलब आहे काय ? शक्य असल्यास केव्हां, याचा विचार केला तर असें दिसून येईल कीं आपल्यास वाटतो इतका हा नियम सोपा नाहीं. पुढें प्रतिपादलेल्या रामनामाच्या निदिध्यासाचा हा ' श्रीगणेशा ' आहे किंवा त्याच्या पूर्वाभ्यासाचा हा परिणाम आहे ? याचा विचार पुढील अंकीं करूं.

( १३२ )

॥ श्रीराम ॥

# श्रीसमर्थसंप्रदायजीर्णोद्धारादिकार्याचा

## जमाखर्च वगैरे

१८५२ भाद्रपद शु. ३/३ (ता. २६।८।३०) पासून
कार्तिक शु. १ (ता. २२-१०-३०) पर्यंत

| जमा | खर्च |
|---|---|
| २४-०-० श्री. दुर्गाराम बालदरिदास, मगलोर | ७८० ० ० स्थापत्यविशारद श्री. वासुदेवराव गोगटे यांच्या खातीं नावें |
| ३-०-० अंबालाल गोविंद मुसळे, मु. पादरा, प. बडोदें | २५० ता. ११।९।३० |
| २०-०-० V. N. Kalyanpur, Bangalore, यांचेकडून प्रिय व सद्गुणी पुत्र रामदास यांच्या स्मरणार्थ आठवा व नववा हप्ता | १०० ता. १७।९।३० |
| | २३० ता. १।१०।३० |
| | २०० ता. १८।१०।३० |
| | ४६-४-० प्रवासखर्च |
| | ४- ६-६ टपालखर्च, रजिस्ट्रेशन, इन्शुअरन्स वगैरे |
| | ८३०-१०-६ एकूण खर्च |

२५- ०-० श्रीसेवक भवानीशंकर रामचंद्र देवळे, विलेपार्ले, यांच्या मार्फत मागील अंकीं जाहीर केलेल्या ३५ रु. च्या आश्वासनापैकीं

१- ४ ० ना. पा. नवरे, मुंबई (श्रावणीपट्टीमंडळातुर्फे)

१- ४ ० मातुःश्रीच्या अविधवा नवमी श्राद्धदिनीं निराळे काढलेले–हस्तें बाबु व अण्णा नवरे, मुंबई

१- २-० 'भौमे चंद्रग्रहणनिमित्तम्' हस्तें ना. पा. नवरे, मुंबई

३३- ० ० श्रीसेवक अनंत सखाराम वणीकर, अहमदाबाद, १० ऑगष्ट + १० सप्टेंबर + १३ हवर, मिळून

३-१२- ० श्री. रामचंद्र धोंडो दारवाने, पुणें, यांचे मार्फत १ नारायण सठे वैद्य, १ डॉ. डी. आर. गुरुबंधु, २८१२ किरकोळ

२५- ८-१० धुळे पोष्ट ऑ. से. बँकेचें ता. १।४।१० पर्यंत व्याज

५० श्री. भवानीशंकर रामचंद्र देवळे, विलेपार्ले, यांनी श्री. गोपाळ कृष्ण वेहेकर यांच्या सहकार्यांनें जमविलेले, मागील आश्वासना-पैकीं राहिलेले दहा व नवीन चाळीस.

## ४३९-१५-० बडोदे येथील मदतीचा पहिला हप्ता

५१-०-० गंगाधर माधव तांबे

१००-०-० S. M. Dighe, शिवराम काशीनाथ भागवत, लक्ष्मण गोविंद धाणेकर, अनंत नरहर ऊर्फ बाळासाहेब महाजन, प्रत्येकीं २५

१५-०-० श्रीमंत आबासाहेब मुजुमदार

११-०-० शंकर बळवंत तांबे

७०-०-० प्रो. नारायण काशीनाथ आपटे, वासुदेव विनायक जोशी, दाजी नागेश आपटे, भगवंत रामचंद्र देव, B. N. Patkar, नरहर बळवंत खिडकीकर, जनरल नानासाहेब शिंदे, प्रत्येकीं १०

६-०-० राजाराम आतोबा परब

६५-०-० जडे बधु, R. N. Patkar, लक्ष्मण बळवंत पुणेकर, नथु हरि शेंब, प्रो. माणिकराव, रामचंद्र सदाशिव जोगदंडे, बापुराव बळवंत ठोसर मास्तर, महादेव बळवंत देसाई, गणेश विष्णु शारंगपाणी, गणेश रामचद्र माजगांवकर, श्रीधर भास्कर जोशी, नरहर बाळकृष्ण अकोलकर, दत्तात्रय परशुराम जोशी, प्रत्येकीं ५

३-८-० चिंतामण विनायक जोशी

३-०-० वासुदेव गणेश म्हसकर ऊर्फ गणपती बुवा

८-०-० वामन आप्पाजी निक्ते, लक्ष्मण महाराजांचा मठ, गोपाळ विष्णु भागवत, रामचंद्र दामोदर दामले, प्रत्येकीं २

२-०-० लक्ष्मण रामचंद्र दाते, कृष्णाजी रामचंद्र धुपकर, बळवंत वामन महाबळ, प्रत्येकी १

१-८-० किरकोळीनें

५५-१५-० ता. २४-९-३० रोजीं प्रवचनानंतर समारथानीं

११ महादेव बाळकृष्ण आपटे

१० श्रीसमर्थकृपा ( र. आ. मि. )

१० वसईकर गणपत पिराजी सनईवाले यांचे मार्फत

५ शंकर बापुजी सनईवाले

३ गोविंद रामचद्र

२ भगवंत पांडुरंग

५ जयशंकर मगनलाल वकील

५ सीताराम सुत्राव कानगो

२ कृष्णाजी हरि मनोहर

१२ केशव गणेश डोंगरे, दत्तात्रय मोरेश्वर काटदरे, अं. बा. दामले, रामभाऊ साने, रा. श. नाडु, त्रिं. ग. पारपुरे, केशव गणेश आपटे, के. कृ. हळवे, महिपत कृष्ण अधिकारी, श्री. धी. कार्णिक, रा. बा. फडके, श्रीसमर्थ-कृपा, प्रत्येकीं १

०१५ किरकोळ

४७-८-० ता. २५-९-३० रोजीं प्रवचनानंतर समारथानीं

८०८ श्रीसमर्थसेवक वज्रमुष्टीमंडळ

७ वसईकर गणपत पिराजी सनईवाले यांचे मार्फत, रघुनाथ रामचंद्र, मार्तंड, काशीनाथ धोंडीबा, ज्ञानबा तुळशीराम, गगाधर तुकाराम, बालकृष्ण मारुती व शंकर पुजाजी प्रत्येकी १

५ शंकर गोपाळ डोंगरे

४०४ लक्ष्मणमहाराजांच्या मठांतील मित्रमंडळ

२ गोपाळ अमृत ढाकळकर

२ विनायक सदाशिव बर्वे
१४ म. वि. सहस्रबुद्धे, गो. ब. शेवडे, विष्णु स. चित्रे, रा. चिं. मावे, गं. स. जोशी, वसंत बळवंत कप्तान, श्री. शं. गोळे, भालचंद्र वि. परांजपे, ग. बा. महाजनी, श्रीसमर्थकृपा, रामचंद्र राजाराम राजे, प. गो. काटदरे, चिंतामण गो. जोशी, रामचंद्र माधव बर्वे, प्रत्येकी १
४८१२ किरकोळ

१४६५-१४-६ इंदुर येथील मदतीचा पहिला हप्ता

१००८ श्रीमंत सौभाग्यवती महाराणी इंदिराबाई मासाहेब होळकर यांचे कडून तुलसीपत्र म्हणून श्री दत्त
२५ सरदार माधवराव विनायक किबे ( १२५ पर्यंत दरमहा २५ प्रमाणें )
१०१ शेट कन्हयालालजी भंडारी
२५ सरदार शंकरराव बाबाजीराव चांगण, बार-अॅट-लॉ
२५ कै. श्रीमती सौ. सुमतीबाई नानुजीराव यांचे स्मरणार्थ हस्तें श्री. विनायकराव ताळचेरकर
२१ सरदार मार्तंडराव नारायणराव ऊर्फ बाबासाहेब भागवत
२० सौ. आनंदीबाई केशवराव पुराणिक
२० शंकर दत्तात्रय गोसावी, हस्तें डॉ. शौनिशाय
१० श्री. लक्ष्मण बळवंत जांभेकर
५ श्रीसमर्थकृपा
४ श्री. गंगुताई जोशी मंडलेश्वर
२ यशवंत गणपत वडगांवकर
१८१२ गोपाळ त्रिंबक ढवळे

१४ श्रीसमर्थकृपा, नरहर कृ. क्षीरसागर, श्री. यमुनाबाई पाठक, केशवराव वारगळ, केशवराव करमरकर, सौ. यमुताई कोठारी, स. श्री. पंडित, श्रीविठ्ठल, श्री. सुंदराबाई सबनीस, श्री. वेणुताई कर्णिक, श्री. लक्ष्मीबाई लोंढे, श्रीसमर्थकृपा, वि. रा. करमरकर, सीताराम भास्कर निवलकर, प्रत्येकी १

८८ एल्. एम्. पेठे

८९-७-३ ता. ११-१०-३० रोजीं प्रवचनानंतर समारंभानीं

२५ श्री. भवानराव बनसुडे, महु

११ श्री. पुरुषोत्तम सदाशिव किंबे

७८४ Companion girls of Shri Maharani Saheb

२० माणिक नागेश पै, आत्माराम विठ्ठल योगी, B. M. Joshi, दीनानाथ मामादेव तालचेरकर, प्रत्येकीं ५

२ पुरुषोत्तम गोविंद लट्टु

१८४ दत्तात्रय लक्ष्मण रेडगांवकर

१८ मोरेश्वर रा. पुराणीक, र. गो. सहस्रबुद्धे, तु. के. आजेगांवकर, श्रीसमर्थकृपा, श्रीसमर्थकृपा, शंकरराव मा. माकोडे, गो. स. ओक, गो. रा. वाकणकर, वा. का. साठे, ना. वा. पतवैद्य, शं. खं. जोशी, रा. वि. लोंढे, शं. रा. भोपटकर, वा. ना. टिकेकर, शि. ना. लोंढे, करंदीकर, श्रीसमर्थकृपा, ओक, प्रत्येकीं १ प्रमाणें

४८१५८३ किरकोळ

९४-२-३ ता. १२-१०-३० रोजीं प्रवचनानंतर समारंभानीं

१० श्री. माधवराव कृष्ण वागळे

१० सौ. कौसल्याबाई गावडे

१० श्री. विनायक सीताराम सरवटे

५ डॉ. बळवंत नारायण देव
५ श्री. माधव बाळकृष्ण देव
५ H. A. Talcherkar Esq.
५ श्री. सरस्वतीबाई म्हाळस
५ श्री. विनायक पांडुरंग माटे
३ वा. व. श्रीखंडे
२ वामन गणेश चितळे
२ विश्वनाथ हरिहर शास्त्री द्रविड
२८ पद्माकर बळवंत देव, रखमाबाई अभ्यंकर, वि. श्री. जोग, वी. श्री. घारपुरे, माधव ना. गवळी, श्रीसमर्थकृपा, केशवराव भाटे, र. य. आळेकर, श्रीसमर्थकृपा, श्रीसमर्थकृपा, वि. ना. काळेले, रा. ना. काळेले, रा. ह. मुनल, दा. म. कवीश्वर, पुरुषोत्तम देशपांडे, डॉ. श्री. घा. भागवत, कमळाबाई भावे, बकुताई एकबोटे, G. B. Deshmuhk, धुं. ना. जांभेकर, अ. म. दामले, वि. ग. दुराफे, र. ना. खांडेकर, य. र. मुद्रे, श्रीसमर्थकृपा, स. कृ. गंदे, श्रीसमर्थकृपा, पंढरीनाथ घोडगांवकर, प्रत्येकी १
४८२८३ किरकोळ
८१ दोन सुपाऱ्या आल्या त्यांची किंमत म्हणून

१-०-० श्रीसमर्थकृपा

२१०४-१२-४ एकूण नवीन जमा
३३५९- ७-२ मागील शिल्लक
५४६४- ३-६ एकूण जमा
८३०-१०-६ एकूण खर्च वजा
४६३३- ९-० एकूण शिल्लक, पैकीं

२६-०-० धुळ्याचे पोस्टल बँकेंत
२६७२-४-० सत्कार्योत्तेजक सभेकडे ठेव
१९३५-५-० चिटणीसाजवळ वरती

४६३३-९-०

## आजपर्यंत एकंदर रोख जमा रुपये २७८८८-६-०

मंदिरास सुरवात झाल्यापासून म्हणजे १०८ व्या अंकापासून .तो चालू अंकापर्यंत आलेल्या जमाखर्चावरून नजर फेकून व कांहीं आंकडेमोड करून स्थूल मानानें असें म्हणतां येतें कीं, आतापर्यंत छापणावळ, प्रवासखर्च, टपालखर्च वगैरे खर्च ३३१-१०-९ झाला व केवळ मंदिराप्रीत्यर्थ खर्च १६०५७-७-३ झाला. आणखी चवदा हजार लागतील असे मानले तर त्यांतील ४६३३-९ शिल्लक आहेत व अजून आपणांस नऊ दहा हजार रुपये मिळविले पाहिजेत. मला व श्रीसमर्थसेवकांना अजून किती दगदग केली पाहिजे याची कल्पना व्हावी, म्हणून ही आंकडेमोड केली !

अजून नऊ दहा हजार रुपये मिळविले पाहिजेत, हें स्वयंसेवकांनीं विचारांत घेऊन जास्त प्रयत्नास लागावें अशी विनंति आहे.

धुळें
१८५२ कार्तिक शु. १ } शंकर श्रीकृष्ण देव

[ १३३ ]

# पांचव्या दौऱ्याची हकिकत

## — बडोदे व इंदुर —

गेल्या महिन्यांत महाराष्ट्राच्या दोन वसाहतींच्या दोन प्रमुख शहरीं श्रीसमर्थकार्यासाठीं जाऊन आलों. ता. २२ ते २६ सप्टेंबर असे पांच दिवस बडोद्यास व ता. ९ ते १३ आक्टोबर हे पांच दिवस इंदुरास होतों. बडोद्यास तीन निरनिराळ्या ठिकाणीं प्रवचनें झालीं व श्रीसमर्थमंदिरासाठीं पहिला हप्ता म्हणून ४१९८१५ मिळाले, दहा सद्‌गुरुरहस्य मासिकाचे नवीन ग्राहक झाले व शें सवाशें रुपयाचे श्री रामदासी ग्रन्थ खपले. पहिलें प्रवचन प्रो. माणिकराव यांच्या जुम्मादादाव्यायामशाळेच्या पटांगणांत झालें, दुसरें जयसिंहराव वाचनालयाच्या आवारांत व

तिसरें श्रीमंत आबासाहेब मुजुमदार यांच्या भव्य वाड्यांतील श्रीरामचौकांत झालें. सर्वांनीं अत्यन्त आस्थेनें व मनोभावानें सहाय्य केलें, पण मदत थोडी झाली असें कित्येकांस वाटलें व आरंभीं आम्हांस हि तसें च वाटलें. पण बडोद्यांतील महाराष्ट्रीयांच्या लोकवस्तीच्या मानानें झालेली मदत थोडी म्हणतां येत नाहीं. खुद्द बडोद्यास आपली वस्ती अवघी वीस पंचवीस च हजारांची आहे, त्या मानानें झालेली मदत पुष्कळ च म्हटली पाहिजे. शिवाय हा पहिला हप्ता आहे, हें लक्षांत घेतलें पाहिजे. महाराष्ट्रांतील प्रत्येक घराकडून श्रीसमर्थ-मंदिरास कमींत कमी एक मूठभर चुना मिळाला पाहिजे, असें मला वाटतें, पण अशा धर्मकार्याला जास्त मदत करा असा आग्रह कोणी कोणास केल्याचें मला आवडत नाहीं. मला वाटतें, अशा कामीं प्रत्येकानें स्वयं-स्फूर्तीनें जी मदत करणें असेल ती च करावी, कोणी हि विनाकारण मरीं मरूं नये व कोणाच्या सांगण्यावर जाऊं नये. जो धर्म, करतांना आणि केल्यावर, संतोषाला कारण होईल तो च खरा धर्म. असा च धर्म प्रत्येकानें करावा. कष्टानें केलेला किंवा केल्यावर कष्टाला कारण झालेला धर्म या मंदिराच्या कामीं मुळीं च उपयोगी नाहीं. असा माझा विश्वास आहे व तो मी सर्वत्र निः-संदिग्ध रीतीनें व्यक्त करीत असतो. मंदिर पुरें व्हावयाचें आहे व चार अकारण निंदका खेरीज प्रत्येक महाराष्ट्रियाच्या मनांत श्रीसमर्थाविषयीं निस्सीम प्रेम वसत आहे, या दोन गोष्टी मला ठाऊक असल्यामुळें मंदिरासाठीं कोणाला हि आग्रह करण्याचें कारण राहत नाहीं.

प्रो. माणिकराव यांची संस्था जगविख्यात आहे. एकाद्याला एका च कार्याचा ध्यास लागला म्हणजे हळुहळु त्या कार्याचा व्याप कसा वाढत जातो, याचें माणिकरावांची संस्था हें एक ठळक उदाहरण आहे. व्यायाम-शाळेचें ठिकाण भव्य आणि रम्य आहे. आखाडा प्रशस्त असून शेजारी असलेल्या श्रीशिवरायाच्या मंदिरानें त्याला रमणीयता आली आहे. आखा-ड्याला लागून वाचनालय, त्याच्या पलिकडे शस्त्रागार आणि त्याच्या हि पलिकडे माणिकरावाचा दवाखाना आहे. शस्त्रागारांत मौल्यवान् व ऐतिहासिक शस्त्रास्त्रांचा विपुल संग्रह व्यवस्थित रीतीनें मांडलेला आहे. प्रोफेसरसाहेबांनीं तो आम्हांस मोठ्या आस्थेनें दाखविला. तीं विविध शस्त्रास्त्रें पाहून आमची दृष्टि दिपून गेली. ही तलवार श्रीशिवछत्रपतींची, हें अस्त्र राजस्थानांतील, तो जंबिया आणखी कोणाचा, असें वर्णन करीत

माणिकराव त्या वस्तु हातांत घेऊन दाखवित असतां, आम्हांस कौतुक वाटून आम्ही त्यांना विचारिलें, या अपूर्व ऐतिहासिक वस्तु तुम्ही कशा मिळविल्या? त्यांनी पट्‌कन पण विनोदानें उत्तर दिलें, जसे तुम्ही कागदपत्र मिळवितां तसा; तुम्हांस कागदपत्रांचा छंद, आम्हांस हा छंद. तुम्ही या शस्त्रास्त्रांचें भरामर वर्णन करितां तें कसें, असें विचारतां च ते हंसून म्हणाले, जसें एकाद्यानें ग्रन्यराज दासबोधांतील ओव्या भरामर म्हणाव्या त्याप्रमाणें. या तऱ्हेची माणिकरावांची ही संस्था आद्य संस्था होय, ती राष्ट्राला भूषणावह आहे, तिच्या हातून आजवर पुष्कळ कामगिरी झाली आहे व जास्त होण्याची तिच्या ठिकाणीं योग्यता आहे.

जें कौतुक प्रो. माणिकराव यांची संस्था पाहून वाटलें, तें च श्रीमंत आबासाहेब मुजुमदार यांची हि संस्था पाहून वाटलें. त्यांचा हि आखाडा प्रचंड आहे. आवार फार च मोठें आहे. त्यांत स्त्रिया आणि पुरुष यांची निरनिराळ्या वेळीं पोहण्याची उत्कृष्ट सोय केली आहे. माणिकराव आणि आबासाहेब यांच्या संस्थांत जो फरक आहे तो हि अनुरूप च होय, असें म्हटलें पाहिजे. क्षत्रियभूषण माणिकरावांच्या संस्थेंत शस्त्रास्त्रांचा संग्रह प्रमुखपणें आहे, तर ब्राह्मण्याला साजेसा असा विपुल ग्रन्थसंग्रह आबासाहेबांच्या संस्थेंत आहे. संस्थेला जोडून आबासाहेबांचा छापखाना आहे व त्यामार्फत आज पंधरा वर्षें व्यायाम या नांवाचें सचित्र उपयुक्त मासिक पुस्तक प्रसिद्ध होत आहे. आबासाहेबांनी आणखी एक नवीन च व्याप आरंभिला आहे. पांचशें पांचशें पृष्ठांचा एक एक सचित्र खंड, अशा पांच खंडांत व्यायामज्ञानकोश प्रसिद्ध करण्याची त्यांनी नुकती च योजना केली आहे. आपल्याकडे हा उद्योग नव्यानें च होत आहे. अमेरिकेंत असा एक शंभर रुपये किंमतीचा ' एनसायक्लोपीडिया ऑफ फिजिकल कलचर ' प्रसिद्ध झाला असून त्याच्या आतांपर्यंत अनेक आवृत्त्या निघाल्या आहेत. त्या धर्तीवर आपल्या मराठींत आपल्या विशिष्ट पद्धतीला अनुसरून असा प्रचंड व्यायामज्ञानकोश तयार होण्याला योग्य स्थान म्हणजे बडोदे शहर हें च होय व ती जबाबदारीची कामगिरी महाराष्ट्रीयांच्या सहानुभूतीनें आबासाहेब च पार पाडूं शकतील, असा आमचा विश्वास आहे. या कोशाचें सुबक योजनापत्रक हि उद्बोधक आहे. व्यायामप्रिय वाचकांनीं तें आबासाहेबांकडून मागवून घ्यावें.

सर्व संस्थानांत राज्यव्यवस्थेच्या दृष्टीनें बडोदें संस्थान अग्रणी होय, अशा या संस्थानचा असलेला लौकिक यथार्थ असावा, असें वाटतें. मला आणखी कांहीं माहित नाहीं व मी जास्त कांहीं पाहिलें हि नाहीं, पण या राज्यांतील दोन च संस्था माझ्या नजरेस पडल्या व त्या मला अपूर्व वाटल्या. संस्था कदाचित् अपूर्व नसतील हि, तशा संस्था नांवानें इतरत्र हि असतील, पण त्यांची या संस्थानांत जी योग्य जोपासना होत आहे, ती मात्र अपूर्व होय. त्या दोन संस्था म्हणजे (१) राज्याचें दप्तर, त्याचें रक्षण आणि प्रकाशन व (२) संस्कृत, प्राकृत, पाली इत्यादि भाषांतील प्राचीन हस्तलिखित ग्रन्थांचा संग्रह व त्याचें रक्षण आणि प्रकाशन. राज्यांतील हीं दोन स्वतंत्र खातीं च आहेत व त्यांवरील अधिकारी व इतर मंडळी अशी स्वतंत्र योजना आहे. दप्तराच्या रक्षणासाठीं तीन मोठाल्या इमारती आहेत व त्यांत सर्वत्र लोखंडी शिड्या आहेत. तपासांत असें कळलें कीं सन १७२८ ते १८१८ या काळांतील अवघीं थोडीं च दप्तरें आहेत व त्यांतील महत्त्वाच्या कागदपत्रांच्या प्रकाशनाचें काम हातीं घेण्यांत आलें आहे. मूळ महत्त्वाच्या अस्सल कागदांवर यापुढें कालाचा काहीं एक परिणाम होऊं नये व हाताळून ते खराब होऊं नयेत म्हणून प्रत्येक कागदाला पुढून व मागून विशिष्ट कापड विशिष्ट खळीनें चिकटविण्याचें काम चालू असल्याचें पाहिलें. ही कृति माझ्या पाहण्यांत पूर्वी आली नव्हती व ती मी कांहीं विशिष्ट हेतूनें समजावून घेतली. कागदाला दोन्ही बाजूंनीं कापड लावलें आहे, हें सांगितल्याशिवाय उमगत नाहीं, इतकें तें कापड बारीक असतें. तें जपानांत होतें व त्यास चिफॉन म्हणतात. तें मुंबईस मिळूं शकतें. कोणत्या द्रव्यांची खळ करावयाची व ती कशी करावयाची हें मी समजावून घेतलें आहे, तरी पण तशी खळ करून व तें कापड मिळवून श्रीसमर्थांच्या अस्सल पत्राला तें चिकटविण्याचा हिय्या मला होईल, असें वाटत नाहीं. तज्ज्ञाच्या हातून च तें काम झालें पाहिजे. हस्तलिखित ग्रन्थांचा संग्रह नुसता दुरून पाहिला आणि कौतुक केलें ! उभ्या उभ्या याहून दुसरें कोण काय करणार ! सर्व दोन वर्षे रहावें तेव्हां त्या संग्रहाच्या अंतरंगाची किंचित् ओळख व्हावयाची ! सत्कार्योत्तेजक सभेच्या संग्रहांत आवडास मिळालेली जशी श्रीमत् भगवद्गीतेची अपूर्व सचित्र प्रत आहे, तशी च हुबेहुब बडोद्याच्या या संग्रहांत एक प्रत असलेली पाहून नवल वाटलें !

यावरून कोणत्या तरी काळीं छापखान्यावांचून ग्रन्थांच्या सारख्या च सचित्र प्रती करविण्यांत येत होत्या, असें स्पष्ट दिसतें; असो.

बडोद्यास एक लहानसा च पण कार्यक्षम असा वाङ्मयसेवकांचा मित्रसंघ आहे. माझ्या कार्यांत त्या संघाची मला फार मदत झाली. नामनिर्देश कोठें करूं पण प्रत्येक जण च उपयोगीं पडला. तसें च बडोद्यांत कांहीं निष्ठावंत श्रीसांप्रदायिक आहेत. असणार च, कारण आज सुमारें संभर वर्षांपासून शिरगांव मठाखालील श्रीलक्ष्मणमहाराजांचा मठ बडोद्यास आहे. त्या सर्वांनीं आपलेपणानें कार्याला सहाय्य केलें. मी सर्वांचा ऋणी आहे.

पश्चिम खानदेशांतील तळोद्याचे जहागीरदार श्री. कृष्णराव आनंदराव बारगळ, हे, विनति केल्यावरून, मुद्दाम मजबरोबर इंदुरास आले होते. मंदिराच्या दृष्टीनें इंदुरचा कार्यक्रम विशेष यशस्वी झाला. श्री. घोंडेमहाराजांच्या श्रीगोवर्धनसंस्थेच्या कीर्तनकार प्रचारिका श्री. रंगुताई, श्री. सुंदरताई व श्री. वेणुताई यांचा चार महिने तळ इंदुरास च पडलेला असल्यामुळें त्यांच्या कीर्तनांनीं इंदुरचें वातावरण आधीं च श्रीसमर्थमय झालेलें होतें. मी आज दोन वर्षें पहात आहे, या त्रिवर्ग भगिनी समाजाची, धर्माची, गायींची व संप्रदायाची फार उत्कृष्ट सेवा करीत आहेत. त्यांच्या कीर्तनांनीं इंदुरच्या स्त्रियांमध्यें तर श्रीसमर्थसंप्रदायाविषयीं विशेष च आस्था उत्पन्न झालेली असल्याचा मला प्रत्यय आला. शिवाय संतचरित्रांत रंगून गेलेले प्रेमळ भगवद्भक्त श्री. लक्ष्मणराव पागारकर यांचा इंदुरच्या लोकांना मागें कांहीं काळ सहवास घडल्यामुळें श्रीसमर्थांचें अवतारकार्य सहानुभूतिपूर्वक श्रवण करण्याची जनतेची तयारी आधींपासून च झालेली होती. सौ. कमळाबाईसाहेब किबे व सरदार माधवराव विनायकराव किबे साहेब या उभयतांना आरंभापासून च श्रीसमर्थकार्याचें अगत्य असल्याचें मला ठाऊक होतें. इतर संप्रदायाभिमानी हि लहान मोठी मंडळी इंदुरास होती. मी इंदुरास पोंचलों तो दिवस श्रीमंत राजकन्या सावित्रीबाईसाहेब यांच्या अनुज्ञेनें चालू असलेल्या श्रीशारदी नवरात्रमहोत्सवाचा शेवटचा दिवस होता. त्या उत्सवासाठीं लो. टिळकमहाविद्यालयाचे कुलगुरु रा. ब. चिंतामणराव वैद्य यांचें आगमन झालें होतें. महोत्सवांत आदल्या दोन दिवशीं त्यांचीं व्याख्यानें झालीं असून त्या दिवशीं त्यांचें शेवटचें व्याख्यान होतें. त्याचा लाभ मला अनायासें झाला. दुसऱ्या दिवसापासून श्रीसमर्थांच्या अव-

तारकामांवरील प्रवचनें सुरू व्हावयाचीं होतीं. मंडळींनीं आग्रह करून पहिल्या प्रवचनासाठीं रावबहादुरांना ठेवून घेतलें. त्यामुळें पहिल्या च प्रवचनाला ते अध्यक्ष लाभले. महाराष्ट्रसाहित्य सभेनें प्रवचनांची योजना केली होती. साहित्य सभेचे अध्यक्ष श्री. स. माधवराव किबे साहेब ते च प्रवचनाच्या दुसऱ्या आणि तिसऱ्या दिवशीं अध्यक्ष होते. प्रवचनांचें आमंत्रण श्रीमंत सौ. महाराणी इंदिराबाई साहेब, श्रीमंत मासाहेब, श्रीमंत राजकन्या वगैरे सर्व राजस्त्रियांना देण्यांत आलें होतें व तें त्यांनीं पूर्वीपासून अंतःकरणांत वसत असलेल्या श्रीसमर्थप्रेमादरानें स्वीकारलें होतें. आपल्या आगमनानें राजस्त्रियांनीं प्रवचनांचें महत्त्व वाढविलें होतें. अशा सर्वतोपरि अनुकूल परिस्थितींत प्रवचनें झाल्यामुळें इंदुरास श्रीसमर्थकार्याला जें यश आलें त्याचें सारें श्रेय वरील कारणपरंपरेकडे आहे. प्रयत्नावांचून मंदिरास सुमारें १५०० रुपये मिळाले. सर्वांच्या उपकाराचें स्मरण होतें, पण नामनिर्देशपूर्वक आभार मानण्याचें काम मोठें कठीण असतें. इंदुरास थोरांपासून लहानांपर्यंत सर्व स्त्रीपुरुषांनीं प्रेमपूर्वक श्रीसमर्थकार्याला मदत केली. मी सर्वांचा ऋणी झालों आहे.

धुळें–१८५२ कार्तिक शुद्ध ५

---

( १३४ )

॥ श्रीराम ॥

## श्रीमद्दासबोधांतर्गत ' अध्यात्मग्रंथ '

( ले.–वामन दामोदर तळवलकर, पुणें )

( १ ) श्रीमत् ग्रंथराज दासबोध हा ग्रंथ मूळपासून आजच्या च स्वरूपांत नव्हता ही गोष्ट सर्वमान्य आहे. आजच्या ग्रंथाचे अखेर

> वीस दशक दासबोध । श्रवणद्वारें घेतां शोध ।
> मननकर्त्यास विशद । परमार्थ होतो ॥ २०।१०।३१
> वीस दशक दोनीसे समास । साधकें पाहावे सावकास ।
> विवरतां विशेषाविशेष । कळों लागे ॥ २०।१०।३२

अशा ओव्या आहेत. त्या अर्थी समर्थांनीं च या ग्रंथाला हें स्वरूप दिलें हें खरें, तथापि त्याचें मूळचें स्वरूप कोणतें असावें याबद्दल वाद आहे.

श्री. पांगारकर म्हणतात, मूळ २१ समासी दासबोध असावा व नंतर पुढें सात दशकी, नंतर आठ दशकी व नंतर २० दशकी असा तो वाढत वाढत गेला.

( २ ) मला तर वाटतें कीं पहिल्या दशकाचा पहिला समास च काय, पण संबंध पहिला दशक सातव्या दशकानंतर लिहिला गेला. पहिल्या दशकाचा पहिला समास प्रस्तावनारूप असून तो वीस दशकाची रूपरेषा किंवा रचना ठरल्यानंतर लिहिला गेला. त्या ( पहिल्या ) दशकाचे बाकीचे समास ही सातव्या दशकांतील पहिल्या समासाची वाढविलेली आवृत्ति च दिसते. मूळग्रंथाची रूपरेषा व सुरवात या सातव्या समासांत दिसून येते. आरंभीं च श्री मंगळमूर्तीचें व वेदमातेचें नमन असून ' समर्थ सद्गुरूं'ना देहविण लोटांगण घातलें आहे.

मंगळमूर्ति आद्या । पासून जाल्या सकळ विद्या ।
तेणें कवि लाघव गद्या । सरस्वती जाले ॥ ७. १. ३

असें मंगळमूर्तीचें स्तवन केलें आहे. पुढें साधुसंत सज्जनांना आणि श्रोते जनांना वंदून

आतां कथानुसंधान । सावध ऐका ॥ ७. १. १९

अशी विनंति करून ग्रंथास प्रारंभ केला आहे. नंतर ग्रंथाचें प्रयोजन व नांव सांगितलें आहे

बहुतीं केल्या येरझारा । नेणोनिया परमेश्वरा । भोगिले कष्ट ॥ ७. १. २५
त्या कष्टाचें निरसन । व्हावया पाहिजे आत्मज्ञान ॥
म्हणोनि हें निरुपण ॥ अध्यात्मग्रंथ ॥ ७-१-२६

( ३ ) असें हें ग्रंथाचें नाव ठेवतांना त्याचें महत्त्व, भगवंतांच्या विभूतिरूपानें,

आध्यात्मविद्या विद्यानाम् ॥ गीता १०-३२

असें गाऊन नंतर श्रोत्याचा अधिकार व त्याचे चार पांच प्रकार वर्णिले आहेत. ते असे:—

( १ ) जयाचें चंचळ हृदये । तेणें ग्रंथ सोडूंचि नये ॥
सोडितां अलभ्य होये । अर्थ येथीचा ॥ ७.१.२९

( २ ) जयास जोडिला परमार्थ । तेणें पाहावा हा ग्रंथ ॥
अर्थ शोधितां परमार्थ । निश्चयें बाणे ॥ ३०

पात्रद्वये यथा स्वार्थं स्वादभेदो न विद्यते ॥

तथापि प्राकृता करितां । संस्कृताची सार्थकता ।
येन्हवीं त्या गुतार्था । कोण जाणे ॥ ४०

अशा प्रकारें अध्यात्मज्ञान 'सुगम आणि सुमचित' करण्याकरितां समर्थांचा अट्टाहास च दिसतो. कारण ते म्हणतात हें गुह्य अध्यात्मज्ञान सर्वांस सुलभ करण्याकरितां

अभिमानें करावी खटपट ॥

कारण नाना अहंतेनें वाट । रुधिली मोक्षाची ॥ ४४

अशी या शिष्ट म्हणविणाऱ्या ब्राह्मणादिकांना समर्थांनीं इशारत हि दिली आहे; असो. असें हें शंकानिरसन ग्रंथारंभीं असावें कीं ग्रंथमध्य असावें याचा वाचकांनीं अवश्य विचार करावा.

( ५ ) हा ग्रंथ एकदशकी च मूळ असावा. एवढ्याशा एकदशकी लहानशा काव्यरूपी गद्याला ग्रंथ कसें म्हणावें असें वाटून च कीं काय ग्रंथ कशाला म्हणावे अशी शंका घेऊन त्याचें हि उत्तर समर्थांनीं दिलें आहे. श्रुति किंवा उपनिषदाप्रमाणें अध्यात्मसाधन म्हणजे

आत्मा वारे द्रष्टव्यः श्रोतव्यः मंतव्यः निदिध्यासितव्यः । हेंच.

या श्रुतिवाक्याप्रमाणें श्रवण, मनन आणि प्रतीति हीं अध्यात्मसाधनें होत. म्हणून श्रवणमननाचें स्वरूप स्पष्ट करीत असतांना अद्वैत ग्रंथांना च काय तें ग्रंथ हें नांव शोभतें असें दर्शवितात. यथाः—

आतां श्रवण कैसें करावें । तें हि सांगिजेल आघवें ।
श्रोता अवधान धावें । एकचित्तें । ७-९-१
जेथें संशय तुटती । होये आशंकानिवृत्ति ।
अद्वैत ग्रंथ परमार्थी । श्रवण करावे ॥ ७-९-५
बहुत प्रकारें पाहातां । ग्रंथ नाहीं अद्वैतापरता ॥ २८
जेणें परमार्थ वाढे । अंगीं अनुताप चढे ।
भक्तिसाधन आवडे । त्या नांव ग्रंथ ॥ ३०
जेणें होये उपरति । अवगुण पालटती ।
जेणें चुके अधोगति । त्या नांव ग्रंथ ॥ ३२
जेणें धारिष्ट चढे । जेणें परोपकार घडे ।

जेणें विषयवासना मोडे। त्या नांव ग्रंथ ॥ ३३

जेणें परत्र साधन। जेणें ग्रंथें होये ज्ञान।
जेणें होईजे पावन। या नांव ग्रंथ ॥ ३४

आतां असो हे बहुत। ऐकावा परमार्थ ग्रंथ ॥ ५९

अशी या ग्रंथाची बहुत प्रकारें स्तुति केली आहे. ही स्तुति ९ व्या समासांत आली आहे आणि यापुढील १० व्या समासांत एथवर केलेल्या विवरणानें श्रोत्यांवर जो परिणाम झाला त्याचें पुढें वर्णन करतात

मागां जालें निरूपण। देखिलें आपणासि आपण।
तेणें बाणली खूण। परमार्थाची ॥ ७-१०-७

तेणें समाधान जालें। चित्त चैतन्यीं मिळालें।
निजस्वरूपें वोळखिलें। निजवस्तूसी ॥ ८

प्रारब्धीं टाकिला देहो। बोधें फिटला संदेहो।
आतां चि पडो अथवा राहो। मिथ्या कळीवर ॥ ९

या नंतर सामान्य जनांच्या एका भ्रमाचा उल्लेख व त्याचें निरसन करतात. लोकांचा भ्रम असा कीं साधु पुरुषांना मरण पुण्य क्षेत्रीं च आणि उत्तरायणीं च आलें पाहिजे. असें न होईल तर तो साधु कसला ! पण समर्थ म्हणतातः—

हा संदेहीं वसे भ्रम। साधु तो निःसंदेह ॥ १३

इतुकें नलगे योगियांसि। तो जीत चि मुक्त पुण्यराशी ॥
तिळांजळि पाप पुण्यासी। दिधली तेणें ॥ १५

साधूचा देह स्वितपला। अथवा श्वानादिकीं भक्षिला।
हें प्रशस्त न वटे जनाला। मंदबुद्धिस्तव ॥ २१

एवंच जीवन्मुक्तांना मरण केव्हां आलें व कोठें हि आणि कशा हि स्थितींत आलें तरी हरकत नसते. अशा प्रकारें श्रवण मननानें श्रोत्यांचे ठिकाणीं परमार्थाची खूण बाणून समाधान उत्पन्न होऊन चित्त चैतन्यीं मिळाल्यावर निजस्वरूपी वस्तूची प्रचीति आल्यावर मागची तें काय राहणार ! अशा या साधु जनांना मोक्ष मिळतो च, पण त्यांच्या दर्शनानें, सगानें आणि भजनानें इतरांना हि मोक्ष मिळू शकतो. समर्थ म्हणतातः—

असो ऐसे साधु जन । त्यांचें घडलियां भजन ।
तेणें भजनें पावन । इतर जन होती ॥ ३२

शरणागतांची वाहे चिंता । तो येक सद्‌गुरुदाता ।
जैसें बाळक वाढवी माता । नाना येत्नें करूनी ॥ ७-१०-४०,

म्हणौन सद्‌गुरूचें भजन । जयासि घडे तो चि धन्य ।
सद्‌गुरुविण समाधान । आणीक नाहीं ॥ ४१

झालें एथें च ग्रंथसमाप्ति झाली:—

सरली शब्दाची खटपट । आला ग्रंथाचा शेवट ।
येथें सांगितलें पष्ट । सद्गुरुभजन ॥ ४२

सद्‌गुरुभजनापरतें कांहीं । मोक्षदायेक दुसरें नाहीं ।
जयास न मने तेहीं । अवलोकावी गुरुगीता ॥ ४३

पुढें ग्रंथाची फलश्रुति सागतांना फिरून प्राकृत ग्रंथाचें महत्त्व वर्णन करतात.

जो ये ग्रंथींचा विवेक । विवंचूनि पाहे साधक ।
तयास सांपडे येक । निश्चय ज्ञानाचा ॥ ४५

जे ग्रंथीं बोलिलें अद्वैत । तो म्हणों नये प्राकृत ।
मद्य जाणावा वेदांत । अर्थविषयीं ॥ ४६

प्राकृतें वेदांत कळे । सकळ शास्त्रीं पाहतां मिळे ।
आणि समाधान निवळे । अंतर्यामीं ॥ ४७

तें प्राकृत म्हणों नये । जेथें ज्ञानाचे उपाये ।
मूर्खासि हें कळे काये । मर्कटा नारिकेळ जैसें ॥ ४८

आतां असो हें बोलणें । अधिकारपरत्वें घेणें ।
शिंपीं मधील मुक्त उणें । म्हणों नये ॥ ४९

एणें प्रमाणें या ग्रंथाचा शेवट केला आहे.

( ६ ) हा लहानसा एकदशकी ग्रंथ गुरुगीतेपेक्षां खास मोठा आहे. हा पूर्ण ग्रंथ आहे. तथापि तो विस्ताराच्या सारखा हि आहे. हा ' श्रवण मनन निदिध्यास प्रचीति ' या चौपाईवर आधारलेला आहे, तर ' दासबोध ' हा

( बुद्धीचा निश्चय = व्यवसायात्मिकता ), धारिष्ट, चातुर्य इत्यादि अनेक गोष्टींचा समावेश करून आणि शिष्यवर्गाच्या आशंकांप्रमाणें अनेक शंका समाधानें अंतर्भूत करून ग्रंथाचा विस्तार करून वीसदशकी च दोनशेसमासी बनविला आहे, हें उघड आहे. ग्रंथविस्तार करतांना या मूळच्या दशकाला सातवें स्थान कां मिळालें हें आतां च सांगतां येणार नाहीं. तथापि इतकें निश्चित वाटतें कीं मूळचा दासबोध सातदशकी नसून एकदशकी च असावा.

( ७ ) हा एक संपूर्ण ग्रंथ वाटतो. त्याला आदि, मध्य व अंत आहे. तसा इतर दशकांना नाहीं. मूळ आठवा दशक असा च स्वतंत्र, परंतु मोठ्या ग्रंथांत समावेश करण्याचे उद्देशानें लिहिलेला असावा असें वाटतें. त्याचा इतरत्र उल्लेख येण्याचें हें एक कारण दिसून येतें. सातव्या दशकाचा असा इतरत्र आधार दिलेला दिसत नाहीं. सातव्या दशकाप्रमाणें आठव्याला आदिअंत दिसत नाहीं. 'न्यूनपूर्ण क्षमा केलें । पाहिजे श्रोतीं' एवढ्यावरून किंवा 'येथून हा ज्ञानदशक । संपूर्ण जाला' ( १०-८-८१ ) एवढ्यावरून मूळच्या दासबोध ग्रंथाचा शेवट झाला असें म्हणण्यास पुरेसा आधार आहे असें वाटत नाहीं, निदान खात्री पटत नाहीं. ६ व्या दशकाच्या ४ थ्या समासांत ४७६० संवत्सर दिला आहे, तो ब्रह्मनिरूपणांतील युगादिनिरूपणांत त्या साकाचे कोणचें स्थान आहे हें दर्शविण्याकरितां दिला आहे. तेवढ्या वरून केवळ दासबोधाची सुरवात किंवा त्याचा काळ अगर ग्रंथाची अखेर यां पैकीं कशाचा हि निर्णय करतां येईल असें वाटत नाहीं. अर्थात् त्यावरून दासबोध हा ग्रंथ सहा, सात किंवा आठव्या दशकाचे अखेर एका काळीं समाप्त होत होता असें वाटत नाहीं. तसें म्हणण्याला आणखी प्रमाणापेक्षा आहे, असें वाटतें. परंतु सातवा दशक स्वतंत्र होता हें अनुमान मात्र अशा कच्च्या पायावर उभारलेलें नाहीं.

( ८ ) मूळ ग्रंथ एकदशकी च असून आजचा दासबोध हा त्याचा विस्तार असावा ही कल्पना ज्यांस मान्य होणार नाहीं, त्यांनीं असें मानावें कीं हा सातवा दशक मूळ एक निराळा ग्रंथ असून तो मागाहून वीसदशकी समासांत गोंवला आहे.

( ९ ) मूळचा एक 'जुना दासबोध', त्यानंतर हा 'नवा दासबोध' अशी कल्पना केली तर हा जुन्या दासबोधापेक्षां हि लहानसा ग्रंथ असल्यामुळें कदाचित् हा त्यापूर्वीचा हि असेल. परंतु हें अनुमान या ग्रंथांत पूर्णत्व न

असो ऐसे साधु जन । त्यांचें घडलियां भजन ।
तेणें भजनें पावन । इतर जन होती ॥ ३२

शरणांगतांची वाहे चिंता । तो येक सद्‌गुरुदाता ।
जैसें बाळक वाढवी माता । नाना येत्नें करूनी ॥ ७-१०-४०.

म्हणौन सद्‌गुरूचें भजन । जयासि घडे तो चि धन्य ।
सद्‌गुरुविण समाधान । आणीक नाहीं ॥ ४१

झालें एथें च ग्रंथसमाप्ति झाली:—

सरली शब्दाची खटपट । आला ग्रंथाचा शेवट ।
येथें सांगितलें पष्ट । सद्गुरुभजन ॥ ४२

सद्‌गुरभजनापरतें कांहीं । मोक्षदायेक दुसरें नाहीं ।
जयास न मने तेहीं । अवलोकावी गुरुगीता ॥ ४३

पुढें ग्रंथाची फलश्रुति सांगताना फिरून प्राकृत ग्रंथाचें महत्त्व वर्णन करतात.

जो ये ग्रंथींचा विवेक । विवंचूनि पाहे साधक ।
तयास सांपडे येक । निश्चय ज्ञानाचा ॥ ४५

जे ग्रंथीं बोलिले अद्वैत । तो म्हणों नये प्राकृत ।
सत्य जाणावा वेदांत । अर्थविषयीं ॥ ४६

प्राकृतें वेदांत कळे । सकळ शास्त्रीं पाहातां मिळे ।
आणि समाधान निवळे । अंतर्यामीं ॥ ४७

तें प्राकृत म्हणों नये । जेथें ज्ञानाचे उपाये ।
मूर्खासि हें कळे काये । मर्कटा नारिकेळ जैसें ॥ ४८

आतां असो हें बोलणें । अधिकारपरत्वें घेणें ।
शिंपीं मधील मुक्त उणें । म्हणों नये ॥ ४९

एणें प्रमाणें या ग्रंथाचा शेवट केला आहे.

( ६ ) हा लहानसा एकदशकी ग्रंथ गुरुगीतेपेक्षां खास मोठा आहे. हा पूर्ण ग्रंथ आहे. तथापि तो विस्तारण्या सारखा हि आहे. हा ' श्रवण मनन निदिध्यास प्रचीति ' या चौपाईवर आधारलेला आहे, तर ' दासबोध ' हा ग्रंथ नवविधा भक्तिवर आणि ज्ञानावर आधारलेला असून त्यांत सावधपण

( बुद्धीचा निश्चय = व्यवसायात्मिकता ), धारिष्ट, चातुर्य इत्यादि अनेक गोष्टींचा समावेश करून आणि शिष्यवर्गाच्या आशंकांप्रमाणें अनेक शंका समाधानें अंतर्भूत करून ग्रंथाचा विस्तार करून वीसदशकी व दोनशेसमासी बनविला आहे, हें उघड आहे. ग्रंथविस्तार करतांना या मूळच्या दशकाला सातवें स्थान कां मिळालें हें आतां च सांगतां येणार नाहीं. तथापि इतकें निश्चित वाटतें कीं मूळचा दासबोध सातदशकी नसून एकदशकी च असावा.

( ७ ) हा एक संपूर्ण ग्रंथ वाटतो. त्याला आदि, मध्य व अंत आहे. तसा इतर दशकांना नाहीं. मूळ आठवा दशक असा च स्वतंत्र, परंतु मोठ्या ग्रंथांत समावेश करण्याचे उद्देशानें लिहिलेला असावा असें वाटतें. त्याचा इतरत्र उल्लेख येण्याचें हें एक कारण दिसून येते. सातव्या दशकाचा असा इतरत्र आधार दिलेला दिसत नाहीं. सातव्या दशकाप्रमाणें आठव्याला आदिअंत दिसत नाहीं. 'न्यूनपूर्ण क्षमा केलें । पाहिजे श्रोतीं ' एवढ्यावरून किंवा, ' येथून हा ज्ञानदशक । संपूर्ण जाला ' ( १०-८-८१ ) एवढ्यावरून मूळच्या दासबोध ग्रंथाचा शेवट झाला असें म्हणण्यास पुरेसा आधार आहे असें वाटत नाहीं, निदान खात्री पटत नाहीं. ६ व्या दशकाच्या ४ थ्या समासांत ४७६० संवत्सर दिला आहे, तो ब्रह्मनिरूपणांतील युगादिनिरूपणांत त्या काळाचे कोणचें स्थान आहे हें दर्शविण्याकरितां दिला आहे. तेवढ्या वरून केवळ दासबोधाची सुरवात किंवा त्याचा काळ अगर ग्रंथाची अखेर यां पैकीं कशाचा हि निर्णय करतां येईल असें वाटत नाहीं. अर्थात् त्यावरून दासबोध हा ग्रंथ सहा, सात किंवा आठव्या दशकाचे अखेर एका काळीं समाप्त होत होता असें वाटत नाहीं. असें म्हणण्याला आणखी प्रमाणापेक्षा आहे, असें वाटतें. परंतु सातवा दशक स्वतंत्र होता हें अनुमान, मात्र अशा कच्च्या पायावर उभारलेलें नाहीं.

( ८ ) मूळ ग्रंथ एकदशकी च असून आजचा दासबोध हा त्याचा विस्तार असावा ही कल्पना ज्यांस मान्य होणार नाहीं, त्यांनीं असें मानावें कीं हा सातवा दशक मूळ एक निराळा ग्रंथ असून तो मागाहून वीसदशकी समासांत गोंवला आहे.

( ९ ) मूळचा एक ' जुना दासबोध ', त्यानंतर हा ' नवा दासबोध ' अशी कल्पना केली तर हा जुन्या दासबोधापेक्षां हि लहानसा ग्रंथ असल्यामुळें कदाचित् हा त्यापूर्वींचा हि असेल. परंतु हें अनुमान या ग्रंथानें पूर्णत्व च

अल्पत्व एवढ्या दोन गोष्टींवर च केलेलें असल्यामुळें तें निर्णयात्मक समजूं नये.

पुणें—भाद्रपद शु. १० श. १८५२



हे सारे तर्क आहेत. त्याबद्दल निश्चयानें कोणाला च कांहीं म्हणतां येणार नाहीं. तथापि असली चर्चा उपकारक होते. ती विचाराला चालन देते. असल्या चर्चेनें च केव्हां तरी सत्याचा निर्णय होतो. तेव्हां श्री. वामनरावजी तळवलकर यांनीं केलेल्या तर्कांना अनुकूल व प्रतिकूल प्रमाणें सांगून मला काय वाटतें तें हि नमूद करून ठेवतों.

रा. तळवलकरांचे तर्क मी काळजीपूर्वक वाचले, कारण केव्हां तरी निर्णय व्हावा म्हणून जे कित्येक प्रश्न मनांत नेहमीं घोळवीत असतों, त्यांतला हा एक प्रश्न आहे. सातवा दशक स्वतंत्र असावा, असें मानण्याला रा. तळवलकर यांनीं जीं प्रमाणें दिलीं आहेत, त्यापेक्षां एखाद दुसरें जास्त प्रमाण मजजवळ आहे. रा. तळवलकरांनीं दिलेल्या प्रमाणांत एक प्रमाण मला नवीन वाटलें. तथापि हीं सर्व प्रमाणें विचारांत घेऊन माझ्या मतांत बदल करावा, असें मनांत येत नाहीं. फार तर अजून हा प्रश्न अनिर्णित समजून त्यावर जास्त विचार व्हावा, असें मी म्हणेन.

जुना दासबोध किंवा एकवीस समासी या ग्रंथाबद्दल मी अजून विचार केला नाहीं. पण ग्रंथराज दासबोधाविषयीं जें वाचलें, पाहिलें आणि ऐकलें त्यावरून माझें मत असें झालेलें आहे कीं सात दशक अखेरपर्यंत श्रीसमर्थांनीं एकसारखा ग्रंथ लिहिला व तेवढा च मूळचा दासबोध म्हणून एकवार ग्रंथ पुरा केला असावा. आठवा दशक हा स्वतंत्रपणें लिहिला गेला असावा, लिहिला त्या वेळीं तो दासबोधांतील म्हणून लिहिलेला नसावा. सात दशकांचा दासबोध ग्रंथ १५८१ त लिहिला गेला व तो शिवतरच्या घळींत म्हणजे श्रीसमर्थांच्या सुंदर मठांत लिहिला. १५८१ च्या पूर्वी हि आणि नंतर वीस वर्षे पर्यंत वेळोवेळीं जे शेंकडो स्फुट समास, प्रसंगानुसार एकएकटे किंवा अनेक मिळून लिहिले गेले त्या सर्वांची निवड करून व क्वचित् जरूर तो फेरफार करून व प्रस्तावनारूपी पहिला समास जोडून १६०१ च्या मार्गशीर्ष मासीं आपल्या इच्छेचा, वीस दशकांचा व

दोनशें समासांचा ग्रन्थराज दासबोध पूर्ण करण्यांत आला असावा. हें मत बरोबर असेल तर १६०३ च्या पूर्वीची, शक नमूद असलेली अशी सबंध दासबोधाची प्रत आढळणें शक्य नाहीं. नऊ ते वीस पर्यंतच्या दशकांतील कित्येक समास ' फुट समास ' म्हणून लिहिलेले कित्येक बाडांतून आढळतात, तसे पहिल्या सात दशकांतील आढळत नाहींत, ही गोष्ट लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे.

पहिला समास प्रस्तावनारूप आहे हें उघड आहे व तो १६०३ त संपूर्ण ग्रन्थाची विरहे लावतांना जोडला असावा, असें दिसतें. परंतु सबंध पहिला दशक च मागाहून लिहिलेला असावा, असें मला वाटत नाहीं. प्रथम दुसऱ्या दशकापासून च ग्रन्थाला आरंभ झाला असावा, असें दिसत नाहीं. एकदम कोणी मूर्खलक्षणापासून च ग्रन्थाला आरंभ करील, असें वाटत नाहीं. दशक १ समास २ ते १० हे नमनाचे व स्तवनाचे समास लिहितांना च पुढील ग्रंथांतील विषयांची कल्पना मनांत होती, असें दिसतें. १ × १० च्या शेवटीं पुढील दशकांतील विषयाचा उल्लेख करण्यांत आला आहे. सबंध च पहिला दशक मागाहून लिहिला असावा, अशा विषयीं रा. तळवलकरांचा हि फारसा आग्रह दिसत नाहीं. पण आठवा दशक जसा स्वतंत्र आहे, तसा च सातवा दशक हि स्वतंत्र लिहिला गेला असावा व मूळचा दासबोध म्हणजे फक्त सातवा दशक, याविषयीं मात्र त्यांचा आग्रह विशेष दिसतो. मी येथें योजिलेला आग्रह शब्द चांगला लागू पडत नाहीं. त्या ऐवजीं दुसरा एकादा जास्त योग्य शब्द पाहिजे होता. तो मला सुचला नाहीं व अजून सुचत नाहीं. सातवा दशक स्वतंत्र असावा, या तर्काच्या सत्यतेविषयीं त्यांना जास्त खात्री वाटतेशी दिसते, एवढें च म्हणण्याचा माझा आशय आहे.

हा तर्क करण्याला त्यांनीं तीन प्रमाणें दिलीं आहेत :

( १ ) सातवा दशक स्वयंपूर्ण आहे, त्याला आदि, मध्य, अंत आहे.

यावर माझें म्हणणें असें : अंत आहे यांत कांहीं नवल नाहीं, कारण सात दशकी दासबोध ग्रन्थ पुरा करावयाचा झाला, तरी असा च शेवट करण्यांत आला असता, तेव्हां हा जो अंत आहे तो एकट्या सातव्या दशकाचा असा म्हणतां येईल, तसा तो सप्तदशकी ग्रन्थाचा हि म्हणतां येईल. प्रत्येक

दशकाचा विषय निरनिराळा असल्यामुळें प्रत्येक दशकाला मध्य असणार च. फक्त एक च सकृद्दर्शनीं सबळ कारण उरलें कीं, दशकारंभीं "गणेशशारदासद्गुरु व संतसज्जन यांना नमन आहे. पण त्यांत हि विशेष नाहीं." मध्यें च मनांत आलें आणि नमन केलें तर त्यांत काहीं बिघडत नाहीं व तेवढ्यावरून तें प्रकरण स्वतंत्र होय, असें अनुमान काढणें योग्य होणार नाहीं. उदाहरणार्थ नवविधा भक्तीचा चवथा हि दशक स्वयंपूर्ण आहे, असें म्हणतां येईल, व तसा तो आहे हि, पण तेवढ्यावरून तो दशक १ ते ७ या सप्तदशकी ग्रन्थाचे क्रमांत लिहिला गेला नसून स्वतंत्र लिहिला गेला, असें म्हणतां येणार नाहीं. तिसऱ्या दशकांतून च चवथा दशक निघाला आहे व चवथ्यांतून च पांचवा निघाला आहे, हें दशक ३ × १० चा शेवट, ४ × १० चा शेवट व ५×१ चा आरंभ पहिला म्हणजे कळणार आहे. असें असतां चवथ्या दशकाचे आरंभीं गणेशशारदासद्गुरु यांना नमन आहे च.

( २ ) आपल्या तर्काला रा. तळवलकर यांनीं दुसरें कारण दिलें, तें असें कीं,

> तया कष्टाचें निर्शन । व्हावया पाहिजे आत्मज्ञान ।
> म्हणोनि हें निरूपण । अध्यात्मग्रंथ ॥ ७-१-६

या ओवींत रा. तळवळकर म्हणतात, श्रीसमर्थांनीं अध्यात्मग्रंथ हें सातव्या दशकाचें नाव च दिलें आहे. कल्पना मार्मिक आहे. पण हा सबंध च अध्यात्माचा ग्रन्थ आहे व त्याचें निरूपण एवढ्याचसाठीं च कीं, तेणें करून श्रोत्यास आत्मज्ञान होऊन संसाराच्या कष्टांचें निरसन व्हावें, असा हि अर्थ या ओवीचा होईल.

( ३ ) त्यांनीं तिसरें कारण असें दिलें आहे कीं, त्या काळीं पंडित लोक मराठीला नाकें मुरडीत, त्यामुळें एकनाथादिकांना मराठीची तरफदारी करावी लागली, तशी श्रीसमर्थांनीं हि मराठीची तरफदारी सातव्या दशकाच्या आरंभीं च केली आहे. रा. तळवलकराचा तर्क असा कीं, असली तरफदारी कोणी झाला तरी ग्रन्थारंभीं करील, ग्रन्थाच्या मध्यें च करणार नाहीं. हटकून असें च घडलें पाहिजे, असें मला वाटत नाहीं. कोणी ग्रन्थारंभीं असली तरफदारी करील, कोणी ग्रन्थाचे शेवटीं शेवटीं करील, कोणी आरंभीं करील आणि पुन्हां शेवटीं हि करील, क्वचित् कोणी ओघानें ग्रन्थाच्या मध्यें हि करील. सप्तदशकी दासबोध मानला म्हणजे ही तरफदारी ग्रन्थाचे शेवटीं

शेवटीं आली आहे, असें म्हणता येईल. श्रीएकनाथानीं तरी काय केलें आहे ? आपल्या भागवताच्या पहिल्या अध्यायात एकदा मराठीचा गौरव केला आहे आणि पुन्हा शेवटीं शेवटीं म्हणजे २९ व्या अध्यायात हि केला आहे.

रा. तळवलकराचा तर्क बरोबर आहे, असें मानण्याला हीं तिन्हीं कारणें पुरेशीं आहेत, असें मला वाटत नाहीं. विरुद्ध अनुमान काढण्याला हि सबळ कारणें आहेत. तीं नमूद करण्यापूर्वी रा. तळवळकर याच्या तर्काला अनुकूल असें माझ्या मतें आणखी एक सबळ कारण आहे तें सागून प्रतिकूल कारणें कोणतीं तीं पाहू.

' कुबडी ' कार सुमारें शभर वर्षांपूर्वी होऊन गेले. त्यांनीं आपल्या ' कुबडी ' ग्रन्थात सातव्या दशकाचें नाव च दासबोध म्हणून दिलें आहे. चाफळ येथील ढवळे याच्या कडील एका सुमारें १५० वर्षांपूर्वींच्या बाडात पुढील नऊ ओंव्याचें एक स्वतंत्र प्रकरण आहे.

दासबोधीं ज्ञानदशक । कोणे समासीं कोण विवेक ।
सावध होऊन चतुरादिक । सवेत ऐका ॥ १

प्रथम दशकीं निरूपण । पहिले समासीं मगळाचरण ।
दुसरे समासीं निर्गुण । ब्रह्म बोलिलें ॥ २

तिसरे समासीं चौदा ब्रह्में । निरोपिलीं अनुक्रमें ।
चौथे समासीं नेमें । विमळ ब्रह्म ॥ ३

पाचवे समासीं नेमिलें द्वैत । सहावे समासीं शुकोन्मुक्त ।
साधन करूनि अलिप्त । सातवे समासीं ॥ ४

आठवे समासीं श्रवण । नववे समासीं श्रवणलक्षण ।
दहावे समासीं निरूपण । देहात ज्ञानियाचा ॥ ५

दुसरे दशकीं निरूपण । पहिला देवदर्शन ।
दुसरे समासीं जाण । सूक्ष्म आशका ॥ ६

तिसरे समासीं ते केडिली । चौथे समासीं सूक्ष्मे बोलिलीं ।
पाचवे समासीं निरोपिलीं । स्थूळ भूतें भेदाकाश ॥ ७

सहावे समासीं दुश्चीतपण । सातवे समासीं मोक्षलक्षण ।

आठवे समासीं दर्शन । आपुलें जालें ॥ ८

नवमे समासीं साधुलक्षण । दहावे समासीं शून्यत्वनिरसन ।
ज्ञानदशकीं निरूपण । ऐसें असे ॥ ९

या प्रकरणांतील नुसती पहिली ओवी पाहिली तर अर्थ निराळा होईल. पण दुसऱ्या ओवींत ' प्रथम दशकीं ' आहे व सहाव्या ओवींत ' दुसरे दशकीं ' आहे आणि सातव्या आणि आठव्या दशकांतील समासांत आलेले विषय दिलेले आहेत हें पाहिलें म्हणजे ' प्रथम दशकीं ' म्हणजे ' दासबोधीं ' व दुसरे दशकीं म्हणजे ' ज्ञानदशकीं ' असा अर्थ होतो व प्रकरणाच्या मुळांत हि पहिल्या ओवींतील ' ज्ञानदशक ' शब्दांतील ' क ' ची ' की ' करून पुन्हां ' की ' चा ' क ' केला आहे. तात्पर्य या प्रकरणांत सातव्या दशकाला ' दासबोध ' म्हटलें आहे, ही बाब विचार करण्यासारखी आहे. सबंध ग्रन्थाचें नांव त्यांतील एका च भागाला कोणी देणार नाहीं. प्रश्न फक्त इतका च उरतो, या समासाचें हें नांव कोणी आणि केव्हां ठेवलें.

रा. तळवळकरांच्या तर्काला प्रतिकूल प्रमाण असें. सातव्या दशकाचा पहिला समास सहाव्या दशकाच्या दहाव्या समासांतून निघाला आहे, असें मला वाटतें. ७ × १ चा धागा ६ × १० त आहे. ७ × १ × १९ त

आतां कथानुसंधान । सावध ऐका असें म्हणून

स्वप्नीं स्वप्नाचा विचार । तो तूं जाण हा संसार ॥

हा जो ६ × १० त आलेला विषय तो च पुढें चालवून ७ × १ × २० त म्हणतात

संसार हा चि दीर्घ स्वप्न । लोभें घोसणाति जन ॥

वगैरे. सातव्याच्या पहिल्या समासांत मराठीची जी तरफदारी आली आहे ती तरफदारी करण्याचा प्रसंग तरी ६ × १० तील कठीण निरूपणानें च आणून दिला, असें ७ × १ × ३१ ओवीवरून मला वाटतें. इतर हि आणखी उल्लेख आहेत. ते सर्व पाहून मला असें वाटतें कीं, सातवा दशक स्वतंत्र नसावा, त्यांत सहाव्याच्या च पुढचें निरूपण आहे.

जास्त लिहिण्यास अवकाश नाहीं. पुन्हां केव्हां तरी विचार करूं. असो, माझे हि तर्क च आहेत. निर्णय व्हावयाचा आहे. असली चर्चा उद्बोधक असते. तिला चालन दिल्याबद्दल आपण रा. तळवळकरांचे आभारी आहोंत.

धुळें-१८५२ कार्तिक शु. ९ } शंकर श्रीकृष्ण देव

## [ १३५ ]

## मनोबोध Auto-Suggestions

### ( ५ ) पुढें चालू

पुढें वैखरी राम आधीं वदावा ।

मला तर वाटते कीं हा पूर्वाभ्यासाचा च केवळ नव्हे तर निद्रेच्या पूर्वी रामनामाचा जप चालवून असा च हा जप निद्रेच्या उत्तरकालीं हि स्वयमेव झाला पाहिजे अशी स्वयसूचना दिल्याचा परिणाम होय. याचे खुलासाकरितां एक उदाहरण घेऊं या. समजा कीं, पुण्याहून मुंबईस जाणाऱ्या रात्रीं २ च्या गाडीनें आपणास जावयाचें आहे. तर आपण काय काय करतों ? जवळ गजराचें घड्याळ असल्यास गजर देऊन ठेवतों किंवा रात्रीची झोंप कमी झालेल्या किंवा येत असलेल्या म्हाताऱ्या मनुष्यास रात्रौ एक वाजता च आपणास उठविण्याविषयीं बजावतों. शिवाय स्वत:हि एक वाजतां उठण्याचा संकल्प करतों. आपणास असें अकालीं उठण्याची सवय नसते, म्हणून असा तिहेरी प्रयत्न आपण करतों. गाडी चुकू नये हा मुद्दा. पण अशा तिहेरी प्रयत्नापैकीं बहुश: स्वत:च्या संकल्पाप्रमाणें च आपण गजरापूर्वी च किंवा दुसऱ्या कोणी उठविण्यापूर्वी च आपण स्वतः च उठतों असा अनुभव पुष्कळदा येतो. असा हा परिणाम कशानें होतो ? कोणी म्हणतात मनाला एक प्रकारचा धोप असतो आणि त्या धाकानें आपण उठतों. परंतु मन निद्रावस्थेंत लय पावल्यावर त्या च मनाला धोप कसा असूं शकेल ? मनाला धोप असेल तर मुळीं झोंप च येणार नाहीं ! पण असें होत नाहीं, झोंप येते. अर्थात् धोप म्हणता येत नाहीं. धाक, भय हे विकार हि झोंप लागल्यावर कोठून असणार ? सारांश असें कबूल करावें लागतें कीं निद्रेपूर्वी ज्या आपण आपल्यास च मनास सूचना ( Auto-suggestions ) दिल्या त्याचा हा परिणाम असला पाहिजे पण या तरी स्वयसूचना कोणास दिल्या असा प्रश्न कोणी विचारील ? त्याचें उत्तर असें कीं या सूचना अष्टौप्रहर जागृत असलेल्या अत एव मनाला च दिल्या जातात व मिळतात. त्यातून हि काहीं विशिष्ट वाळीं विशिष्ट प्रकारानें दिलेल्या अशा सूचना ग्रहण करून, त्याची अमलबजावणी करण्याचें काम त्या च मनाचें असल्यामुळें त्या मनाकडून त्याची अमलबजावणी हि केली जाते असा अनुभव अनेक वेळा येतो. याच सिद्धांतास अनुसरून अलीकडे 'मानसोपचाराचें' वैद्यक

सुरू झालें आहे आणि त्याचे आश्चर्यकारक परिणाम आलोपाथीवाले डॉक्तर हि निदान काहीं विशिष्ट रोगापुरते का होईना सर्वथा कबूल करतात. मानसशास्त्रज्ञ हड्सन व इतर कित्येकानीं या विषयावर म्हणजे विनौषधि केवल स्वयसूचनानीं रोग कसे बरे होतात या विषयावर स्वतंत्र ग्रंथ लिहिले आहेत. अशा अनेक ग्रंथाचा साराश घेऊन च डॉ. गणपुले यानीं आपले मानसोपचार व मानसोन्नति हे ग्रंथ लिहिले आहेत. हिप्नाटिझमच्या प्रयोगात हि तूं अमुक मिनिटानीं अमुक काम करशील किंवा जागृत होशील अशी सूचना दिली जाते आणि बरोबर त्या च क्षणाला ती गोष्ट त्या मोहनिद्रावश ( hypnotised ) झालेल्या माणसाचे हातून होत असते. अशा मनुष्य कल्पनेबाहेरचीं कामें या मोहनिद्रेंत करतो असा अनुभव आहे. काहीं विलक्षण ताकदीचीं कामें, किंवा शरीर सुसदर्शेत ठेवून हि दूर ठिकाणीं जाण्याचें काम हि या निद्रावश मनुष्याचे हातून होऊं शकतें असा अनुभव आहे. तात्पर्य अशा या निद्रापूर्व दिलेल्या स्वयसूचनेमुळें निद्रा सुटून अचानक जागृत होण्याचें कार्य आपल्या हातून घडतें असा अनुभव शेकडो च काय सहस्रावधि लोकाना येतो. यातलें तात्पर्य आपल्या

पुढें वैखरी राम आधीं वदावा

या श्लोकास लावून याचा अर्थ ग्रहण केल्यास, असें कबूल करावें लागतें कीं हें कार्य जर विनचुक व्हावयास पाहिजे असेल तर रात्रौ निद्रापूर्व मनुष्यानें चिंतन व भजन करीत असले पाहिजे आणि सकाळीं निद्रोत्तर पहिलें काम चिंतन व भजन झाले पाहिजे असा घोष मनानें घेतला पाहिजे. असा हा घोष घेतला तर च निद्रोत्तर तोंडातून आधीं राम आणि त्याचें चिंतन होऊं लागेल. 'यच्चित्तस्तन्मयो भवति' ( मै. ३. ) किंवा 'सदा तद्भावभावित ( गीता ८–६ ) या सिद्धांताचा हा एक, लहानसा आणि कोणाहि मनुष्यानें घेण्यासारखा असा अनुभव आहे. याला निराळें ज्ञान नको, किंवा काहीं नको. केवळ श्रद्धापूर्व निश्चयानें अमुक गोष्ट उठताक्षणीं झाली च पाहिजे असा घोष रात्रौ निद्रापूर्व घ्यावा म्हणजे निद्रोत्तर प्रथम ती च गोष्ट सहजासुल्या घडते. अशा रु हेनें निद्रापूर्व आणि निद्रोत्तर विचारात एक प्रकारची साखळी ( Continuity ) राहू शकते. आणि रोजच्या रोज अशी साखळी ठवल्यास त्याची सवय होऊन अतर्मनाचें तें एक काम च होऊन बसतें. आपली महानिद्रा किंवा प्रळय म्हणजे मरण.

मरणपूर्व ईशस्मरण हटकून व्हावें म्हणून साधुजन किंवा भगवान् ही च गोष्ट करण्यास सांगतात. समर्थ म्हणतात च कीः—

आतां असो हे प्रस्तुत । देहास मांडतां अंत ।
तेव्हां साधकें निश्चित । काय करावें ॥ ३ ॥
निरालंबीं चित्त न्यावें । तरी राहेना स्वभावें ।
ऐक्यतेच्या नांवें । शून्याकार ॥ ४ ॥
निरालंबींचें साधन । देह असतां सावधान ।
केलें पाहिजे समाधान । सत्संगें विवेकें ॥ ५ ॥
अनुसंधान अंतकाळीं । कैसें राहते निर्मळीं ।
... ... ... ... ... ... ...
ऐसें स्वरूपानुसंधान । अंतकाळीं न घडे जाण ।
आतां करावें ध्यान सगुणमूर्तीचें ॥ ७ ॥
ध्यानासि कारण चित्त । तें चि जालिया दुश्चित ।
कैसें घडे सावचित्त । ध्यान अंतीं ॥ ८ ॥
आतां करावें रामचिंतन । वासना करी प्रपंच ध्यान ।
प्रपंचीं गुंतलें मन । तें सुटलें पाहिजे ॥ ९ ॥
(तैसें) मन हें गुंतलें । वासना विषयीं नेलें ।
वरीवरी नाम स्मरलें । याचें कोण काम ॥ ११ ॥
तरी आतां काय करावें । कोणतें उपाय करावें ॥
ते चि आतां स्वभावें । सांगा स्वामी ॥ १२ ॥
ऐका उपायाचें वर्म । दृढ लाविला नित्यनेम ।
हें चि उपायवर्म । समयीं अंतीच्या ॥ १५ ॥
पूर्वी पडला अभ्यास । तो चि अंतीं निजध्यास ।
म्हणोनियां ... ... ... । नेम करावा ॥ १६ ॥
जयासी ठायींची सवे । तयास नलगे सांगावें ।
म्हणोनियां नित्यनेमासीं जीवें । विसंबों नये ॥ १७ ॥
एकाग्र करूनियां मन । अंतरीं करावें ध्यान ।
सर्वसांग पूजा विधान । प्रत्यहीं कीजे ॥ १९ ॥
अशक्त होऊनि प्राणी पडे । नित्यनेम त्यास न घडे ।

तयें घडे चि नेमाकडे । चित्त न्यावें ॥ २२

नित्यनेमाचा अभ्यास । तो चि लागे निजध्यास ।

चुकतां कासावीस । अंत समयीं ॥ २३

अहा देवा जप राहिला । ... ... ... ... ...

ऐसें नित्यनेमें कोडें । मन लागे देवाकडे ।

अंतकाळीं घडे घडे । निजध्यास ॥ २५

या च प्रकारचा सदाचार श्लोक ३ मध्यें निराळ्या शब्दांनीं निद्रापूर्वी अनुमानिला पाहिजे.

पुढें वैखरी राम आधीं वदावा । यांतील मर्म यावरून समजून येतें, तें असें कीं, सकाळीं रामचिंतन व्हावें म्हणून त्या च चिंतनाचा ध्यास निद्रेपूर्वी च इतका लावून घेतला पाहिजे कीं सकाळीं ती गोष्ट सहजावृत्त्या घडून येईल आणि त्याप्रमाणें न घडल्यास मन कासावीस होऊन जाईल ! निद्रापूर्व च काय पण अष्टौप्रहर ' सदा सर्वदा नाम वाचे वदावें ' असें ते म्हणतात च. निद्रापूर्व हि आहे, निद्रोत्तर हि आहे व दिवसभर हि रामचिंतन आणि नामस्मरण सांगितलें आहे. पण मुद्दा तो नसून रामचिंतनाचा व रामनामाचा ध्यास लावून घेतला पाहिजे हा आहे. हा ध्यास रात्रौ घेतल्यानें ही गोष्ट प्रभातीं सहजावृत्त्या घडून येते आणि म्हणून त्याचा हा परिणाम होऊं शकतो. हा केवळ रामनामाचा श्रीगणेशा नव्हे, आणि या श्लोकांत अशा कांहीं पूर्व प्रयत्नाची कल्पना केल्याखेरीज त्या श्लोकाचा अर्थ समजत नाहीं किंवा मनांत ठसत नाहीं आणि म्हणून त्या संबंधीं इतका विस्तार करावा लागला. ' न बोले मना राघवेवीण कांहीं ( २३ ) या श्लोकाचा वरील अर्थाशीं मेळ बसतो इतकें च नव्हे तर वरील तिसऱ्या श्लोकांतून तो च अर्थ निघूं शकतो आणि

सदा मानसीं हा निजध्यास राहो ॥ ४३

हा च मूळ अर्थ समर्थांना सांगावयाचा असून त्या करितां

प्रभातें मनीं राम चिंतीत जावा ।

ही केवळ त्यांनीं प्रस्तावना केली आहे, असें समजल्यानें सर्व श्लोकांची सारखी संगति बसते. तो जणु पुढें सांगितलेल्या ' अखंड ध्यानाचा ' पाठ असा भासतो. त्रयोदश कोटी जपाचें पारायण १२ वर्षांत त्यांनीं केलें. अर्थात्

रोज त्यांस निदान ३०।३२ हजार जप करावा लागला. त्यांचे सूक्ष्म अवलोकनानें मानसशास्त्राचा हा नियम त्याचे लक्षांत येणें स्वाभाविक आहे. अशा स्थितींत त्यांनीं याला ' घोर सदाचार ' असें नांव दिलें असल्यास नवल काय ?

या नामस्मरणानें जवा कांहीं ' देव ऋणी ' होऊन राहतो आणि आपण मनांत आणलेलीं कार्यें घडूं लागतात असा हि भावार्थ त्यांनीं श्लो. ५५ मध्यें प्रदर्शित केला आहे

(१२) मनीं लोचनीं श्री हरी तो चि पाहे ॥
जनीं जाणता भक्त होऊनि राहे ॥
गुणीं प्रीति राखे क्रमू साधनाचा।
जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा॥ ४७

यांतील अखेरचा चरण ४७ ते ५६ या श्लोकांचें पालुपद आहे. धन्य म्हणजे पूर्वी सांगितल्याप्रमाणें कृतार्थ, मुक्त, अर्थात् हें समर्थांच्या मता प्रमाणें कोणा तरी आदर्शभूत मुक्त मनुष्याचें वर्णन आहे. ' आधीं केलें आणि मग सांगितलें ' असें समर्थांचें चरित्र असलेमुळें यांत समर्थांनीं आपलें आत्मचरित्र च जणु ओतलें आहे असा भास होतो. या श्लोकापूर्वी देहबुद्धि आणि आत्मबुद्धि मनुष्य यांची तुलना करून जो आत्मबुद्धि मनुष्य श्रेष्ठ असा ठरविला, त्या आत्मबुद्धि मानवाचें वर्णन, समर्थांनीं यांत केलें आहे.

या श्लोकांत मनीं आणि लोचनीं असे जे दोन शब्द योजिले आहेत त्यांपैकीं एक च शब्द योजून भागलें असतें. कारण मना वाचून लोचनाचें कार्य च घडत नाहीं. दोघांचा सन्निकर्ष असेल त्या च वेळीं मनुष्य वस्तुतः पाहण्याचें कार्य करू शकतो. परंतु तसा अर्थ कोणी घेत नाहींत. लोचन हा शब्द बाह्येंद्रिय वाचक समजून मन हा शब्द त्याहून भिन्न असा अंतरिंद्रिय वाचक समजतात. हे दोन शब्द जणु भिन्न आहेत असें समजून अर्थ सांगणें म्हणजे दोन भिन्न मनें आहेत असें कबूल करणें नव्हे काय ! ' मनीं वा जनीं ' असे शब्द योजिले असते तर जो अर्थ उद्दिष्ट असता तो च अर्थ एथें गृहीत धरण्यांत येतो. बाह्य दृष्टीनें सर्व बाह्य वस्तु आपण पाहतों, मनानें त्यापेक्षां दुसरी वस्तु प्रत्यक्ष पाहता येत नाहीं परंतु कल्पनेनें वाटेल त्या बनवितां येतात व विचारानें त्या दोहोंतील ग्राह्याग्राह्य सारासार काय आहे तें ठरवितां येते. याप्रमाणें बाह्य सृष्टि, कल्पनासृष्टि ( दा. ६-६-५० पहा ) आणि विचार सृष्टि या सर्वांत ' श्री हरि तोचि (प्रत्यक्ष) पाहे ' असा हि अर्थ घेण्यात येत नाहीं. तर

बाह्य दृष्टीनें ज्या ज्या भिन्न वस्तु पाहतो त्या त्या सर्व विचार इ. `ज्ञानदृष्टीनें तत्वत: एकरूप किंवा हरिरूप आहेत असा अर्थ करण्यांत येतो. असा अर्थ स्पष्टपणें रा. देवस्थळी यांनीं दिला च आहे. परंतु रा. पांगारकर किंवा रा. देव यांना हि हा च अर्थ अभिप्रेत आहे. पण हा अर्थ या शब्दांतून कसा निघूं शकतो ? यापेक्षां, मनीं इ. अंत:प्रज्ञ मनदृष्ट्या म्हणजे भावना प्रधान बुद्धीनें आणि लोचनीं म्ह. बहिष्प्रज्ञ मनानें व बाह्येंद्रियानें अर्थात् विचार प्रधान दृष्टीनें सर्वत्र एकच हरिरूप पाहतो असा अर्थ त्या शब्दांतून निघतो; एवढें च नव्हे तर दुसऱ्या चरणांत या च कारणानें त्याला जाणता भक्त ( विचार आणि भावना युक्त असा ) असें म्हटलें आहे. जन हि दोन प्रकारचे असतात-भावनाप्रधान आणि बुद्धिप्रधान. या दोन हि प्रकारच्या लोकांना हा पुरुष वरील कारणानें मान्य होतो असा हि अभिप्राय आहे. मनुष्य भेटेल तशा तऱ्हेनें त्याशी बोलून त्याची खात्री पटवितो व ( लोक-संग्रहार्थ ) तो सद्गुणांवर ( सदाचरणावर ) प्रीति किंवा सगुणावरील भक्ती आणि उपासना यथासांग करतो इ. इ. या उलट म्हणजे ज्ञानाच्या आढ्यतेनें जे केवळ ज्ञानी, आचार वा उपासनेची अवश्यकता नाहीं असें मानतात त्यांची ' महंती जळो ' असे उद्गार समर्थ दासबोध ५-२-५६ मध्यें काढतात च.

श्रीहरि सर्वत्र पाहणें ही गोष्ट विचाराची अर्थात् अंतर्दृष्टीची आहे. बाह्यदृष्टीनें पाहतांना सर्वत्र श्रीहरि कसा दिसेल ? नाना पदार्थ च दिसतील. तेव्हां अंतर्बाह्य दृष्टीनें श्रीराम च पहातो असें कसें म्हणतां होईल ? अंत-र्दृष्टीनें सर्वत्र श्री राम पाहिल्यावर बाह्यदृष्टीनें पाहातांना ती च दृष्टी कायम ठेवून तो सर्व स्थावर जंगम श्रीरामरूप आहेत असें मानतो, पाहात नाहीं. शिवाय असा अर्थ घेतांना प्रत्येक चरणाचा इतर चरणाशीं नीटसा संबंध लावतां येत नाहीं. या सर्व अडचणी दोन मनाच्या कल्पनेनें नाहींशा होतात व तीन हि चरणांत एक च कल्पना अनुस्यूत आहे असें दिसून येतें.

( १३ ) धरी रे मना आदरें प्रीति रामीं ॥
नको वासना हेमधामीं विरामीं ॥ ६७

यांतील मन भावनात्मक अर्थात् अंत:प्रज्ञ असल्यामुळें त्यास रामीं प्रीति करण्यास सांगितलें असून बाह्यसुखाच्या ठिकाणीं वासना नको [ बहि:प्रज्ञ'

मनाचें चांचल्य नको ] असें सांगितलें आहे तें आतांपर्यंतच्या विवेचनास धरून च आहे.

( १४ ) म्हणे दास विश्वास नामीं धरावा ॥ ७६

या विषयीं निराळें विवेचन नको च. पूर्वी आलें च आहे.

( १५ ) मना, पावना भावना राघवाची ।
धरी अंतरीं सोडि चिंता भवाची ॥ ७९

भावना शब्द, मन अंतःप्रज्ञ च आहे, हें दर्शविते. पावना हें विशेषण मनाचें समजण्यास काय हरकत आहे ! पावना म्ह. सज्जन, पावन झालेल्या असा अर्थ. अंतरीं- अंतःप्रज्ञ मना, आपले ठिकाणीं [ ठिकाणची ] भवाची चिंता सोड असा अर्थ.

( १६ ) विशेषें हरा मानसीं रामपिसें ॥ ९२

( १७ ) जपे आदरें पार्वती विश्वमाता । यात नामाचा जप च सांगितला आहे, विचार नव्हे. जपात ध्यानाचा समावेश होतो च.

( १८ ) क्रियेवीण नानापरी बोलिजेतें । परी वित्त दुश्चित्त तें लाजवितें । मनां कल्पना धीट सैराट धावे ॥ तया मानवा देव कैसेनि पावे ॥ १०४

भावना निराळी आणि क्रिया निराळी. कल्पना मोकाट सुटली आहे. कल्पना करणारें मन अर्थात् बहिःप्रज्ञमन स्थिर नाहीं. त्याच्या हातून बोलणें व चालणें ( आचरण करणें ) यात मेळ रहात नाहीं. त्यामुळें भावनात्मक मनाला दुःख होतें. म्हणजे तें हि स्वस्थानीं राहिलें नाहीं. देव पावणें ही गोष्ट योग्य विचारावर किंवा भावनेवर अवलंबून आहे. परंतु विचारात व आचारांत मेळ नाहीं आणि विचार भावनाशीं जुळत नाहींत. मग देव कसा पावेल !

बहिर्मन कामनारहित व कुविचाररहित झालें तर च कांहीं फायदा होतो. पण बहिर्मन सैराट धावत असल्यावर देव भेटूं शकणार कसा ! ( २ ) अंतर्मन तरि स्थिर पाहिजे. पण तें हि स्थिर होत नाहीं. त्यांत श्रद्धा नाहीं, संशय आहे. अर्थात् संशयात्मा विनश्यति.

( १९ ) विवेकें मना आवरी स्थानभ्रष्टा ॥ १०६

या श्लोकात कर्ता ' तू ' म्हणजे मानव असा धरण्यांत येतो. कारण ' मना ' हें संबोधन घेतां येत नाहीं. परंतु असा पर्याय च कां घ्यावा ? निदान न घेऊन चालत असल्यावर तरी का घ्यावा ?

---

१ रामपिसें:-रामाचें वेड. ही भावना अर्थात् अंतःप्रज्ञमनाची

१ अन्वयः हें अंतःप्रशमना किंवा अंतरा, स्थानभ्रष्टा ( बहिष्प्रश ) मना विवेकें आवरी. एकानिष्ठपणें स्नानसंध्या, सर्वांभूतीं दया, प्रेम आणि भक्तिभाव या सर्व गोष्टी भावनात्मक असल्यामुळें एथें अंतःप्रश मनाला बहिष्प्रश मन आवरण्याची सूचना दिलेली आहे हें स्पष्ट आहे. स्थानभ्रष्टाला स्थानावर आणण्याचें काम मानसोपचारांत अंतःप्रश मनाला च सांगण्यांत येतें. कारण तें त्या मनाचें च कर्तव्य समजण्यांत येतें.

( २० ) तयाहूनि विरक्त तो कोण आहे ॥ ११३ ॥
विचारें तुझा तूं चि शोधून पाहे ॥ ११४ ॥

या च श्लोकांत एक द्वितीय व एक पुल्लिंगी तृतीय पुरुषवाचक सर्वनाम अशीं आलीं आहेत ( या पूर्वीच्या ' तुटे वाद संवाद तो हीत कारी ' या पाल्लु-पदाच्या गटांत तो हें दर्शक विशेषणात्मक सर्वनाम येतें. तसें एथें नाहीं. ) हीं सर्वनामें कोणत्या नामाकरितां येथें आलीं आहेत अशी शंका येणें स्वाभाविक आहे.

श्री. देव (स. स. प्रत) व देवस्थळी ' तयाहून ' यांतील तो म्ह. ईश्वर असा अर्थ घेतात. पांगारकर तसा घेत नाहींत. मला हि तसा अर्थ पटत नाहीं. तो=तरी

( ११४ ) ' तुझा ' या पुल्लिंगी स्वरूपावरून हें षष्ठ्यंत सर्वनाम जीवाकरितां किंवा मानवाकरितां आलें असावें असें प्रथमदर्शनीं वाटतें. परन्तु इतरत्र कोठें हि असा उपयोग नाहीं; व एथें हि अवश्यकता दिसत नाहीं.

तुझा ( तुझ्या ) विचारें तूं चि ( मना ) शोधूनि पाहे ॥ ११४ ॥
अर्थात् तूं=मना.

मनाचे श्लोकाचे गुजराथी प्रतींत ' तुझा ' या शब्दाऐवजीं ' मना ' असा पाठ दिला आहे ( ' विचारें तुझा ' या ऐवजीं ' विचारी मना ' ) तो पाठ चुकीचा असला तरी अर्थ तो च आहे. तुझा शब्दानें घोटाळा वाटल्या मुळें कोणी तरी ' मना ' हा योग्य शब्द वापरला.

एथें मुख्यतः विचार करण्याचें कारण ' विचारें ' हा शब्द. विचारें शब्दामुळें ' बाह्य मन ' असा अर्थ घेण्याचें कारण नाहीं. कारण दोन हि मनाचे ठिकाणीं ' विचार शक्ति ' आहे. दोन हि श्लोक एकत्र वाचावें हें बरें.

( २१ ) म्हणोनी मनातीत होऊनि राहे ॥ १२९ ॥

मनातीत = मना, तुझे संकल्पविकल्पात्मक जे गुण आहेत ते सोडून दे व अशी निष्काम म्हणजे वासना सुटलेली स्थिति प्राप्त करून घे. अर्थात् निद्राप्रळयांत किंवा मृत्युप्रळयांत जी तुला स्थिति प्राप्त होत असते ती प्राप्त करून घे. मनाचे सर्व च गुण सोडावयाचे असा अर्थ नव्हे. तिसऱ्या किंवा चवथ्या दैवी मनाची आपल्यास प्राप्ती करून घ्यावयाची आहे. या मनातीत मनाची कल्पना पुढील श्लो. १३० मध्ये च करून देण्यात येत आहे. ती अशी

(२२) मना अल्प संकल्प तो ही नसावा
सदा सत्य संकल्प चित्तीं वसावा
जनीं जल्प विकल्प तो हि त्यजावा ॥ १३०

वास्तविक याचा अर्थ या मनाचे जिवंतपणीं च त्याचें कार्य सर्वस्वी बंद पाडा-वयाचें ( न-मन करावयाचें ) असा च अर्थ आहे. सत्य संकल्प शब्दावरून सविकल्प समाधीची अवस्था किंवा माण्डुक्यांतील तृतीय पादाची अवस्था घेणें अवश्य होय.

एथें ती च ती च गोष्ट वारंवार सांगण्यात येत आहे. समर्थ दास-बोधांत हि ' बोलिलें च बोलावें । विवरलें चि विवरावें । ' असें सांगतात च. याचा अर्थ वारवार ती च ती च गोष्ट सांगून त्यातील तथ्य विचारानें नाहीं तर पुनः पुनरावृत्तीनें तरी मनावर ठसवावें असा असतो. मानवशास्त्राचा हा सिद्धांत च आहे. कारण मन हें सूचनावर्ति आहे. हा गुण दोन हि मनांचा आहे. त्यातल्या त्यांत अंतःस्थ मनाचा विशेषतः आहे. त्यातून वारंवार जो पडा घेण्यांत येत आहे त्यात नवीन विचार किंवा मुद्दा मांडला जात नसून ती च गोष्ट भावनाप्रधान पद्धतीनें मांडण्यांत येत आहे. ही गोष्ट विशेषतः लक्षात ठेवण्यासारखी आहे. पुराणेतिहासांतील उदाहरणें देण्यात येतात तीं देखील भावनाप्रधान बुद्धीचें पोषण करण्यासारखी च ! तीं विचार-प्रवर्तक हि होतील, होणार नाहीत असें नाही. परंतु प्रथम भावना व नंतर विचार असा क्रम राहील. सामान्य जनाकरितां विशिष्ट सुरानें म्हटले जाणारे हे श्लोक, लहान मुलापासून थोर वयाच्या सर्व लोकाच्या तोंडीं सहज बसून त्यांनीं ते गुणगुणावे व त्यातील अप्रिय पण पथ्यकर गोष्टींचा त्यांजवर पगडा बसावा असा हेतु असल्यामुळे समर्थांनीं पत्करलेली दिशा, आजकालच्या प्रभात व सायफेन्मान्या गाण्यांवरून तरी, किती प्रभावी व लोकचमत्कारक,

झाली असेल हें सांगावयास नको च. समर्थ म्हणतात च —

(२३) यळें भाव सद्बुद्धि सन्मार्ग लागे ॥ १३५

हा सज्जनांच्या संगतीचा परिणाम असतो या श्लोकानीं हि घडून येणारा आहे व भाव असला पाहिजे

(२४) म्हणे दास विश्वासतां मुक्ती लाहे ॥ १५०

यावर आतां जास्त चर्वित चर्वणाची जरूर नाहीं तथापि केवळ ज्ञानपर हे तृतीय (१३६–२०५) कांडातले श्लोक असते तर 'विश्वासा' वर भर कशाला !

(२५) देहादिक प्रपंच हा चिंतियेला।
हरीचिंतनें मुक्ति यांता वरावी ॥ १६५

या श्लोकात 'चिंतणे' या च धातूचा उपयोग केलेला असला तरी उपरि-निर्दिष्ट दोन मनापैकीं एकेकाचें कार्य श्लोकार्धांत प्रत्येक अर्धात वर्णन करून दोहोंची तुलना केली आहे हें सहजीं ध्यानात येण्यासारखें आहे.

(२६) खरें शोधितां शोधितां शोधिताहे ॥
मना बोधितां बोधितां बोधिताहे ॥ १५१

श्लो. १५१-१७४ या श्लोकातून पूर्वी विवेचिलेल्या च गोष्टी फिरून घोटल्या आहेत व सातील तत्व या श्लोकात सांगितलें आहे. तें वर दर्शविलें च आहे. सत्याचा शोध निश्चयानें व पुन पुन करीत बसल्यानें लागतो आणि फिरून फिरून तोच तोच बोध मनाला करीत बसल्यानें मनावर ठसतो असा हा मानसशास्त्राचा नियम आहे.

यच्चित्त स्तन्मयोभवति गुह्यमेतत्सनातनम् ॥

या नियमाचा च एक प्रकारें हा विस्तार आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. यांपैकीं अखेरच्या 'ता' चा स्वर लांबवून 'बोधिता हि बोध लागत नाहीं' असा एक अर्थ करता येण्यासारखा आहे व तो गुजरायी प्रतीत घेतला हि आहे. परतु त्याबद्दल विचार एथें याहून अधिक नको.

(२७) बहूता परी कूसरी तत्वझाडा।
परी पाहिजे अतरीं तो निवाडा ॥ १५२ ॥

कूसरी आणि तत्वझाडा (तत्वाचें पृथक्करण analysis) हे शब्द बहिर्मन-मनाच व बुद्धीचे द्योतक आहेतच. पण या बुद्धीच व्यापाराखेराज (परी)

अंतरीं निवाडा पाहिजे असें जें एथें म्हटलें आहे त्याचा अर्थ काय ? परी या शब्दानें दोहोंत भेद दाखविला आहे अर्थात् प्रथम चरणांतील गोष्ट अंतरीची नव्हे. वास्तविक तत्वझाडा करणारें आणि कुसरी दाखविणारें मन च निवाडा करीत असतें. किंबहुना 'झाडा' या शब्दानें च 'निर्णय,' 'निकाल' हा अर्थ सूचित होतो. अर्थात् यापेक्षां निराळ्या च प्रकारचा 'अंतरींचा निवाडा' समर्थांना पाहिजे आहे. समर्थांना एथें अतींद्रिय प्रतीति किंवा साक्षात्कार पाहिजे आहे असा भास होतो. ही बाह्य मनाची गोष्ट नव्हे. शिवाय बाह्य मनानें कितीं हि विचार केला तरी त्याला संशय राहू शकतो कीं 'तर साचार तें खात्रीनें हें च कां?' कारण विचारांनां अंत व निश्चितता नसते. शास्त्रें फार अपार असतात. गुरुप्रतीति, शास्त्रप्रतीति, सर्व झाली तरी आत्मप्रतीति लागते ती या च करतां. एथें तर्क लंगडा पडतो. एवढ्या करितां च श्रीशंकराचार्य किंवा त्याच सारखे महापुरुष 'तर्कोऽप्रतिष्ठः' (·१५६ पहा.) नैषा तर्केण मतिरापनेया श्रुतयोविभिन्नाः (श्लो. १५७ पहा) असें म्हणतात. ही निःसंदिग्धता यावयास बहिःप्रज्ञ मनापेक्षां व बुद्धीपेक्षां निराळें अतींद्रिय पाहिजे. तें अंतःप्रज्ञ मनाचे पलीकडे तथापि त्या मनाशीं च प्रवेश असलेलें असें तिसरें किंवा दैवी मन होय. इड्सन म्हणतो कीं ईश्वरी नियमांचे निरपेक्ष व निश्चित ज्ञान स्वाभाविक रितीनें या अंतःप्रज्ञ मनानें मिळूं शकतें. परंतु आमच्या शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें ती त्या मनाचे पलीकडची स्थिति होय. मानसशास्त्रदृष्ट्या हा व पुढील श्लोक फार महत्वाचे होत.

(२८) याच तत्वझाड्यासंबंधानें पुढील १५३ व्या श्लोकांत सांगत आहेत. 'तर्कोऽप्रतिष्ठः' याच तत्वाचें श्लो. १५२।१५३ १५६।१५७ यांत विवरण केलें आहे.

नव्हे तत्वज्ञानें [ समाधान ]

समाधान तें सज्जनाचेनि योगें ॥ १५३

तत्वझाडा करूं लागलें तरी अखेरचा निर्णय व समाधान तरी तेवढ्यानें होत नाहीं. त्या निश्चयाकरितां सज्जनाचें (गुरूचें) सहाय्य च पाहिजे. शिवाय 'शास्त्रें फार अपार' आणि 'आयुष्य अल्प'

'बहु' साल शास्त्र पाहतां सरेना । आयुष्य पुरेना जन्मवेरी ॥

जन्मवेरी वायां संदेहीं पडावें । केधवा घडावें समाधान ॥

अशी स्थिति असलेमुळें निश्चय होऊं शकत नाहीं. भगवान् म्हणतात च की बहूनां जन्मनां अंते—ज्ञानवान् ( मां प्रपद्यते )

तेव्हा "या चि जन्मीं या च देहीं" निःसंदिग्ध आणि प्रचीतीचें ब्रह्मज्ञान पाहिजे तर तृतीय आत्मपाद किंवा तृतीय मनांत प्रवेश किंवा मनोविकासाची तिसरी पायरी प्राप्त झाली पाहिजे. प्रत्ययाचें, अनुभवाचें विज्ञान. तें पुस्तकी ज्ञानानें मिळूं शकत नाहीं. त्या साठीं सज्जनाची सद्गुरूची च कास धरली पाहिजे. सज्जनाची व्याख्या पहा: सर्व व्यापक वस्तु सद्यःपाविजे तें ज्ञान । ऐसे जयापासीं ज्ञान । तोचि जाणावा सज्जन ॥ दासबोध ६।१।२३-२४ तथापि हें अतीन्द्रिय ज्ञान आहे व तें अंतरांतल्या अतरिंद्रियाचें कार्य आहे. वास्तविक तें ज्ञान "स्फुरलें च" पाहिजे पण हें स्फुरण कोठें समजतें ? बाह्येन्द्रियाला किंवा त्याची अपेक्षा करणाऱ्या मनाला लाभ नव्हे.

( २९ ) तें "गुज दिसेना जनीं" तरी "तेथेंचि आहे" "तें चि शोधून पाहे" जनीं सर्व कोंदाटलें ( तरी ) तें कळेना ॥ ( श्लो. १५५ ).

अर्थः—तें गुह्य म्हणजे आत्मज्ञान ज्ञानेंद्रियानें प्राप्त होत नाहीं किंवा कर्मेन्द्रियानें हस्तगत होत नाहीं. जनीं=बाह्य सृष्टींत अर्थात् बहिष्प्रज्ञ मनानें.

( ३० ) अतर्कासि तर्की असा कोण आहे ॥ १५६

तर्क करणें हा बहिष्प्रज्ञ मनाचा च विषय आहे. पण या बाबतींत

तर्काप्रतिष्ठ। "नैषा तर्केण मतिरापनेया" प्रोक्तान्येनैव सुज्ञानाय प्रेष्ठ। कठोपनिषद् याचें विवरण या श्लोकांत आहे.

प्रकृतिभ्यः परं यत्तु तत् अचिन्त्यस्य लक्षणम् । ब्रे. सूत्र.

पुढील दोन श्लोकांत श्रुतयो विभिन्नाः । नैको मुनिर्यस्यवचः प्रमाणम् ॥

यावर जगु काय भाष्य आहे, या सर्वांचें तात्पर्य एक च की बहिष्प्रज्ञ मनानें हें काम होणारें नसून अंतःप्रज्ञ मनानें ( ultra किंवा Supra human ) तें ज्ञान विश्वासानें "यच्चित्तः तन्मयो भवति" या द्वारानें Inspiration स्फुरणरूपानें प्राप्त करून घ्यावयाचें आहे. या द्वारानें च ईश्वरी नियमांचें स्वयंस्फूर्तीनें ज्ञान बिनचुक होऊं शकतें असें हडसन म्हणतो.

मनो हि आत्मा । मन उपास्स्वेति । छांदोग्य उपनिषद ७-२

अर्थात् हें एथें वर्णन केलेलें मनःबाह्य मन नव्हे.

( ३१ ) देहादीक प्रपंच हा चिंतियेला । परी अंतरीं लोभ निश्चीत ठेला ।
हरीचिंतनें मुक्ति कांता वरावी । सदा संगती सज्जनाची धरावी ॥ १६५

देहचिंतन विरुद्ध हरि चिंतन. या दोहोंतील विरोध एथें दर्शविला आहे. एक बहिःप्रज्ञ मनाचा विषय तर दुसरा अंतःप्रज्ञ मनाचा विषय होय.

चरण २ यांत ' अंतरीं लोभ ' असे शब्द आहेत. षड्विकारांपैकीं लोभ हा एथें अंतःप्रज्ञमनाचा विषय दर्शविला आहे कीं बहिःप्रज्ञ मनाचा अशी कोणी पृच्छा करील. प्रपंच चिंतिणारें जे बहिःप्रज्ञ मन, त्या मनाचें अंतरीं लोभ असतो यांत शंकाच नाहीं. त्यामुळें ' अंतरीं ' शब्दानें एथें बहिःप्रज्ञ मन घेतल्यास हरकत नाहीं. प्रपंच चिंतन केलें तें केलें च पण त्याशिवाय लोभाला कायमचें बिऱ्हाड दिलें त्यामुळें जन्ममरणाचें रहाटगाडगें कायमचें मागें लागलें. उलटपक्षीं अंतःप्रज्ञ मनानें हरिचिंतन केलें त्यामुळें मुक्तिकांतेचा प्रपंच गळ्यांत पडला आणि जन्ममरणाची कायमची व्यथा गेली अशी एथें तुलना केली आहे.

तथापि आतांपर्यंत ' अंतर ' हा शब्द सर्वत्र अंतःप्रज्ञ मन या अर्थी लागतो असें दिसून आलें आहे, तो च एथें चालणार नाहीं असें मात्र नव्हे. कारण वासना या बहिःप्रज्ञ मनाचे ठिकाणीं विशेषतः आहेत, तथापि त्या अंतःप्रज्ञ मनाचे ठिकाणीं मुळीं च नाहींत असें मात्र नव्हे. त्यांचें सूक्ष्म स्वरूप अंतःप्रज्ञ मनाजवळ आहे च. त्यांचे बीजरूप मरणप्रसंगीं ह्या सूक्ष्म मनाबरोबर देहाबाहेर पडून पुढें पुनर्जन्मास कारण होतें हें प्रसिद्ध च आहे. तेव्हां ' अंतरीं ' शब्दानें अंतःप्रज्ञ मन घेतलें आणि ' लोभ ' या शब्दानें लोभाचें बीजस्वरूप घेतलें म्हणजे कोणती हि अडचण पडत नाहीं. अभ्यासानें किंवा संवयीनें ज्या गोष्टींना किंवा भावनांना स्थिरता येत जाईल किंवा येत जाते त्या गोष्टी या मनाचे सुपूर्त केल्या जातात. वाउनेशिवाय ह्या जीं कामें आपण करतों व जीं ' अनिच्छत्वपि ' ( involuntary ) म्हणून समजलीं जातात तीं सर्व बीजरूपानें या द्वितीय मनाकडून होतात असा शास्त्रज्ञांचा अभिप्राय आहे. या आंतर मनाकडून त्यांची आपल्यास न कळत पुनरावृत्ति होत असते व म्हणून त्यांस involuntary अनिच्छत्वपि असें ते म्हणतात. सारांश एथें ' अंतर ' शब्दानें आंतर मन ( अंतःप्रज्ञमन ) घेतल्यानें कांहीं च बिघडत नाहीं.

( ३२ ) स्फुरे विषयीं कल्पना ते अविद्या ।

स्फुरे महत्त रे जाण माया सुविद्या ।
मुळीं कल्पना दों रुपें तें चि जाली ।
विवेकें तरी सस्वरूपीं मिळाली ॥ १७२

हा श्लोक फार महत्त्वाचा आहे. कारण यांत सर्व कल्पना नाहींशी केल्या वरची स्थिति वर्णन केली आहे. त्यांतील पहिला च शब्द अत्यंत महत्त्वाचा वाटतो. विषयाचें ठिकाणीं काय किंवा ब्रह्माचे ठिकाणीं काय - कल्पना आपाततः स्फुरत असते. कल्पना करणाऱ्या मनाचा तो स्वयमेव खेळ नसून मनाच्या पलीकडचा कोणाचा तरी आहे. ह्मणून मनुष्यानें उतावीळ आणि निराश होतां कामा नये. धीर सो गंभीर पाहिजे. हा मुद्दा अत्यंत महत्वाचा असा मला वाटतो.

विषयाकडचें स्फुरण, पदार्थांच्या व देहेन्द्रियांच्या ठिकाणीं असलेल्या गुणांमुळें होतें हें पूर्वी सांगितलें च आहे. गुणाः गुणेषु वर्तन्ते (भ. गीता) हा नियम. ती गोष्ट, देहबुद्धीमुळें, आपण आपली ह्मणून समजतों ही चूक होय. निर्जीव समजलेल्या अणूंच्या रासायनिक आकर्षण व अपसारण (affnity & disaffinity (किंवा repulsion) क्रियाकडे लक्षपूर्वक पाहिल्यानें ही गोष्ट चटदिशी लक्षांत येते. ही देहबुद्धि सोडून दिली म्हणजे दुसरा प्रश्न 'ब्रह्म' संबंधाचा येतो. समर्थ म्हणतात तेथें हि स्वयमेव स्फुरण च होत असतें.

ददामि बुद्धियोगं तं येन मामुपयांति ते ॥
तेषामेव अनुकंपार्थं अहं अज्ञानजं तमः नाशयामि ॥
तेषामहं समुद्धर्ता ॥ नाहं प्रकाशः सर्वस्य ॥

या गीतावचनावरून हि ती च गोष्ट सिद्ध होते. अनन्यभजन करणारांना (९-१३) भक्तीनें नित्ययुक्त होऊन उपासना करणारांना [९-१४] आणि 'नित्याभियुक्तां' चा मी योगक्षेम चालवितो (९-२२). माझे ठिकाणीं चित्त ठेवून, ज्यांचे प्राण हि मद्गत झाले आहेत, जे माझी च कथा वगैरे करतात व सर्वथा माझे ठिकाणीं च संतुष्ट असतात, आनंद पावतात, अशा सततयुक्तांना मी बुद्धियोग देतो आणि त्यामुळें ते माझे ठिकाणीं येऊन पोंचतात (१०-१०) त्यांजवर अनुग्रह करून मी त्यांचे अज्ञानोत्पन्नतमाचा नाश करतो. माझ्या ठिकाणीं सर्व कर्मांचा (जें जें कर्म हातून घडेल त्यांचा) संन्यास करून मत्परायण होतात त्यांचा मी उद्धार करतो. असें ठिकठिकाणीं भगवंत म्हणत आहेत या सर्वांचा अर्थ तो च.

मी सर्वांस प्रकाशमान होत नाहीं. अत्यंत मत्परायण असतील, अनन्य असतील, अखंड उपासना करीत असतील, मत्कर्म, मदर्थकर्म किंवा मदर्थ सर्व कर्म संन्यास करतील त्यांस सिद्धि प्राप्त होत असते (१२-१०) ती हि अर्थात् माझ्या प्रसादानें. तसें च, प्रशांत मन (न किंचिदपि चिंतयेत् या स्थितींत) झाल्यावर उत्तम सुखप्राप्ति होते (६-२७) असें म्हटलें आहे. ती तरी ईश्वराच्या अनुग्रहानें असें च समजलें पाहिजे.

प्रथमार्धांतील माया शब्द प्रत्येक चरणांत घेतला पाहिजे किंवा माया= कल्पना असा अर्थ घेतला पाहिजे असें वाटतें.

अन्वयः—स्फुरे वीपर्यी कल्पना ते अविद्या माया; स्फुरे ब्रह्म (ती) रे माया सुविद्या जाण. मूळीं कल्पना (एक च) ते चि दोरूपें झाली। विवेकें सरी स्वस्वरूपीं मिळाली। धारण ' ब्रह्मीं लावी अनुसंधान। ते हि कल्पना '। दासबोध. माया आपली कल्पना ॥ ७. १. ५९.

ब्रह्म अंतरीं प्रकाशे ॥ ७. ५. १. अद्वैत कल्पना प्रकाशे ॥ ७. ५. ३७

कल्पना जन्माचें मूळ। कल्पना भक्तीचें फळ।

कल्पना ते चि केवळ। मोक्षदाती ॥७.५.२४.माया आपुली कल्पना७.१.५९

असें समर्थ हि दासबोधात म्हणतात. ' माया ' = कल्पना असा अर्थ घेतल्यास

(२) अन्वयः—विपर्यी कल्पना स्फुरे ती अविद्या; ब्रह्म माया (कल्पना) स्फुरे ती सुविद्या. मूळीं कल्पना दोरूपें ते ।चि जाली... ... ... ...

अर्थः (प्रथम दर्शनीं) विषयाकडे काय किंवा ब्रह्माकडे काय जी कल्पना स्फुरण पावते ती आपाततः किंवा स्वाभाविक होय. आत्मबलानें ती ब्रह्माकडे स्फुरते एरवीं पूर्वसंस्कारामुळें ती साहजिक विषयाकडे स्फुरते. स्फुरण ही क्रिया दोहींकडे एक च. पण ती अशी दोन रूपें पावतें आणि विवेकानें (मूळचें स्फुरण सांडून) स्वस्वरूपीं मिळते.

अविद्या आणि सुविद्या—दोनहि कल्पना (माया) अशीं दोन मायांचीं स्वरूपें एथें सांगितलीं आहेत. ईशावास्य, काठक, श्वेताश्वतर, मुण्डक, केन इत्यादि उपनिषदांतून हे शब्द येतात.

सुविद्या अविद्याः—यांपैकीं कठोपनिषदांतील खालील श्लोकावरून ही कल्पना व विशेषतः अखेरच्या चरणांतील कल्पना आणि श्लो– २७ मधील [ भयाचे भये काय भीतोसि लंडी ॥ ] ही उचललेली दिसते

श्रेयश्च प्रेयश्च मनुष्यमेतः तौ संपरीत्य विविनक्ति धीरः ।
श्रेयोऽहि धीरोऽभि प्रेयसः वृणीते । प्रेयो मन्द्रो योगक्षेमाद्वृणीते ॥
एतद्धि एव अक्षरं ब्रह्म । एतदेव अक्षरं परम् ॥
एतद्धि एव अक्षरं ज्ञात्वा । यो यदिच्छेद् तस्य तत् ॥ कठोपनिषद्

एथें अविद्या आणि विद्या अथवा प्रेयः आणि श्रेयः असे दोन भिन्नभिन्न मार्ग आहेत व ते भिन्नभिन्न फलें देणारे आहेत असें सांगून यम नाचिकेताला म्हणतो

*विद्याभीप्सिनं नचिकेतसं मन्ये न त्वा कामा बहवो लोलुपन्तः ।*
सामान्यतः कोणास हि विषय लुब्ध करीत असून, नाचिकेतसा, तुला ज्या अर्थी ते लोभवूं शकत नाहींत त्या अर्थी तू विद्येचा म्ह. श्रेयाची इच्छा करणारा आहेस, अर्थात् अविद्या म्ह. काम अथवा विषयाची वासना आणि विद्या म्ह. श्रेयः अथवा ब्रह्म किंवा मोक्षविषयक बुद्धि असा एथें स्पष्ट अर्थ दिसतो.

श्लो. १७३ हा त्या उपनिषदांतील च 'गुहाहित' या शब्दावरून सुचला असावा असें वाटतें आणि श्लो. १७४ त्यांतील च 'श्रवणायापि बहुभिर्यो न लभ्यः । आणि 'यमेव एषवृणुते तेन लभ्यः' । यांवरून सुचलेले दिसतात.

मानसशास्त्राच्या दृष्टीनें या श्लोकांचें महत्त्व इतकें च कीं ध्यान म्हणा किंवा उपासना (नामस्मरण इ.) म्हणा यांमुळें अंतःप्रज्ञ मन 'तच्चित्त' किंवा तन्मय झालें म्हणजे सहजासृचीनें ब्रह्म स्फुरतें. एथें उत्कंठा अवश्य असली तरी उतावळेपणा उपयोगी नाहीं. धीर पाहिजे.

(३३) कळेना कळेना कदा लोचनासी ॥
घसेना दिसेना जगीं मीपणासी ॥ १७७

लोचनासी--बहिश्चक्षु आणि अंतश्चक्षु आणि मिथ्या मीपण म्ह. देहबुद्धि यांस दिसत नाहीं. वास्तविक देव अंतरीं आहे तो समजून घ्यावयाचा आहे व 'गुरुवीण तो सर्वथा ही न दिसे ॥ १७९

(३४) मना सद्गुरु तो चि शोधूनि पाहे ॥ १८२
(३५) मना संत अनंत शोधीत जावे ॥ १८४

हा खरा सद्गुरु हि बाह्य मनानें नव्हे तर अंतर्मनानें च कळूं शकणार आहे आणि संत अनंत हि त्या च मनानें.

## मनोबोध—Auto-Suggestions

## ( ५ )

(३६) भक्तज्ञानी याबद्दल पूर्वी विवरण केलें च आहे. श्लो. ४७

(३७) सदा सर्वदा राम सान्निध आहे।
मना सज्जना सत्य शोधून पाहे।
अखंडित भेटी रघूराज योगु।
मना सांडि रे मीपणाचा वियोगु ॥ १८६

अखंडित भेटी-एथें अखंडित म्हणजे अनन्यता किंवा तादात्म्य दर्शवितें आणि तें देहबुद्धि सुटता च समजतें. पण देहबुद्धि सुटणें म्हणजे च देहयुक्त बहिष्प्रज्ञ मनाला रजा देणें होय. मना सज्जना०=मना दैवी बनण्याची अपेक्षा धर.

(३८) मना भासलें सर्व कांहीं पहावें ॥
परी संग सोडूनि सुखी रहावें ॥ १८७

भासणाऱ्या ( दृश्य ) जग पाहण्याची क्रिया बहिरिंद्रियानीं बाह्य मनाच्या सहाय्यानें च मुख्यत होणार आहे. म्हणून एथें 'मना' शब्द बहिष्प्रज्ञ मनाचा बोधक प्रथम दर्शनीं वाटतो. 'परी संग सोडून सुखी रहावें' ही सूचना अर्थात च अंत प्रज्ञ मनाला आहे यात शंका च नाहीं. त्या अर्थी सामान्यतः जागरुकतेमुळें दृश्य जगाशीं संगत असल्यामुळें जें जें चित्रगुप्त-पणानें ज्ञान करून घ्यावयाचे तें घ्यावें पण भावना प्रधानतेमुळें त्यापैकीं कोणाशीं हि संग-कामक्रोध-किंवा तत्सदृशी वासना शिल्लक ठेवू नये तर च सौख्य प्राप्त होईल असा भावार्थ आहे.

(३९) देहभान तें ज्ञानशस्त्रें तुटावें ॥
विदेहीपणें भक्तिमार्गें चि जावें ॥ १८८

एथील साम्य असंगशस्त्रेण दृढेन छित्वा ॥ १५ ३ या गीतोक्तीशीं आहे. हें ज्ञान कोणतें देहबुद्धि खुडण्याचें म्हणजे गीता ३ २७।२८ यांतील. अखेर 'भक्तिमार्गानें' च जावयाचें आहे. हा केवळ ज्ञानमार्ग नव्हे. भगवद्गीतेशीं थोडा विरोध आहे तो पुढील अर्थात सांगितला आहे.

विरक्तिबळें निंद्य सर्वें त्यजावें ।

परि संग सोडूनि सूखें रहावें ॥ १८८

अर्थात् ' सर्वथा वर्तमानोऽपि ' ही स्वैरवर्तनाची दिशा समर्थांना मान्य नाहीं. त्यांना ' जळो त्यांचें जिणें ' असें वाटवे. लोकसंग्रहाची अत्युत्कट इच्छा असल्यामुळें असें त्यांस वाटावें यांत नवल नाहीं. भगवंतांनीं ३-२५।२६ मध्यें ती च सांगितली. ज्यांना स्वैर वर्तावयाचें असेल त्यांनीं ' अरण्यांत रहावें ' असें त्यांचें म्हणणें. शिवाय मनाला दैवी किंवा सज्जन बनवावयाचें तर स्वैर वर्तनास संमति कशी कोणाला देववेल ? सर्वथा वर्तमानः यांतील लोकक्षयांची दिशा समर्थांना सर्वस्वीं पसंत च आहे. व

कुर्याद्विद्वांस्तथा असक्तः ( चिकीर्षुः लोकसंग्रहम् ) ॥ ३-२५
याचें च वरील तिसरा व चवथा चरण हें रूपांतर आहे.

सूखें—अद्वैतानंदांत ( रहावें )

[४०] मनीं शून्य अज्ञान हें मावळेना ॥ १९१

शून्य अज्ञानः यांतील शून्य म्हणजे भिन्नपणा (दा. ८-१०-७२) द्वैतबुद्धि म्हणजे देहात्मभाव. अर्थात् पहिला चरणः देहेबुद्धीचा निश्चयो ज्या ढळेना। आणि अखेरचा चरण मनीं शून्य अज्ञान हें मावळेना । हे दोन चरण केवळ शब्दरूपांतरेंच ( paraphrase ) आहेत. ही द्वैतबुद्धि बहिःप्रशमनांत सदैव, वसत असते व तिचा परिणाम अंतःप्रज्ञ मनावर सारखा असतो च.

( ४१ ) नव्हे कार्यकर्ता नव्हे सृष्टिभर्ता ॥ परेहूनि पर्ता न लिंपे विवर्ता ॥'
तया निर्विकल्पासि.........................॥ १९०.

माण्डुक्योपनिषद्—प्रपंचोपशमम् शांतम्अव्यवहार्यम् ।
अलक्षणम् अव्यपदेश्यम्।

[४२] नव्हे जाणतां नेणता देवराणा ।
न ये वर्णितां वेदशास्त्रा पुराणा ।
नव्हे दृश्य अदृश्य साक्षी तयाचा ।
श्रुती नेणती नेणती अंत ज्याचा ॥ १९३ ॥

[४३] वसे हृदयीं देव तो कोण कैसा ।
पुसे आदरें साधक प्रश्न ऐसा ।

देहे टाकितां देव कोठे रहातो ।
परी मागुता ठाव कोठें पहातो ॥ १९४ ॥

(४४) वसे हृदयीं देव तो जाण ऐसा ।
नभाचे परी व्यापकु जाण तैसा ।
सदा संचला येत ना जात कांहीं ॥
तयावीण कोठे रिता ठाव नाहीं ॥ १९५ ॥

(४५) नभीं वावरे जो अणुरेणु कांहीं ॥
रिता ठाव या राघवेंवीण नाहीं ॥ १९६ ॥

या तीन चार श्लोकांचा थोडा संबंध आहे. १९१ तील ' देवराणा ' हा शब्द देवांतला मुख्य असा अर्थ दर्शवितो. मानवी शरीरातील प्रत्येक ज्ञानेंद्रियाचे ठिकाणीं तदधिष्ठित देव आहे अशी उपनिषदांत कल्पना आहे. या सर्वांना, वास्तविक आत्म्याची ज्ञानशक्ति अंशतः प्राप्त झालेली आहे. देव ही संज्ञा, प्रकाशमान् या अर्थी ज्ञानेंद्रिय अधिष्ठित शक्तीला लावली जावी हें स्वाभाविक आहे. अर्थात् या देवांतला राजा म्ह. आत्मा. याला एथें जाणता आणि नेणता अशीं दोन विशेषणें लावलीं आहेत. माण्डुक्योपनिषदांतील आत्म्याच्या चवथ्या पादाचें आतां वर्णन पहाः ( पा. ३ )

न अंतः प्रज्ञं न बहिष्प्रज्ञं न उभयतः प्रज्ञम् ।
न प्रज्ञानघनम् न प्रज्ञं न अप्रज्ञं अव्यपदेश इ. इ.

या वर्णनांतील ' न प्रज्ञं न अप्रज्ञं ' याचें ' जाणता नेणता ' हें केवळ भाषांतर च आहे. याचें पुढील वर्णन आणि वरील श्लोकांतील वर्णन समोरासमोर ठेवून पहा म्हणजे दिसून येईल कीं हा १९१ वा श्लोक हें वर्णन पुढें ठेवून च लिहिला आहे. तें वर्णन नेति नेति स्वरूपाचें आहे, तें असेंः

अदृष्टम् , अव्यवहार्यम् , अग्राह्यम् , अलक्षणम् , अचिन्त्यम्
अव्यपदेश्यम् , एकात्मप्रत्ययसारम् ॥

स. स. च्या पुस्तकांत केनोपनिषदांतील ' अन्यदेव तद्विदितात् अथो अविदितात् अधि । ' या श्रुतीशीं साम्य दाखविण्यांत आलें आहे किंवा न तत्र चक्षुर्गच्छति इत्यादि श्रुतीशीं साम्य दाखविलें आहे. त्यापेक्षां माण्डुक्योपनिषदाशीं साम्य अधिक आहे. वाचकांनीं ताडून पहावें.

श्लोक ११४ व ११५ यांतील 'हृदयीं' शब्दाचे अर्थाविषयीं थोडा उहापोह केला पाहिजे. एथें 'अंतर' शब्द सोडून 'हृदयीं' शब्द मुद्दाम च योजलेला आहे. कारण तो प्रदेश 'अंतरा'च्या पलीकडचा आहे. माण्डुक्योपनिषदांत अंतःप्रज्ञ मनानंतर एक 'अंतर्यामी, ऐष योनिः सर्वस्य प्रभवाप्ययौ हि भूतानाम्।' अशा आत्म्याचा तृतीयपाद सांगितल्यानंतर वरचा चवथा पाद सांगितला आहे. तो हा हृदयस्थित देव राणा होय. त्याचें वर्णन वरील श्लोकांत दर्शविल्याप्रमाणें 'न प्रज्ञं न अप्रज्ञं' आणि नेति नेति स्वरूपाचें केलें गेलें आहे. त्याचें भावरूपानें वर्णनहि शांतं शिवं प्रपंचोपशमं एकात्मप्रत्ययसारं असें केलें आहे. तथापि त्याचें खरें वर्णन 'अद्वैत' या शब्दानें दर्शविलें आहे., हें वर्णन श्लो. ११९ मध्यें 'दुजेवीण' या शब्दानें केलें आहे.

हृदयीं शब्दाचे अमरकोशांत दोन अर्थ सांपडतात. एक आपण हृदय म्हणतो (Heart) त्या ठिकाणीं छातींत आहे तें. परंतु दुसरें मनस्वरूपी आहे पहा :

चित्तं तु चेतो हृदयं स्वान्तं हृन्मानसं मनः ॥ १.३१.

याचें स्थान मस्तिष्कांत किंवा नाभीचे ठिकाणीं किंवा कोणाचे मतें सर्व शरीरभर आहे (जेथें Nervous system आहे तेथें). अशा हृदयाच्या ठिकाणीं आकाश आहे तें सूक्ष्माहून सूक्ष्म आणि स्थूलाहून स्थूल आहे असें छांदोग्योपनिषदांत सांगितलें आहे.

(१) अस्मिन् ब्रह्मपुरे दहरं पुंडरीकं वेश्म दहरोऽस्मिन् अंतराकाशः। अर्थः—या शरीरामधील कमलाकार सूक्ष्म स्थानामध्यें सूक्ष्मतर आकाश आहे.

(२) यावान्वा अयमाकाशः तावानेषः अंतर्हृदये आकाशः उभे अस्मिन् द्यावापृथिवी अन्तरेव समाहिते उभौ अग्निश्च वायुश्च सूर्याचंद्रमसौ उभौ विद्युन्नक्षत्राणि यच्चास्येहास्ति यच्च नास्ति सर्वं तदस्मिन् समाहितमिति। न अस्य जरया एतज्जीर्यति न वधेन अस्य हन्यते एतत्सत्यं ब्रह्मपुरम्।

अर्थः स्थूल आकाश जेवढें विस्तृत आहे तेवढें च आकाश या हृदयाचे आंत आहे. स्वर्ग व पृथिवी हीं दोन्ही या सूक्ष्म आकाशांत स्थित आहेत. अग्नि वायु सूर्य चंद्र विद्युत् नक्षत्रें, या देहाचें जें काहीं (आत्मरूपानें) आहे व जें (आत्मरूपानें) नाहीं तें सर्व या हृदयाकाशामध्यें स्थित आहे. या शरीराच्या जरेनें याला अतराकाशरूपी ब्रह्माला जय प्राप्त होत नाहीं आणि

शरीराच्या वधानें याला मरण येत नाहीं. हें ( अंतराकाश ) खरें ब्रह्मपुर आहे. ( हाच आत्मा होय )

सारांश एथील हृदय शब्दानें सूक्ष्माहून सूक्ष्म आणि स्थूलाहून स्थूल अजर आणि अमर असें आकाश जें शरीरात आणि शरीराबाहेर सर्वत्र आहे तें घ्यावयाचें आहे. तो च आत्मा.

( ४६ ) नभा सारिखें रूप या राघवाचें
मनीं चिंतितां मूळ तुटे भवाचे ॥ १९७

या स्वरूपाचें वर्णन वर आलें च आहे. हें रामनामाबरोबरचे ध्यानाचे श्लोक असून खालील श्लोकांत

( ४७ ) नभें व्यापिलें सर्व सृष्टीस आहे
रघूनायका उपमा ते न साहे ।
दुजेवीण जो तो चि तो हा स्वभावे
तया व्यापकू व्यर्थ कैसे म्हणावें ॥ १९८

( ४८ ) ' दुजेवीण ' जे खूण स्वामिभ्रतापें ॥ १८९

या आत्म्याचें परमात्म अद्वैतस्वरूप पूर्णपणें वर्णिलें आहे. यांतील हृदय व नभाची उपमा छांदोग्यांतून घेतली आहे, यात शंका च नाहीं. तथापि त्यांतील कल्पना माण्डूक्यांत आलेली आहे व. श्लो. १९३ पर्यंत माण्डूक्यउपनिषदांतील कल्पना च प्रमुखत्वें करून घेतली आहे हें आतां पर्यंतच्या विवेचनावरून दिसून आलें च आहे. या वर्णनानंतर

देह टाकितां देव कोठें रहातो ॥
परी मागुता ठाव कोठें पहातो ॥ १९४

या प्रश्नाचे निराळें उत्तर देण्याचें कारण रहात च नाहीं. तथापि

सदा संचला येत ना जात कांहीं ।
तयावीण कोठें रिता ठाव नाहीं ॥ १९५

यांत आणि माण्डुक्यांतील ' अद्वैत ' या शब्दांत आलें च आहे.

( ४९ ) कळे आकळे रूप तें ज्ञान होतां ।
तेथें आटली सर्व साक्षी अवस्था ।
मना उन्मनी शब्द कुंठीत आहे ।
तो गे तो चि तो राम सर्वत्र पाहे ॥ २००

मनातीत शब्दासारखा हा ' उन्मनी ' किंवा ' न मन ' अवस्था दर्शविणारा शब्द या श्लोकांत एकदां च आला आहे. माण्डुक्यांतील एकात्मप्रत्ययसारं प्रपंचोपशमं । यांतील कल्पना या श्लोकांत दिसून येते. ' उन्मनी ' शब्दाची ' शब्द कुंठीत आहे ' ही जणु व्याख्या च बनून गेली आहे. कारण ती अद्वैत स्थिति च होय.

(५०) कदा ओळखी माजि दूजें दिसेना ॥
मनी मानसीं द्वैत काहीं वसेना ॥ २०१

एथें फिरून मनीं मानसीं हे दोन शब्द दोन मनाचे बाह्य व आंतर बोधक आले आहेत. या दोन शब्दांचा एथला उपयोग दोन मनाची कल्पना कोणाला हि पटवांत घ्यावयाला लावील इतका उघड आहे.

(५१) मना गूज रे तूज हें प्राप्त जालें ।
परी अंतरीं पाहिजे यत्न केले
सदा श्रवणें पाविजे निश्चयासी
धरी सज्जन संगती धन्य होसी ॥ २०२

येथें फिरून ' मना ' आणि ' अंतरीं ' असे दोन शब्द आले आहेत. हे दोन शब्द प्रथमदर्शनीं बाह्य व आंतर मनाचे बोधक दिसतात आणि तसें घेतल्यानें कांहीं बिघडत नाहीं. तथापि पूर्वी दोन तीन वेळां दर्शविल्याप्रमाणें ते दोन हि शब्द आंतर मनाचे द्योतक समजल्यानें हि कांहीं बिघडत नाहीं. कारण यत्न, अभ्यास, संवय, निश्चय हे मानसशास्त्रांत अवश्यक असून त्यांचा दोन हि मनांशीं संबंध आहे. सदा श्रवण–हा अभ्यासाचा च प्रकार होय. श्रवण शब्दांत श्रवणमनन आणि निदिध्यास या सर्वांचा समावेश करण्यास हरकत नाहीं.

(५२) श्लोक २०३।२०४ मध्यें नवीन कांहीं नाहीं. ते केवळ उपसंहाराचे श्लोक आहेत. श्लो. २०५ याचा प्रथमतः च विचार केला आहे. त्याची पुनरुक्ति नको.

## (६) उपसंहार

एथवर या २०५ श्लोकांत जेथें जेथें मन, मानस, अंतर, चित्त वगैरे शब्द आले त्या प्रत्येक ठिकाणीं दोन मनांची कल्पना लागू पडते असें

दाखविण्याचा प्रयत्न केला. कित्येक ठिकाणीं या कल्पने। वांचून अर्थबोध नीट होत नाहीं तर कित्येक ठिकाणीं अन्वयार्थ या कल्पनेमुळें सुगम वाटतो. मानसशास्त्राचे नियम सर्वत्र लागू पडतात असें हि दिसून आलें. निदान ही। कल्पना कोठें च बाधक झाली नाहीं. समर्थांचे मनांत नसलेली च एकादी कल्पना घेऊन ती श्लोकान् श्लोकाला लावून पडताळून पाहात असतां हि कोठें अडथळा येऊं नये किंवा अर्थ दुर्गम होऊं नये हें कयाचें लक्षण म्हणतां येईल!

मांडुक्य उपनिषदांत जें वर्णन आहे तें मनाचें नसून आत्म्याच्या चार पादांचें आहे. वास्तविक आत्म्याला चार पाद असूं च शकत नाहींत. अर्थात् अशा आत्म्याचे पादांची कल्पना साधकाला आणि अध्ययनेच्छूला सुकर व्हावी म्हणून केली आहे असें च समजलें पाहिजे. मांडुक्योपनिषदांत हि चवथ्या पादाच्या अखेर ' स आत्मा स विज्ञेयः ' असें वर्णन केलें आहे. त्या अर्थी बाकीच्या पादांना श्रुति कमी लेखते असें समजणें भाग आहे. इतर उपनिषदांतून आत्मा आणि मन हे शब्द एकार्थबोधक ( Synonymous ) असे वापरले जातात हें मी दाखविलें च आहे. छांदोग्यांत मनो हि आत्मा, मनो हि ब्रह्म असें म्हणून वाणी, मन, संकल्प, चित्त, ध्यान, विज्ञान अशा एकाहून एक वरचढ शब्दांचा कीस काढण्याचा प्रयत्न केला आहे आणि त्या सर्वांत कमी-अधिकपणानें आत्म्याचें सामर्थ्य आहे असें दाखविलें आहे। तेव्हां माण्डुक्यांतील आत्मा आणि त्याचे पाद हे मनाचे द्योतक आहेत असें म्हणण्यांत कांहीं चूक होणार नाहीं. मानसशास्त्राच्या कांहीं पुस्तकांतून मनाचे सात पाद दाखवून हि फिरून मन हें अखेर एक च आहे असें दर्शविलें आहे. त्याचे सात पाद हे त्या मनाची Complexity वृद्धि दाखवीत असले तरी ते सर्व मिळून अखेर मन च समजावें असें सांगितलें असून आपल्या कडील कांहीं ग्रंथांतून हि चित्तचतुष्टय किंवा मनपंचक भिन्न न समजतां मन एक च समजावें असें म्हटलेलें आढळून येतें. परंतु प्रथमदर्शनीं तरी साधकावस्थेंत ते चतुष्पाद भिन्न च समजलेले च बरे असें समजून ते देण्यांत येतात. मनाचे श्लोक तरी साधकाकरतां च आहेत. अर्थात् त्या श्लोकाकरितां तरी भिन्न मनें मानण्यास हरकत नाहीं च. त्या मनांचे भिन्न भिन्न गुण—परस्पर विरुद्ध हि त्यांतील कांहीं—दिसून येत असून हि त्यांतील कांहीं सादृश्यावरून कोणास एक च मन मानवत असेल, तर माझा आग्रह नाहीं. *उपाधिभेदानें मनाच्या चार अवस्था उत्पन्न होतात* असें म्हणून विशिष्ट उपाधीमुळें त्यांचें भिन्नत्व मानावें लागतें असें कोणी म्हणत

असेल तर त्यांशीं माझा वाद नाहीं च. शरीराच्या उपाधीमुळें मन कमी अधिक सामर्थ्यवान् दिसतें असें हि म्हणण्यास हरकत नाहीं. शास्त्रज्ञ असें म्हणतात च. शरीराच्या उपाधींत असलेलें मन शरीराशीं संलग्न होऊन शरीराच्या स्वास्थ्यानें उत्तेजित आणि अस्वास्थ्यानें थकलेलें दिसतें, शरीराच्या बेशुद्धींत तें हि बेशुद्ध होतें असे प्रकार आढळतात. पण शरीराच्या बेशुद्धींत आणि शरीर मेल्यावर जेव्हां शरीराच्या अस्वास्थ्याच्या उलट प्रमाणानें किंवा निराळ्या च प्रमाणानें मनाला उत्साह व ताकद आलेली दिसते तेव्हां त्यास काय म्हणावें ? मोहनिद्रेंत, अंगांत आले असतां, किंवा बेशुद्धींत मनुष्याचे हातून होणारी कृत्यें शुद्धावस्थेंत होत नाहींत. मेल्यावर हि एकाद्या मित्राला–किंवा भक्ताला म्हणा– ' मी चाललो ' वगैरे निरोप पाठविलेले असल्याचीं उदाहरणें आढळून येतात. जिवंतपणीं असे प्रत्यय अगदीं च क्वचित येतात. असे हे जिवंतपणापेक्षां भिन्न असे अनुभव कित्येक लोकांस आलेले आहेत व कित्येकांनीं नमूद हि केलेले आहेत. अशा भिन्न भिन्न अवस्थेंतले भिन्न भिन्न अनुभव भिन्न मताचे तरी द्योतक असले पाहिजेत किंवा असे भिन्न भिन्न अनुभव उपाधिभेदामुळें उत्पन्न होतात असें तरी हटलें पाहिजे. तसें मानले तरी बाधकावस्थेंत भिन्न मानण्यास कांहीं च हरकत नाहीं. ज्या अर्थी उपाधि असून हि कित्येकांना उपाधिविरहित मनाचे किंवा आत्म्याचे अनुभव मिळूं शकतात त्या अर्थी अखेर कदाचित् एकच मन ही गोष्ट मानणें इष्ट होईल. तथापि प्रथमदर्शनीं तरी भिन्न मानणें अवश्य आहे च.

माण्डुक्योपनिषदांतील पहिल्या दोन अवस्थांतील आत्मपादानें दोन गुण मी जाणून बुजून गाळले आहेत ते शब्द म्हणजे सप्तांगः आणि एकोनविंशति मुखः हे. यांपैकीं ' एकोनविंशतिमुखः ' या शब्दांत चित्तचतुष्टयाचा समावेश करण्यांत येतो. अर्थात हें मनाचें वर्णन कसें असूं शकेल ? अशी शंका कांहीं वाचक घेतील. त्यांस तूर्त इतकें च सांगतों कीं मूळ श्रुतींत या शब्दांचा अर्थ सांगितलेला नाहीं. या शब्दांच्या अर्थाविषयीं भाष्यकारांत बरा च मतभेद आहे. त्यांचा निःसंदिग्ध निर्णय झालेला नाहीं. तो करण्याचें हें स्थळ नव्हे. म्हणून ती चर्चा टाळून एथें विचार केला आहे ( वे. भिडे यांचे नुकता च प्रसिद्ध झालेला उपनिषद्-रत्न प्रकाशाचा व. २ अंक २ माण्डुक्योपनिषद् उपसंहार पा. ४ पहा. ) तूर्त इतकें च म्हणूं कीं या शब्दांच्या अभावामुळें किंवा बहिःप्रज्ञ व अंतः प्रज्ञ मन

असें समजल्यानें मनाच्या श्लोकांच्या विवरणांत कांहीं अडचण किंवा हानि उत्पन्न झालेली नाहीं. यापेक्षां या शब्दांविषयीं एथें विचार करण्याचें तूर्त प्रयोजन नाहीं.

मानस शास्त्रांत दोन मनांची कल्पना रूढ व सर्वमान्य झालेली आहे. अद्याप ती सामान्य जनांत उतरलेली नाहीं. तरी ती सामान्य जनांत रूढ होईपर्यंत आक्षेपकांचे आक्षेप येणार च. शास्त्रज्ञाची ही कल्पना एथें लावण्यांत कोठें चूक झाली असेल किंवा मानस शास्त्राचे नियम समजून घेण्यांत किंवा लावण्यांत चूक झाली असेल किंवा यापेक्षा सयुक्तिक रितीनें ते लावतां येतात असें कोणी दाखवील तर त्याचा मी आभारी होईन.

मानस शास्त्र Conscious व Sub conscious जाग्रत व जाग्रतांतरित अशीं दोन मनें मानतात च. जाग्रतांतरित मनांत ultra human आणि Sub human अतिमानव आणि अपमानव किंवा पाशवी आणि दैवी, असे विभाग पडू शकतात च. त्या अर्थी पाशवी, मानवी व दैवी किंवा अपमानवी, मानवी आणि अति मानवी असे भेद करणें च योग्य. मनाची चतुर्थावस्था ही शुद्ध आत्म्याची दैवी मनाची अत्युच कोटी आहे. ती शास्त्रीय दृष्टीनें समजून घ्यावयाची आहे. त्याचा एथें विस्तार करण्याचें कारण नाहीं. श्लोकांत केलेला आहे च.

दैवी मन किंवा परमात्मन् हें ध्येय या मनाच्या श्लोकांत आहे व म्हणून त्यांना मनोबोध किंवा मनाचे श्लोक म्हणावयाचे. अपमानवी किंवा मानवी मनाचें दैवी मन करण्याच्या मार्गांतील मनोबोधातील प्रत्येक श्लोक हे स्वयंसूचना auto-Suggestions या स्वरूपाचे आहेत. यातील मुख्य मुख्य मार्गदर्शक खुणा ( mile-stones ) किंवा मुख्य मुख्य कल्पना कोणत्या त्या खालीं वृक्षशाखारूपानें दाखविल्या आहेत. सर्वांचें ध्येय एकच असले तरी मार्ग भिन्न आहेत:




+ स्वर्ग म्हणजे इन्द्रादि देवलोक किंवा मुक्ति असे दोन हि अर्थ उपनिषदांतून दिसतात. एथें उपभोग्य इन्द्रादि देवलोक असा अर्थ घेतला आहे.

⊛ विकारी व भावनात्मक मनाचे गुणः श्रद्धा, विश्वास, भावना, प्रेम, भक्ति, निष्ठा, अभ्यास, धारिष्ठ, निर्भयता, त्याग इ.

पहिला नियमः प्रभाते मनीं राम चिंतीत जावा।
पुढें वैखरी राम आधीं वदावा॥

दुसरा नियमः अखंड नामस्मरण (जपयज्ञ)

✣ दासबोधाचा मार्ग विचारी मनाचा तर मनोबोधाचा मार्ग विकारी मनाचा. आत्मनिवेदन, तत्वचिंतन (एथें जप नाहीं बोलिला)

मांडुक्योपनिषदांत मुख्यतः ॐ काराजप सांगितला आहे. तो ज्ञानयुक्त करावयाचा किंवा अर्थज्ञानावांचून करावयाचा या विषयांचा विचार तूर्त करण्याचें कारण नाहीं व त्याचें हें स्थल नव्हे. परंतु याचे फलाविषयींचें थोडें विवेचन करणें अवश्य आहे. अपमानवी किंवा मानवी मनाचें दैवीमन करावयाचें असा हेतु आहे असें म्हटलें तरी तेवढ्यानें नीट बोध होत नाहीं. मुक्ती मुक्तस्थिति वैयक्तिक दृष्ट्या किती हि चांगली असेल, पुनर्जन्माच्या फटकटींतून कायमची मुक्ति हें ध्येय हि कदाचित् उत्तमोत्तम असेल, पण दैवी मनानें ऐहिक स्थिती सुधारते किंवा कसें असा प्रश्न उत्पन्न होतो. आज असे कित्येक हरीचे लाल आहेत कीं जे या मुक्तीवांचून आमचें कांहीं अडलें नाहीं, आम्ही परलोक आणि परजन्म मानीत नाहीं, किंवा वैयक्तिक मुक्ति हें ध्येय हि आम्हाला अत्यंत संकुचित वाटतें असे प्रलाप काढतील. अशां पैकीं कांहीं थोडे लोक सदसद्विवेक बुद्धीनें हि प्रेरित असतात असें हि म्हणण्यास हरकत नाहीं. त्यांचेकरितां श्रुतींत प्रथम काय सांगितलें आहे तें पाहूं. कांहीं थोडे लोक असें हे दैवीमन प्राप्त झालें तर तेवढ्यानें च संतोष मानतील. ऐहिक अभ्युदयाची ही स्थिति निगडित असली, च पाहिजे ही गोष्ट सर्वांस पटणारी नाहीं. अशा लोकांना पुढील विवेचनाची जरूर नाहीं. ऐहिक आणि ती हि सार्वजनिक उन्नति यानें लाभूं शकेल असें कांहीं लोकांचें म्हणणें आहे. वर जो तक्ता दाखविला आहे त्यांत लोकसंग्रहाचें कार्य व स्थान दाखविलें आहे तें मनोजयाकरितां आहे आणि मनाच्या श्लोकांत समर्थांनीं तें ध्येय या दृष्टीनें दाखविलेलें नाहीं. तथापि मुक्त किंवा जीवन्मुक्त लौकिक करूं शकत नाहीं असें म्हणतां येत नाहीं. शंकराचार्यांसारखे मायावादी किंवा भगवंतांसारखे निष्काम लोक हि जर ऐहिक कर्में करूं इच्छितात व करूं शकतात—मात्र त्याला ते 'कर्म' असें म्हणत नाहींत-तर कोणी हि तीं कर्में करूं शकतील च. ही गोष्ट अत्यवश्य समजली जावी किंवा नाहीं किंवा त्याला कर्म म्हणावें कीं नाहीं हा प्रश्न अलाहिदा; असो. अशा कांहीं सदसद्विवेकबुद्धिप्रेरित लोकांकरितां खालील माहिती दिली आहे.

कांहीं वाचकांच्या लक्षांत आलें च असेल कीं 'बहिष्प्रज्ञ' 'अंतःप्रज्ञ' आणि 'सर्वज्ञ' असे आत्म्याच्या किंवा मनाच्या पहिल्या तीन पादांचे गुण सांगितले आहेत. अर्थात् 'सर्वज्ञता' हा गुण जर स्पृहणीय असेल तर त्या करितां झटणें हें प्रत्येकाचें काम आहे. knowledge is power या नियमा-

प्रमाणें 'सर्वज्ञता' आणि 'सर्वेश्वरत्व' याचें अधिष्ठान एक च असून समवाय संबंध आहे असा च याचा अर्थ एथें हि आहे. दैवी मनानें हे गुण साध्य होत असतील तर ते कोणास नको आहेत? मां० उपनिषदांत-ॐ काराच्या जपानें खालील चार गोष्टी साध्य होतात असें म्हटलें आहे.

( १ ) सर्वान् कामान् आदिश्च भवति य एवं वेद।

( २ ) उत्कर्षति ह वै ज्ञानसंततिं समानश्च भवति; न अस्य अब्रह्मवित्कुले भवति य एवं वेद।

( ३ ) इदं सर्वं मिनोति ह वै अपीतिश्च भवति य एवं वेद।

( ४ ) आत्मैव संविशति, आत्मना आत्मानं य एवं वेद

अर्थ: (१) जो याप्रमाणें जाणतो (१) तो सर्व मनोरेथ प्राप्त करून घेतो आणि श्रेष्ठ होतो

(२) जो हें जाणतो तो ज्ञानपरंपरा वाढवितो आणि सर्वांशीं समदृष्टि होतो. त्याच्या कुळांत ब्रह्मज्ञानविहीन असा कोणी होत नाहीं.

(३) जो याप्रमाणें जाणतो तो हें सर्व ( जग ) परिमाणानें जाणतो आणि सर्व त्याच्या ठिकाणीं एकरूप होतें.

(४) जो हें जाणतो तो स्वतः आत्मस्वरूपांत प्रवेश करतो ( आत्मस्वरूप होतो ) [ वैरिकरत्नप्रकाश भाषांतर ]

श्रुतींत ( उपनिषदांतील ) या कार्याचें कारण म्हणून जें दिलें आहे तें कोणास मान्य होवो वा न होवो, पण परिणाम मान्य करण्यास कोणती च हरकत नाहीं. कारणाचा ॐ या शब्दाच्या अर्थाशीं आहे. ॐ या अक्षराचें स्वरूप खिस्ती धर्मांतील त्रैमूर्ति ( ट्रिनिटि ) पैकीं 'अक्षर' ( Word ) सारखें असून वैदिक कालांत त्याचें महत्व फार होतें. भगवान् 'ॐ इत्याक्षरं परं ब्रह्म' असें म्हणतात. तें स्वरूप यौगिक दृष्टीनें पाहण्यांत अर्थ नाहीं. त्याचे जपाचे परिणाम आणि रामनामाच्या जपाचे परिणाम सारखे च आहेत. ते 'श्रेष्ठत्व, सर्वज्ञत्व, ईश्वरत्व, परमात्मत्व ( अद्वैत )' हे होत, या शब्दांत जर कोणाला ऐहिक अभिमानास्पद आणि उन्नतीचें दिसत असेल तर हा जप किंवा हें ध्यान पत्करावें. य एवं वेद या शब्दाचें 'हें जो जाणतो' असा अर्थ वर दिला आहे. परंतु तो वास्तविक 'हें जो अनुभवितो' असा अर्थ पाहिजे. यावरून आजच्या युगांत हि या मनोबोधाचें कार्य किती महत्वाचें आहे हें दिसून येईल. ज्याला या शब्दांचा केवळ पारमार्थिक अर्थ मानवेल त्यानें तसें घ्यावें.

माझ्या समजुतीनें याचा अर्थ दोन हि प्रकारानें घेतां येईल. आणि समर्थ किंवा भगवान् श्रीकृष्ण दोन हि अर्थाला धरून च सांगत आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. कारण त्यांच्या पुढें परिस्थिती च तशी होती.

मनाच्या श्लोकांचें हें विवरण सज्जनांस पसंत होवो अशी आशा आहे. संधि मिळाल्यास यांतील अभिप्रायाप्रमाणें सर्व च मनाच्या श्लोकांचा अर्थ प्रसिद्ध करण्याची इच्छा आहे.

मनाचे श्लोक दिसतात इतके सोपे नाहींत. त्यांतील कित्येक श्लोक उपनिषदांसारख्या ग्रंथांतून घेतले आहेत. मी कित्येक दिवस हे श्लोक नियमानें वाचित असे. परंतु मला ते समजेनात म्हणून नियम सोडून दिला. वेदांतशास्त्राची व मानस शास्त्राची थोडी माहिती झाल्यावर फिरून ते श्लोक गतवर्षी वाचण्याचा योग आला. तेव्हां ते समजू लागले व असें वाटूं लागलें कीं ही दिशा विद्वानांपुढें मांडावी. स. सभेच्या विद्यमानें हा हेतु आज सफल झाला म्हणून त्या सभेचे आभार मानून हें प्रकरण संपवतों.

ॐ शांतिः शांतिः शांतिः

वा. दा. तळवलकर

---

( १३६ )

॥ श्रीराम ॥

## श्रीसमर्थसंप्रदायजीर्णोद्धारादिकार्यांचा जमाखर्च वगैरे

---

१८५२ कार्तिक शु. २ ( ता. २३।१०।३० ) पासून,
पौष शु. ५ ( ता. २५।१२।३० ) पर्यंत

| जमा | खर्च |
| --- | --- |
| २०-०-० सौ. आनंदीबाई केशवराव पुराणिक, इंदुर | ११६९-०-० स्थापत्यविशारद श्री. वासुदेवराव गोगटे यांच्या खातीं नांवें |
| २०-०-० श्री. महादेव राजाराम | |

१०७-०-० माजलगांव येथील मदत

२८ नारायणरावसाहेब आडगांवकर, नारायणरावसा. मौजकर, सीतारामपंत नाबासाहेब, पांडुरंगरावसा., व दिगंबररावसा. वकीलपंचक प्रत्येकीं ७

२० चिंतामणरावसाहेब, खूपचंद मूलचंद भाटे, द्वारकादासजी, तुकाराम पांडुरंग सुजगर, प्रत्येकीं ५

१५ शंकररावसाहेब पोतदार, रघुनाथराव अष्टीकर, एकनाथराव-साहेब कारकून, शंकररावसा. पोहणेरकर, लक्ष्मण तुकाराम रुधे प्रत्येकीं ३

२ (सु.) बापु तुकाराम रुधे

२२ श्रीधरराव नमदी, विश्वनाथ विठ्ठल सुजगर, राजाराम अप्पाराव पुरबुज, त्रिंबकराव, रघुनाथराव, पंडितराव, त्रिंबकरावसा. डोंगरे, श्रीकिसन भाऊ मारवाडी, किसन-रावसा. फौजदारी, पंढरीनाथ सदाशिव मोळाटे, वामन आप्पा ज्ञानोबा सुजगर, प्रत्येकीं २

२९ दामोदर एकनाथ, हणमंतराव ब्रह्मगांवकर, नरहरि शंकर वाणी, नागनाथ सोनार, साहेबराव, नीळकंठ आप्पा, गोपाळ एकनाथ, दगडु आबाजी गडम, वीरभद्र पंढरीनाथ सुजगर, रामकृष्ण आप्पा मुढगीर, विठ्ठलदास ठाकरदास, एकनाथ सोनार, ईश्वरीप्रसाद, तुकाराम आप्पा निराळी, मूळचंद शिवलाल, लक्ष्मण कासार, डॉ. कुळकर्णी, गणपतराव, वामनराव देशपांडे, अंबादासराव, भगवानराव पिंपळादेवी-कर, रत्नेश्वरराव, निवृत्ति आप्पा गडम, रंगराव कोयाळकर, खंडेरावजी, पुरुषोत्तमरावजी, शिवरावजी, मार्तंडरावजी, केशव सदाशिवराव, प्रत्येकीं १

८८ हणमंतराव मास्तर

पैकीं फक्त २ सुरती व बाकी ११४८८ सर्व हाली. त्या ११४८८ चे सुरती ९८ ला ८२९२ कमी होतात. ते घालून बरोबर १०० केले.

१०-४-० आडगांव येथील मदत

५ बाळकृष्णराव माणिकराव जहागिरदार
२ गोविंदराव देशमुख
५ सवाईराम गजानन, नारायणराव, शंकर देवीदास, वामनराव
व रंगराव विष्णुपुरीकर, प्र. १
एकुण १२ हली, त्याचे सुरती १०८४

४-४-६ हिवरे येथील लालचंद उदाराम यांचे हली ५, त्याचे सुरती

४-४-६ भादली येथील राधाकिसन पन्नालाल यांचे हली ५, त्याचे सुरती

१२-११-० जालना शहराची अल्प भेट

५ (सु) रामचंद्रराव याडकीकर, वकील
१ घोंडोपंत देशपांडे, वकील
१ दत्तात्रयराव वकील
२ देवीदासराव वकील
१ नारायणराव वकील

एकुण ५ सु. व ९ हली. ९ हलीचे ७ ८११ सुरती.

१-०-० श्रीसमर्थकृपा

४२१-१५-६ एकूण नवीन जमा
४६३३- ९-० मागील शिल्लक

५०५७-- ८-६ एकूण जमा
१४२६--११-६ एकूण खर्च वजा

३६३१०--१२--० एकूण शिल्लक, पैकीं

२६-- ०-० धुळ्याचे पोस्टल बँकेंत
२८८६- ४- ० सत्कार्योत्तेजक सभेकडे ठेव
७१८-- ९--० चिटणीसाजवळ परती

३६३१०--१२--०

## आजपर्यंत एकंदर रोख जमा रुपये २८३१२-५-६

धुळें येथील श्री. रामेश्वरशेट यांनीं आपल्या चुलतीच्या स्मरणार्थ १। रु. २ गुंजा भार सोनें देऊन इच्छा प्रदर्शित केली कीं, श्रीसमर्थमंदिराच्या कळसाला सोन्याचा मुलामा करण्याकडे या सोन्याचा उपयोग व्हावा. तसें च दुसऱ्या एकानें आपल्या मातुःश्रीच्या हातांतील एक तोळ्याचें वेढें पाठवून वरीलप्रमाणें च इच्छा दर्शविली आहे. उभयतांच्या इच्छेप्रमाणें त्यांच्या देणगीचा विनियोग होईल. तूर्त हे दोन तोळे सोनें सोन्याच्या रूपांत जमा आहे.

धुळें
१८५२ पौष शु. ५ } शंकर श्रीकृष्ण देव

( १३७ )

# सहाव्या दौऱ्याची हकिकत

## — जांबेच्या सभोंवार —

श्री क्षेत्र जांब येथील श्रीसमर्थमंदिरासाठीं कोणाजवळ मदत मागितली आणि ती त्यानें नाकारली, असा महाराष्ट्रीय विरळा. बृहन्महाराष्ट्रांतील कोणत्या हि लहान मोठ्या गांवीं जा, मंदिरास मदत झाल्यावांचून राहणार नाहीं. तथापि जांबेपासून जितका मुलुख दूर तितका त्या ठिकाणच्या लोकांना, मदत केल्यानंतर हि जांबेची आठवण किंवा आस्था कमी असणार हें उघड आहे. श्रीसमर्थप्रेमामुळें ग्वाल्हेर किंवा जबलपूरचा गृहस्थ शें दोनशें रुपये सहज देईल, पण जांबेच्या मंदिराची व आपण केलेल्या मदतीची त्यास आठवण राहील च, असें म्हणवत नाहीं. तसें जांबेच्या भोंवतालच्या गांवांच्या लोकांचें होणार नाहीं. त्यांना श्रीरामाचें जांब गांव ऐकून व पाहून ठाऊक असतें. तेथें मोठ्या प्रमाणावर श्रीसमर्थमंदिराचें काम सुरू झालेलें आहे, ही गोष्ट त्यांच्या कानावर गेलेली आहे. जांब जवळ असल्यामुळें श्रीसमर्थमंदिर पाहण्याचे त्यांना

वारंवार योग येणार व आपण या मंदिरास मदत केली आहे याची जाणीव त्यांना असली, म्हणजे मंदिराविषयीं त्यांना साहजिक च आपलेपणा जास्त वाटणार. वेश्ट अशा विचार मनात आला कीं, जावेच्या भोंवतालचीं जितकीं गांवें घेता येतील तितकीं घ्यावीं व त्यासाठीं मधून मधून त्या भागात जात जावें.

शिवाय दुसरें एक असें वाटलें कीं, औरंगाबाद, परभणी, बीड, धाराशीव व नांदेडचा कांहीं भाग हा आपल्या महाराष्ट्रांतील च मुलुख असता केवळ भिन्न रियासतीमुळें त्याचा आपला फारसा संबंध येत नाहीं, तो तसा संबंध जुळण्याला श्रीसमर्थमंदिर हें योग्य साधन होईल. हे वरील चार पाच मराठी जिल्हे तरी कोठें एकत्र विचारानें नांदत अ हेत ? त्यांना एकत्र करण्याला श्रीसमर्थमंदिर हें उत्कृष्ट केंद्र होईल. तात्पर्य, असे अनेक अस्पष्ट विचार मनात येऊन तूर्त ता. ६।१२ पासून तों ३१।१२।३० पर्यंत जावेच्या भोंवतालचीं जितकीं गांवें घेता येतील तितकीं घ्यावीं, अशी योजना ठरवून निघालों. अनुभव बरा आला, त्या मुलखाविषयीं पूर्वीपेक्षा निराळी कल्पना झाली, पण एक तर खुद्द जावेस थोडें जास्त राहणें पडलें व एका पायास दुःख झालें म्हणून अवघीं दहा च गांवें घेऊन थोडे दिवस आधीं परतलों. पुन्हा दोन चार वेळा या भागात या कार्यासाठीं निदान पधरा पधरा दिवस काढले पाहिजेत.

हा भूभाग म्हणजे महाराष्ट्राचें हृदयस्थान होय. परवा कोणी आमच्या पूर्व आणि पश्चिम खानदेश जिल्ह्यांना महाराष्ट्रपुरुषाच्या माड्याची उपमा दिलेली माझ्या वाचण्यात आली. ती जर बरोबर असेल आणि या राष्ट्रपुरुषाचें सातारकोल्हापुर हें डोकें च पुणें हें मुख असेल, तर पैठणच्या भोंवतालचा विस्तृत प्रदेश हें त्याचें विशाल हृदय होय, यात शंका घ्हात नाहीं. या हृदयस्थानाची डोनयाला आणि सोंडाला कांहीं कल्पना आहे काय ? हृदयाच्या व्यवस्थित क्रियेवर च पुरुषाचें जीवित्व अवलंबून असतें ना ? तर मग महाराष्ट्रपुरुषाच्या हृदयाची काय अवस्था आहे, त्याचे ठोके कसे पडत आहेत, का ते मंद होत होत हृदयाची क्रिया एकदम बंद पडण्याची वेळ जवळ येत चालली आहे, तसें असेल तर तें हृदय सुदृढ व्हावें व असावें म्हणून कोणते इलाज करावे, याची विवचना राष्ट्रपुरुषानें करावयास नको काय ?

सुरवात होऊन ती तयार होण्यास सहा महिने लागतील, असें श्रीमंतांनीं कळविलें आहे. गडावर माघ व. ९ चा उत्सव करून शाडूची मूर्ति पाहण्यास आपण सर्व जण औंधास जाऊं. श्रावणापर्यंत मूर्ति तयार होईल, तर मंदिराचें हि काम अजून पुष्कळ होणें आहे, तें पूर्ण होतां होतां आश्विन कार्तिक महिना गांठला जाईल. आजमित्तीस घुमटाचें काम पुरें होऊन तिन्ही बाजूंचे घोड्यांचे थर बसविले जाऊन वरील पानें बसविण्यास सुरवात झाली आहे. एक पेटीचा, दुसरा कांमयाचा व तिसरा पुन्हां पेटीचा असे पानांवरील दगडी कामाचे तिन्ही थर बसून मग शिखराचें कामास सुरवात होईल. त्यास आणखी सरासरी महिना दीड महिना लागेल. घुमटाच्या मधल्या चावीचा दगड कार्तिक व. ११ (ता. १६।११।३०) च्या मुहूर्तावर बसविण्यांत आला. विटा च्यांगल्या मिळत नाहींत. म्हणून शिखराचें काम हि दगडी च करावें, असें ठरलें आहे. ठीक आहे, हजार दोन हजारांनीं खर्च वाढेल इतकें च, पण काम सुबक आणि टिकाऊ होईल. सभामंडपाचें जोतें पुरें झालें आहे. इतकीं कामें झालीं, बाकी होणें आहेत. योजिलेलीं सर्व कामें पूर्ण होऊन मग च मूर्तिस्थापनेचा समारंभ होणें इष्ट होय. नाहीं तरी मूर्ति तयार होण्याला च अजून सहा सात महिने अवधि आहे, तेव्हां आधीं समारंभ होतो च कसा! श्रीमंत बाळासाहेबांनीं मूर्ति तयार करविण्याचें काम मोठ्या आनंदानें स्विकारिलें आहे, तेव्हां मूर्ति मनोहर होईल, हें सांगणें नको. श्रीमंत संस्थानिक खरे, पण एके काळीं ते माझे सहाध्यायी होते. त्या नात्यानें मी त्यांना कळविलें आहे कीं, श्रीसमर्थमंदिरांत स्थापावयाची मूर्ति त्यांचे हातून घडली जात आहे; हें त्यांचें परम भाग्य होय, परमेश्वरानें त्यांचे हातास यश द्यावें आणि मूर्ति अशी सुरेख, मनोहर, वेधक घडली जावी कीं, पहाणाराचें चित्त प्रसन्न होऊन तें श्रीसमर्थचरणीं कायमचें जडावें! स्थापनेचा दिवस १८५३ च्या चैत्र शु. ९ चा योजिला होता, पण आतां तो १८५४ च्या चैत्र शु. ९ चा योजावा लागत आहे, याबद्दल महाराष्ट्रानें क्षमा करावी. १८५४ चैत्र शुद्ध ९ टळणार नाहीं, हे निश्चित समजावें. श्रीसमर्थांना जाऊन १८५४ चैत्र शुद्ध ९ स २५१ वर्षें पूर्ण होतील. २५१ वर्षांनीं श्रीसमर्थांच्या जन्मस्थानीं त्यांच्या मूर्तीची स्थापना व्हावयाची आहे.

जांबेच्या दक्षिणेस चार पांच कोसावर गोदावरीच्या उत्तरतीरीं च

गोळेगांव आहे. पन्नास साठ वर्षांमागें 'रामचंद्र' म्हणून एक स्वामी या गांवीं होऊन गेले. प्रारब्धावर त्यांचा पूर्ण भरंवसा असे. प्रारब्ध हा शब्द नेहमीं त्यांच्या तोंडीं असे. त्यांची येथें समाधि आहे व समाधिमंदिरास प्रारब्धाबाईचें देऊळ म्हणून च लोक ओळखतात. मंदिरांत स्वामींनीं केलेला ग्रंथसंग्रह आहे. तो सर्व पहावयास सवड झाली नाहीं, पण बाहेरच्या आकारावरून एका रुमालांत श्रीमत् दासबोध ग्रन्थ असावा असें वाटल्यावरून तो रुमाल पाहण्यास मागितला, त्यांत ८३ वर्षांपूर्वी लिहिलेली जुन्या दासबोधाची पोथी होती. पोथीच्या प्रत्येक पृष्ठावरील समासांत 'जुना दासबोध' नांव दिलेलें असून प्रत्येक समासाचे शेवटीं 'येकवीस समासी' नांव दिलेलें आहे. सावंगी, पुरुषोत्तमपुरी वगैरे जवळपासच्या गांवीं संशोधनास पुष्कळ वाव असल्याचें समजलें, पण सवड नव्हती, पुढें पाहूं.

गोळेगांवीं गोदावरीला डोह असल्यामुळें तेथें उतार नव्हता, म्हणून नावेच्या नाथन्यास जाऊन तेथें गोदावरी ओलांडून दक्षिणतीरास असलेल्या केसापुरी गांवीं गेलों. वडगांव, केसापुरी आणि पिंपळगांव हीं तिन्हीं गांवें मैल अर्धा मैलाच्या अंतरावर असून पूर्वी तिन्हीं गांवें मिळून एक च गांव होतें असें म्हणतात. तिन्ही गांवांना जोडणाऱ्या प्राचीन इमारतींचे अवशेष आज हि पहावयास मिळतात. त्यावरून प्राचीन वैभवाची कल्पना मनांत येऊन दुःख होतें. केशवपुरीचा अपभ्रंश केसापुरी होय. शंखचक्रगदापद्मधारी भगवान् केशवराजाची अत्यन्त सुंदर मूर्ति, पूर्वीचें भव्य मंदिर उध्वस्त पडल्यामुळें, एका लहानशा मंदिरांत येऊन बसली आहे. मूर्ति पाषाणाची असून इतकी मनोहर आहे कीं, कोणी तरी केव्हां तरी तिचा फोटो घेतला पाहिजे. जुन्या मंदिराचे खांब, नकशीचे दगड, छिन्नभिन्न झालेले नंदी वगैरे अस्ताव्यस्त होऊन पडलेले अवशिष्ट भाग मुकाट्यानें प्राचीन वैभवाची कहाणी सांगतात. केशवराजाची पूजा अर्चा श्री. बाळंभट बिन रामभट जोशी करीत असतात. केवळ भिक्षेवर मंदिराच्या सभामंडपाचें काम त्यांनीं सुरू केलें आहे. केसापुरीहून माजलगांवीं गेलों. माजलगांवचें काम उरकून परत जांबेस येतांना वाटेंत आडगांव व हिवरें हीं गावें घेतलीं. आडगांव हें जहागिरीचें गांव असून हिवरें हें श्रीसमर्थांच्या पूर्वजांचें गांव होय. तें गोदावरीच्या कांठीं दक्षिण तीरावर आहे. तेथें ठोसरांचीं अद्यापि तीन घरें नांदत आहेत.

हिवरें येथील मुंजा हें ठोसरांचें ग्रामदैवत होय. हिवऱ्याहून जांबेस जाऊन पुन्हां भादलीस आलों व परत जांबेस गेलों. जनवार्तेवर विश्वास ठेवून मोठ्या आशेनें भादलीस गेलों होतों, पण वार्तेंत कांहीं च तथ्य नव्हतें, असें आढळलें. कष्ट करणें, कंटाळा न करणें, एवढें च आपलें काम. यशापयशाचे धनी वेगळे च होत. त्याचें आपणांस सुखदुःख नसावें. जांबेस दोन दिवस राहून परततांना मार्गात जालन्यास थोडा वेळ थांबून पायाचें दुःख जाणवूं लागलें म्हणून ता. २२ ला च येथें परत आलों. अजून किती तरी गावें राहिलीं आहेत.

या दौऱ्यावर निघण्यापूर्वी च या दौऱ्याचें यश केवळ पैशानें मापावयाचें नाहीं, असें मीं ठरविलें होतें. त्याप्रमाणें या दौऱ्यात पैसे जरी थोडे मिळाले, तरी श्रीसमर्थमंदिराकडे पुष्कळांचें लक्ष वेधून घेतां आलें यांत च आनंद आहे. ठिकठिकाणीं ज्यांनीं मदत केली आणि मजला प्रेमानें वागविलें त्या सर्वांचा मी आभारी आहे.

धुळें-१८५२ पौष शु. ९

ता. क. छापखान्याचा निरोप आला कीं अर्धे पान कोरें उरतें. ठीक, दर दौऱ्यांत श्रीसमर्थांचा एकादा श्लोक, एकादा अभंग, एकादें पद मनातल्या मनांत घोकीत असतों. या दौऱ्यांत जो अभंग घोकीत होतों तो, जागा उरली म्हणून वाचकांस सादर करितों:

विद्या वैभव धन मज कृपणाचें ।
जीवन जिवाचें । आत्माराम ॥ १
मजला प्रपंचीं कोणी नाहीं सखा ।
येका रघुनायका । वांचुनीया ॥ २
आकाश अवचितें जरि हें कोसळेल ।
मज तेथें राखेल । आत्माराम ॥ ३
आपंगिलें मज श्रीरामें समर्थें ।
हा ब्रह्मांड पालथें । घालूं शके ॥ ४
वक्रदृष्टि पाहतां मरेल त्याचा घोट ।
काळाचें हि पोट । फाडूं शके ॥ ५
रामदास म्हणे मी शरणागत त्याचा ।
आधार सर्वांचा । मुक्त केला ॥ ६

( १३८ )

॥ श्रीराम ॥

# श्रीसमर्थसंप्रदायजीर्णोद्धारादिकार्याचा जमाखर्च वगैरे

१८५२ पौष शु. ६ ( ता. २६।१२।३० ) पासून
फाल्गुन शु. १३ ( ता. २।३।३१ ) पर्यंत

| जमा | | खर्च | |
|---|---|---|---|
| २०-०-० | सौ. आनंदीबाई केशवराव पुराणिक, इंदुर | १०८०-०-० | स्थापत्यविशारद श्री. वासुदेवराव गोगटे यांच्या खातीं नांवें २०० ता. २१।१।३१, ८० ता. १७।१।३१, २०० ता. ४।२।३१, ३०० ता. १७।२।३१, ३०० ता. २।३।३१ |
| ५-०-० | काशीनाथ गोपाळ पतकी, इंदुर | ५४-०-६ | प्रवासखर्च, क्वचित् सभांचा खर्च, वगैरे |
| ५-४-० | गिरगांवांतील रामचंद्र सिद्धीगल्ल्या शेवटच्या मजल्यावरील मंडळींनी श्रीसमर्थांचरणीं अर्पण केलेलें तुळशीपत्र, हस्तें केशव सीताराम टवळे | १०-१-६ | टपालखर्च, तारा, रजिस्ट्रेशन, इन्शुअरन्स, वगैरे |
| १०-०-० | G.G. Pendse, Baroda | | |
| १०-०-० | वासुदेव विनायक जोशी, बडोदें, यांचे मार्फत ५ केशव गणेश पुरोहित ५ श्रीमंत पुतळाबाईसाहेब | ११४४-१०-२ | एकूण खर्च |

१-४-० 'श्रीरामप्रीत्यर्थ' हस्तें रामचंद्र काशीनाथ शेवेकर, गुहागर

१६-०-० अनंत सखाराम वर्णीकर, अहमदाबाद

५-८-० दत्तात्रय रघुनाथ जोशी, नारायण पेठ, पुणें, यांचे रु. ५ आपणाकडे आले होते, ते व उशिराबद्दल ०८, असे ५-८ माधव नारायण भिडे यांजकडून आले

२५-०-० सौ. गंगूबाई रामेश्वर, धुळें

३६-०-० श्रीसमर्थसेवक दुर्गाराम बाळ हरिदास, मगळूर, यांचे मार्फत
१० रामकृष्ण साजबा नाईक, मु. कवठणी, नवसाबद्दल
५ गं. भा. आप्पी आक्का
२१ श्रीरामदासनवमीच्या उत्सवाचा खर्च जाऊन भिक्षेकी शिल्लक राहिले ते
१-०-० महादेव काशीनाथ पाटणकर, मु. आतकरगांव, पो. खालापुर
१-०-० श्रीसमर्थकृपाकांक्षी, मुंबई
११-०-० विष्णु गणेश गाडगीळ, मुंबई, यांचे मार्फत
४ दत्तात्रय रामराव चदावरकर
२ विष्णु गणेश गाडगीळ, २ रघुनाथ सदाशिव गोगटे
१ गोविंद त्रिंबक रानडे, १ केशव रघुनाथ पावसेकर
१-४-० दत्तात्रय विनायक ऊर्फ दादासाहेब खेर, शिवनें, संगमेश्वर

ता. ३०।१ पासून तों ता. २७।२।३१ पर्यंत दौऱ्यात बारामती, बारशी, सज्जनगड, औंध, सांगली, मिरज व कोल्हापुर या सात ठिकाणीं मिळून श्रीसमर्थमंदिराला रु. २१७१-१२-१ रोख मिळाले. त्याशिवाय सुमारें पांचशें रुपयांची आश्वासनें आहेत. त्यांत विशेषतः लातूर व डिग्रज येथील सर्व रकमा व कोल्हापुर येथील कांहीं रकमा येणें आहेत. हा जमाखर्च सादर करीपर्यंत त्या रकमा हातीं आलेल्या नाहींत. त्या येतां च त्यांचा जमाखर्च पुढें देऊं:

७८-३-९ बारामती येथें झालेली मदत
१० नरहर सदाशिव जोशी B.E.
१० महादेव विश्वेश्वर बर्वे, वकील
१० गणेश मनोहर दाते
२० नरहर राजाराम ढोले वकील, डॉ. भास्कर विष्णु आठवले, नारायण मनोहर दाते, डॉ. विष्णु विनायक परांजपे, प्रत्येकीं ५ रु.
१२ सदाशिव वासुदेव करंदीकर, कृ. ग. गणपुले, गजानन के. कानेटकर, द. वि. बापट, म. १ ...

६ हरि गणेश भावे, श्रीसमर्थकृपा, पुण्याचे गणेश विष्णु काळे, प्र. २

७ गं. ल. खाडेकर, के. न. गोखले, डॉ. का. ग. जोशी, रा. ग. धारपुरे, एम्. व्ही. फ, श. ना. नेऊरगावकर, धों. अ. देशमुख, प्र. १।

१७६६९ किरकोळ

१२१-१४-१ बार्शी येथे झालेली मदत

| | |
|---|---|
| २५ | भगवंत पढरीनाथ झुंळाखे |
| १५ | गोविंद रघुनाथ काळे |
| १५ | सिद्धेश्वर मार्तंड |
| ७ | हरवाजी तुकाराम कवठेकर |
| ७ | गणेश रामचंद्र पाने |
| १५ | गोविंद कृष्ण टिळक, भगवतराव माधवराव उमाळे, वा. प. आठल्ये प्र. ५ |
| ४ | डॉ. गणपत सुभाव कश्यपी |
| ३ | श्री. दुर्गाबाई गोगटे |
| १० | जीवराज द. शाह, द. मा. पाटे, डॉ. वा. गो. सहस्रबुद्धे, डी. जी गवसणे, भी. य. मुगुटकर, प्रत्येकी २ |
| १ | डॉ. वि. दा. दातीर, द. ह. पवार, ना. रा. देशपांडे, प्र. १ |

१७-१४-३ ता. ४।२।२१ रोजी प्रवचनाचे वेळी

२ भगवंत बाळकृष्ण वैद्य

१० मा. गो. केसकर, ग. कृ. सप्रे, ना. दा. देशमुख, गो. वा. कुळकर्णी, गं. रा. सुर्वे, पु. वा. सहस्रबुद्धे, ए. द. धर्माधिकारी, वि. द. धर्माधिकारी, सुरजकर्ण बिरदीचंद, वि. व. खिरे, प्र. १

५८१४८३ किरकोळ

१९८८-८-० सज्जनगडीं अष्टमीचे सभेंत

१०१ कुमारी श्री इंदुमती चाफळकर
( के. बाबासाहेबांची कन्या )

२० श्री. लक्ष्मीबाई दुबे, यवंत बाला पाटील पालखेड, श्रीसमर्थदासांकित, पिराजी विठ्ठल चौधरी, प्र. ५

१ गणेश दत्तात्रय इनामदार, बेडकेहाळ

४ द. ह. न्यायाधीश व श्री. भागीरथीबाई दातार, प्र. २

१७ यदु लक्ष्मण साठवडे, महादु तात्या पाटील, शंकरराव जोशी, द. र. दुबळे, रा. दा. खरे, रा.बा.घरे, श्रीसमर्थकृपा, के. कुलकर्णी, बा. गु. लिमये, वि. रा. रोडे, श्यं. ना. देशपांडे, स. ग. पाठक, ग. अ. देव, गंगुबाई कुलकर्णी, ना. व. देशद्रुाय, बा. अ. कुलकर्णी, बा. आ. अगाशे, प्र. १

५ श्री. मनोरमाबाई पाडळकर जावळी, स. म्हैसूर, हस्तें श्री. नारायणबुवा

१ शहिद मलाप्पा महमाणे मार्फत

८८ शाहीर लाडीलकरांचे बंधु

४८१० किरकोळ

२७८६ कल्याणाहून

८ विष्णु महादेव गोखले

५ अनंतराव नाफडे ५ कृ. वि. मलूटकर

८ प्र. ह. धारप, ल. म. घरे, मा. स. गोखले, दादा गोखले, प्र. २

१८४ सौ. आ. बीरकर ८२ किरकोळ

५ कृष्णाजी वि. जोशी, नेरे ता. पनवेल हस्तें दादा

२३३-८-० औंध येथें झालेली मदत

१०१ श्रीमंत बाळासाहेब पंत प्रतिनिधी

२५ श्रीमंत सौ. माईसाहेब

१० पंडित श्रीपाद दामोदर सातवळेकर

५ श्री. सोनुबाई काळे

| | |
|---|---|
| ५ | श्री. आत्याबाई |
| ५८१० | हायस्कूल शिक्षक |
| २ | प्राथमिक शिक्षक |
| १६८६ | हायस्कूलमधील विद्यार्थी |
| १८७८३ | प्राथमिक विद्यार्थी |
| १६ | गो. वि. करंदीकर, शि. गो. दर्यने, व्ही. जी. ठकार, मो. घ. मुळे, पढरीनाथ इनामदार, वामनराव दाते, फडणीस, बाळकृष्ण शेठ मारवाडी, म. २ |
| १८१० | औंधाविरया |
| १२ | वा. वि. गोखिवडेकर, रामुआण्णा किर्लोस्कर, बाळाजी जोशी ठाणेदार, अनंतबुवा गवई, बापुराव मेहेंदळे, भरमाण्णा कोल्हापूरकर, पाटोबा पाटील, बा. घों. गुर्जर, दयाराम शेट गुजर, ज.मा.मुकटे, पुसाळकर मो. क., दौलतराम मारवाडी, म. १ |
| १२८६१९ | किरकोळ |

७७२-२-९ सांगली येथें झालेली मदत

| | |
|---|---|
| १५० | श्रीमती लक्ष्मीबाईसाहेब शिरगांवकर |
| १०१ | विष्णु रामचंद्र वेलणकर |
| १०१ | सांगली ऑइल मिल, हस्तें गोपाळ नारायण उकिडवे |
| २५ | गणपतराव रामचंद्र आपटे |
| २५ | यशवंत बाळकृष्ण बापु |
| २५ | महादेव केशव आठवले, वकील |
| २५ | आबासाहेब करमरकर |
| २५ | पुरुषोत्तम नारायण गाडगीळ |
| २१ | आठवले कारभारीसाहेब |
| १५ | गणेश रघुनाथ फडके |
| १५ | रघुनाथ हणमंत कोटनीस |
| ११ | विश्वनाथ सखाराम कानिटकर |
| ११ | दत्तात्रय रामचंद्र आठवले |

| | |
|---|---|
| ११ | गोपाळ गणेश गाडगीळ |
| १० | सीताराम वामन करंदीकर, श्री. व्ही. पटवर्धन, महादेव हरि लिमये, रामचंद्र गणेश गाडगीळ, श्री. वेणुबाई सावरेकर, काशीनाथ हरि खाडिलकर, प्र.१० |
| २० | गंगाधर रघुनाथ भडभडे, बाबगोंडा भुजगोंडा पाटील वकील, श्रीनिवास रंगनाथ कुंभोजकर वकील, वामन रामचंद्र ओगले मामलेदार, राजाराम दत्तात्रय आठवले श्रीसमर्थोत्सव, कु. हेरलेकर भगिनी,प्र.५ |
| ३ | अनंत गंगाधर केळकर २ व नारायण लक्ष्मण पटवर्धन १ |

११८-३-९ ता. १७।२।३१ रोजी प्रवचनानंतर स्त्रीपुरुषा-कडून समक्षात आले ते

३८९-१२-६ मिरज येथे झालेली मदत

| | |
|---|---|
| २२५ | श्रीमंत बाळासाहेब पटवर्धन |
| ४४ | मित्रसमाजाच्यातर्फे प्रथम३९प मागाहून ५मिळून |
| २५ | हरिनारायण पन्नालाल ऊर्फ नानाशेट |
| १० | चिंतामण मोरेश्वर पर्वते |
| २० | श्रीनिवासराव नरसिंगराव देशपांडे |
| ५ | श्रीपाद गोपाळ वैद्य |
| ५ | गणेश कृष्ण मांजरेकर |
| १० | वि. सी. घोलकर, द. गो. आपटे, भा. व्य. ठाणेदार, स. वि. आण्णेगिरी, श्री. व. पेणशे, ह. भा. नरगुद, भा. द. लिमये, डॉ. धु. रि. पटवर्धन, डॉ. ना. वि. जोशी, विनायकराव अधिकारी, गोविंद म. रानडे, गोपाळ म. रानडे, बा. य. खरे, डॉ. गो. ना. दातार, दा. मो. भट, प्र. २ |
| ७ | वि. कृ सहस्रबुद्धे, एन्. डी. बनहट्टी, डॉ. गो. ग. फडके, कृ. गो. पवार, भा. मो. आडिवरे-कर, रा. सा. पोतनीस, बाळ गोखले हरिदास प्र. १ |

| | |
|---|---|
| १५४१२८६ | ता. १९।२।३१ रोजीं प्रवचनानंतर तबकांत आले ते |
| १२ | ता. २०।२।३१ रोजीं प्रवचनानंतर तबकांत आले ते |

३८७-६-१० कोल्हापुर येथील मदतीचा पहिला हप्ता

| | |
|---|---|
| १०० | श्रीमंत आबासाहेब पंत प्रतिनिधी, चीफ ऑफ विशाळगड |
| ५० | श्रीमंत राजगुरु भाऊ महाराज |
| २५ | विष्णु विनायक जोशी, वकील |
| २५ | मल्हार पोंडे ऊर्फ बळवंतराव कुळकर्णी, वकील |
| ११ | बालराजे श्रीमंत चिंतामणराव भालचंद्रराव ऊर्फ बाळासाहेब पटवर्धन, चीफ ऑफ कुरुंदवाड सिनिअर |
| ११ | डॉ. के. केळवकर |
| ११ | व्यंकटराव श्रीनिवासराव सोलापुरकर |
| १० | डॉ. बाळकृष्ण बळवंत शाळिनकर |
| १० | शिवराम बाळाजी उपळेकर |
| १० | डॉक्टर बाळकृष्ण एम्. ए. प्रिंसिपाल श्री राजाराम कॉलेज |
| १० | प्रो. नारायण सीताराम फडके |
| १० | श्री. रमाबाई साहेब पटवर्धन जमखिंडीकर, |
| ७ | डॉ. दामोदर काशीनाथ काळे |
| १० | महादाजी गणेश करमरकर, डॉ. पुरुषोत्तम विश्वनाथ गोखले, डॉ. गोपाळ अनंत ताम्हनकर, श्री. अन्नपूर्णाबाई ताम्हनकर, गणेश रंगो कुळकर्णी हळदीकर, त्रिवेणी सर्वे आणि अन्य, प्र. ५ |
| २ | डॉ. श्रीकृष्ण विठ्ठल जमेनीस |
| २ | विष्णु नारायण दातार |
| ९ | स. रा. छाटकर, द. के. पळसुले, श्रीसमर्थकृपा, आर्. एस्. कुळकर्णी, संतराम घोरपडे, दुधगांवकर कुळकर्णी वगैरे, प्र. १. |

८६८९ धाकुपुरीस मल्पराजाच्या आरतीचे ताटांत
११८१२५६ ता. २२।२।११ रोजीं आर्यसमाजोत्सवाचे वेळीं प्रवचनानंतर झोळींत आले ते
१७०५०४ ता. २३।२।११ रोजीं श्रीजगदंबेच्या मंदिरांतील श्रीरामाचे पारावरील प्रवचनानंतर पुरुषसमाजाकडून झोळींत आले ते
७८११०३ सदर प्रसंगीं स्त्रीसमाजाकडून

४६-०-० पुणें येथें, जातां व येतां, मिळालेली मदत
-५ वासुदेव वामन खाडिलकर
५ सेक्रेटरी, नूतनसमर्थविद्यालय, दाणेआळी
५ नरसो बाळकृष्ण चंद्रचूड } हस्तें वामनराव तळवलकर
५ तरडे वकील }
२५ रा. ब. चिंतामणराव वैद्य } हस्तें तात्यासाहेब करंदीकर
१ श्रीसमर्थभक्त }
५ Rev. W. S. Deming, Ph. D. सातारा
१ श्रीसमर्थकृपाकटाक्ष

२२६८-०-१ एकूण नवीन जमा
२६३०-१३-० मागील शिल्लक

४९९८-१३-१ एकूण जमा
११४४-१०-३ एकूण खर्च वजा

४८५४-२-१० एकूण शिल्लक, पैकीं
१२२६- ०- ० धुळ्याचे पोस्टल बँकेंत
२६८६- ४- ० सत्कार्योत्तेजक सभेकडे ठेव
९४१-१४-१० चिटणीसाजवळ बरती

४८५४- २-१०

शिवाय दोन तोळे सोनें

आजपर्यंत एकंदर रोख जमा रुपये ३०६८०-५-७

धुळें } शंकर श्रीकृष्ण देव
१८५२ फाल्गुन शु. ११ }

( १३९ )

# सातव्या दौऱ्याची हकिकत

## —दक्षिण महाराष्ट्र—

ता. ३१।१ व १।२।२१ बारामती, ता. २,३,४ पारशी, ५,६ लातूर, ९,१०,११ सज्जनगड, ता. १२,१३,१४ औंध, १५,१६,१७ सांगली, १८,१९,२० मिरज व ता २१ ते २४।२।२१ कोल्हापुर, असा हा अखेरीस जरा लांबचा आणि पुष्कळ दिवसांचा दौरा योजिला होता. योजिल्याप्रमाणें तो यशस्वी रीतीनें पार पडला, यांत आनंद आहे. सांगलीस जवळच्या कसबे डिग्रज गांवची मंडळी प्रवचनास येत होती. त्यांच्या म्हणण्यावरून ता. १८ रोजीं सकाळीं डिग्रज येथें हि प्रवचनास जाऊन आलों. लातूर व डिग्रज येथील सर्व मदत यावयाची आहे व कोल्हापुर येथील आश्वासनाप्रमाणें कांहीं रकमा यावयाच्या आहेत. त्या वगळून एकंदर या दौऱ्यांत श्रीसमर्थमंदिरास दोन हजारावर मदत झाली.

कोठें दोन, कोठें तीन व कोल्हापुर येथें पांच प्रवचनें झालीं ; दोन प्रिंसिपॉल डॉ. बाळकृष्ण यांच्या अध्यक्षतेखालीं सुरू असलेल्या आर्यसमाजाच्या उत्सवाचे सभास्थानीं सायंकाळीं, दोन श्रीजगदंबेच्या आवारांतील श्रीरामाच्या पवित्र पारावर रात्रींच्या शांत वेळीं हजारों लोकांपुढें व एक शेवटच्या दिवशीं शाहुपुरींतील व्यापारी मंडळींसाठीं श्रीयुत लाटकर यांच्या दिवाणखान्यांत. ठरविलेल्या पधरा बावपसंपैकीं मनांत येतील त्या कांहीं कांहीं विषयांवर प्रवचन करीत असे, चरित्र सांगत असे, अवतारकार्य सुचवीत असे, संप्रदायाचीं लक्षणें निरूपीत असे, सांप्रदायिक वाङ्मयाचें स्वरूप प्रकट करीत असे, श्रीसमर्थांचें हस्ताक्षर विवेचनपूर्वक दाखवीत असे, श्रीसमर्थ च कां सावध झाले तें सांगावें, सावध झाले त्या क्षणाचें महत्त्व वर्णावें, त्यांना विश्वाच्या कल्याणाची चिंता कशी लागली होती ती दाखवावी, सामर्थ्य आहे चळवळीचें। जो जो करील तयाचें। परंतु येथें भगवंताचें। अधिष्ठान पाहिजे ॥ हें कसें ह्याचा पाल्हाळ करवेल तितका करावा, रामोपासनेचें वैशिष्ट्य स्थापावें, संप्रदाय। समुदायाची आवश्यकता दर्शवावी, तो समुदाय कां आणि कसा करावा याची सांग शिकवण पहावी, सर्व शिकवणींचें सार शोधावें, श्रीशिवसमर्थभेटीच्या काळाचा पुरावा निष्ठुरपणें सादर करावा, इत्यादि कथाभागाचा यथावकाश विस्तार

८९८९ बाहुपुरींत मन्यराजाच्या आरतीचे तबकांत
११८१२९६ ता. २२।२।११ रोजीं आर्यसमाजोत्सवाचे वेळीं प्रवचनानंतर झोळींत आले ते
१७८५८४ ता. २३।२।११ रोजीं श्रीजगदंबेच्या मंदिरांतील श्रीरामाचे पारावरील प्रवचनानंतर पुरुषसमाजाकडून झोळींत आले ते
७८११०३ सदर प्रसंगीं स्त्रीसमाजाकडून

४६-०-० पुणें येथें, जातां व येतां, मिळालेली मदत

५ वासुदेव वामन खाशिलकर
५ सेक्रेटरी, नूतनसमर्थविद्यालय, दाणेआळी
५ नरसो बाळकृष्ण चंद्रचूड } हस्तें वामनराव तळवलकर
५ शरदे वकील
२५ रा. ब. चिंतामणराव वैद्य } हस्तें तात्यासाहेब करंदीकर
१ श्रीसमर्थभक्त

५ Rev. W. S. Deming, Ph. D. सातारा

१ श्रीसमर्थकृपाकटाक्ष

---

२३६८-०-१ एकूण नवीन जमा
३६३०-१३-० मागील शिल्लक

---

५९९८-१३-१ एकूण जमा
११४४-१०-३ एकूण खर्च वजा

---

४८५४-२-१० एकूण शिल्लक, पैकीं

१२९६- ०- ० पुण्याचे पोस्टल बँकेंत
२९८६- ४- ० सत्कार्योत्तेजक सभेकडे ठेव
५७१-१४-१० चिटणीसाजवळ वरती

---

४८५४- २-१०

शिवाय दोन तोळे सोनें

आजपर्यंत एकंदर रोख जमा रुपये ३०६८०-५-७

धुळें } शंकर श्रीकृष्ण देव
१८५९ फाल्गुन शु. ११

( १३९ )

# सातव्या दौऱ्याची हकिकत

## —दक्षिण महाराष्ट्र—

ता. ३१।१ व १।२।३१ बारामती, ता. २,३,४ बार्शी, ५,६ लातूर, ९,१०,११ सज्जनगड, ता. १२,१३,१४ औंध, १५,१६,१७ सांगली, १८,१९,२० मिरज व ता. २१ ते २४।२।३१ कोल्हापुर, असा हा अखेरीस जरा लांबचा आणि पुष्कळ दिवसांचा दौरा योजिला होता. योजिल्याप्रमाणें तो यशस्वी रीतीनें पार पडला, यांत आनंद आहे. सांगलीस जवळच्या कसबे डिग्रज गांवची मंडळी प्रवचनास येत होती. त्यांच्या म्हणण्यावरून ता. १८ रोजीं सकाळीं डिग्रज येथें हि प्रवचनास जाऊन आलों. लातूर व डिग्रज येथील सर्व मदत यावयाची आहे व कोल्हापुर येथील आश्वासनाप्रमाणें कांहीं रकमा यावयाच्या आहेत. त्या वगळून एकंदर या दौऱ्यांत श्रीसमर्थमंदिरास दोन हजारांवर मदत झाली.

फोंडे दोन, फोंडें तीन व कोल्हापुर येथें पांच प्रवचनें झालीं. दोन प्रिंसिपॉल डॉ. बाळकृष्ण यांच्या अध्यक्षतेखालीं सुरू असलेल्या आर्यसमाजाच्या उत्सवाचे सभास्थानीं सायंकाळीं, दोन श्रीजगदंबेच्या आवारांतील श्रीरामाच्या पवित्र पारावर रात्रीच्या शांत वेळीं हजारों लोकांपुढें व एक शेवटच्या दिवशीं शाहुपुरींतील व्यापारी मंडळीसाठीं श्रीयुत लाटकर यांच्या दिवाणखान्यांत. ठरविलेल्या पंधरा वारपत्रकांपैकीं मनांत येतील त्या कांहीं कांहीं विषयांवर प्रवचन करीत असे; चरित्र सांगत असे, अवतारकार्य सुचवीत असे, संप्रदायाचीं लक्षणें निरूपीत असे, सांप्रदायिक वाङ्मयाचें स्वरूप प्रकट करीत असे, श्रीसमर्थांचें हस्ताक्षर विवेचनपूर्वक दाखवीत असे; श्रीसमर्थ च कां सावध झाले तें सांगावें, सावध झाले त्या क्षणाचें महत्त्व वर्णावें, त्याना विश्वाच्या कल्याणाची चिंता कशी लागली होती ती दाखवावी, ।सामर्थ्य आहे चळवळेचें। जो जो करील तयाचें। परंतु येथें भगवताचें। अधिष्ठान पाहिजे॥ तें कसें ह्याचा पाल्हाळ करवेल तितका करावा, रामोपासनेचें वैशिष्टय स्थापावें, संप्रदायांत समुदायाची आवश्यकता दर्शवावी, तो समुदाय कां आणि कसा करावा याची सांग शिकवण द्यावी, सर्व शिकवणींचें सार शोधावें, श्रीशिवसमर्थभेटीच्या काळाचा पुरावा निष्ठुरपणें सादर करावा, इत्यादि कथाभागाचा यथावकाश विस्तार

करीत असे. प्रत्येक ठिकाणीं दुसरे दिवसापासून प्रमुख मंडळींच्या घरीं जाऊन भेटी घेत असे व ज्यांच्या कडे जाणें अशक्य होईल, त्यांनीं दुसरे दिवशीं प्रवचनाचे वेळीं जो भिक्षा घालावयाची असेल ती आणावी, अशी विनंति करीत असे. त्याप्रमाणें दिडकी दोन दिडक्या, आणा चार आणे, रुपया दहा रुपये, अशा किरकोळ रकमा प्रवचनाचे वेळीं तबकांत अगर झोळींत पडत. याप्रमाणें सांगलीस एका च प्रवचनाचे वेळीं नुसत्या तबकांत शंभराचे वर रकम मिळाली. आतांपर्यंतच्या दौऱ्यांत कोणत्या हि गांवीं एका च वेळीं एवढी भिक्षा प्रवचनाचे जागीं मिळाली नव्हती; असो. - - - - -

असा सामान्यपणें सर्व ठिकाणीं क्रम होता. प्रत्येक ठिकाणाविषयीं स्वतंत्रपणें बोलावयाचें तर कांहीं अवांतर गोष्टी सांगतां येतील.

बारामतीस सिद्धेश्वराचे देवालयांत प्रवचनें झालीं. दिनकर केशव फानेटकर, महादेव विश्वेश्वर कर्वे आणि केवळ परोपकारापुरते उरलेले नरसो भटजी यांनीं सर्व भार सोसला. बारामतीस हें मी तिसऱ्यांदा गेलों. कल्याणमहाराजांचे एक प्रमुख शिष्य रामाजी दादा यांचा मठ बारामतीस आहे, तो पाहण्यास १८४२ च्या फाल्गुनांत तेथें प्रथम गेलों होतों. त्या वेळीं मठा पलिकडे कोणाकडे गेलों नव्हतों. बरोबर आज त्यास दहा वर्षे झालीं. पण या दहा वर्षांत त्या मठांत केवढें रियलंतर घडलें! त्या पोथीची ती दशा पाहून चार चौघांत प्रत्यक्ष रडलों नाहीं, इतकें च, पण मनाला फार क्लेश झाले! कोणापुढें फिर्याद मांडूं? १८४२ त मठांत शिल्लक असलेला सर्व संग्रह पाहिला होता व त्याचें टांचण केलें होतें. त्या टांचणावरून १८४३ च्या ज्येष्ठाचे अंकांत विविध विषयांक १०३ म्हणून मठाची हकिकत दिली होती. कल्याणमहाराजांचे प्रमुख शिष्य, कल्याणांच्या पश्चात् डोमगांव मठाचे अधिपति झालेले, रामाजीदादाचे गुरुबंधु मुद्गल यांनीं १६२२ त लिहिलेली, जीर्ण झालेली पण संपूर्ण असलेली ग्रन्थराजाची प्रत मठांत होती. मठपति वृद्ध आणि अंध होते. संग्रह पहात असतां ते, मी व माझ्या संशोधनकार्यांतील सहकारी आप्पासाहेब रणदिवे, एवढे च तिथे होतों. मठपतींना त्या प्रतीची नुसती वार्ता हि नव्हती. एकंदर गळांठ्यात ती हि प्रत होती. संशोधनकार्यांत पापें जोडावें, असें माझ्या मनांत असतें तर, त्या प्रतीचा मी अपहार करूं शकलों असतों; मला तें अजून हि पाप च झालें असतें, असें वाटतें, पण त्या प्रतीची आज झालेली दुर्दशा पाहिली, म्हणजे त्या वेळीं ती मी घेतली असती तर

मला पाप च लागतें की काय, हें कोडें सोडविण्याचें काम नीतिशास्त्रवेत्त्यांचें आहे. ती सुंदर प्रत सायंत डोळे भरून पाहून अप्रं मठपतींच्या हातीं देऊन त्यांना म्हटलें, महाराज, सर्व च संग्रहाला जपा, पण या तुमच्या संग्रहांत हें एक रत्न आहे, त्यास विशेष जपा. माझ्या या विनंतीचें महत्त्व त्यांच्या मनावर बिंबावें म्हणून मी त्यांना पुन्हःपुन्हां म्हणावें, तुम्ही जपाल ना या प्रतीला, कां ती मी घेऊन जाऊं. त्यांनीं उलट काकुळतीस येऊन म्हणावें, नका, नका, आम्ही जपूं.' या गोष्टीला दहा च वर्षें झालीं. वृद्ध मठपति दिवंगत झाले होते. त्यांच्या जागीं त्यांचे कोणी दूरचे तरुण नातलग येऊन बसले होते. कानेट-करांना बरोबर घेऊन प्रतीच्या दर्शनासाठीं मठांत गेलों. तरुण मठपतीनें पेटीचें कुलुप काढलें. पावसाचें पाणी गळून संग्रह भिजला होता, त्यास कसर लागली होती व या प्रतीच्या आरंभीं, मध्यभागीं, शेवटीं कसर लागून तिची दुर्दशा झालेली पाहण्याचें नशिबीं आलें. विषयांक १०३ त दिलेला प्रतीच्या शेवटचा तो मजकूर आतां उरलेला नाहीं ! शेवटून खात खात कसर एकोणिसाव्या दशकाच्या मध्यावर आली होती ! १६२२ पासून १८४२ पर्यंत २२० वर्षें आपल्या संपूर्ण वैभवांत टिकलेली प्रत या दहा वर्षांत नष्ट व्हावी, याचा बोल कोणाला लावावा ! पुन्हां एकदा बारामतीस जाण्याचें मनांत येतें.

बारशीची काहीं विशेष हकिकत सांगावयाची नाहीं. भगवताचे देवालयांत प्रवचनें झालीं. परंड्याचे वकील विनायक रघुनाथ देशपांडे यांनीं परंड्यास येण्याविषयीं आग्रह केला, पण सवड च नव्हती. मागें एकदां परंड्यास गेलों होतों, आणखी एकदा जाणें आहे. बारशीस भाऊराव साने यांना मी शाप दिला आणि त्यांनीं तो घेतला. नाहीं तरी बारशीस तिन्हाइतानें कै. रामभाऊ साने यांच्या मुलाशिवाय दुसऱ्या कोणास शाप द्यावा !

लातूर हें एक पैठणसारखें च पुरातन ठिकाण दिसतें. तेथील लोक तर पौराणिक काळापर्यंत लातूरचा संबंध नेऊन पोंचवितात. जैमिनिअश्वमेधा-तील मयूरध्वज आणि ताम्रध्वज या दानशूर आणि पराक्रमी राजाची राजधानी जें रत्नपुर तेंच हें शहर होय, अशी दंतकथा लातुरास प्रचलित आहे रत्नपुर याचा च लातूर हा अपभ्रंश होय. इतक्या दूरच्या काळांतील अवशेष जरी आज तेथें उरले नाहींत, तरी या शहरानें गेल्या दोन अडीच हजार वर्षांतील संस्कृतीच्या साऱ्या लाटा पाहिल्या असल्या पाहिजेत असें मानण्याला भरपूर साधनें आहेत. जुनीं देवालयें,

जुन्या गढ्या, पुरातन मूर्ति आणि त्यांचीं स्थानें, शिलालेख, सर्व शहरभर विखुरलेले कोरीव, घडीव आणि सचित्र दगड याची साक्ष देत आहेत. केशवराजाचें आज जें मंदिर उभें आहे, तें च सातआठशें वर्षांचें जुनें असावें, पण अशा त्या जुन्या देवालयाला जे दगड वापरले आहेत ते, दुसऱ्या च त्याहि पेक्षां जुन्या देवालयाचे वापरले आहेत, असें सूक्ष्म निरीक्षणांतीं दिसतें. केसापुरी येथें आपण केशवराजाची मूर्ति पाहिली, तिच्या च सारखी ही हि मूर्ति आहे. सिद्धेश्वराचें देवालय आणि देवालयाच्या भोंवतालचा भाग पुरातन दिसतो. कोणी याचला आहे कां नाहीं, सांगतां येत नाहीं, पण देवालयांत मूर्तीसमोरच्या वृक्षाच्या तळाशीं एक शिला आहे तीवर लेख कोरलेला आहे. अक्षरें अस्पष्ट झाल्यामुळें आज वाचण्यास कठीण जातें, पण लिपीवरून तो लेख हजार आठशें वर्षांमागचा आहे, असें म्हणतां येतें. जवळच्या एका मळ्यांत आणखी एक मोठा शिलालेख आहे, असें तेथें कोणी बोलल्यावरून, कदाचित् तो स्पष्ट असेल असें वाटून, त्या च माणसाला घेऊन तो शिलालेख पहावयास गेलों. संतराम माळ्याचा तो मळा. संतराम माळी मागेंच कैलासवासी झाले. जमीन खणत असतां त्यांस हा दगड लागला. तो च देव समजून त्यांचीं वायकामुलें त्या दगडास प्रत्यहीं पाणी घालीत असतात. दगड उघड्यावर ठेवलेला आहे व हवा आणि पाणी यांचा परिणाम होऊन अक्षरें अगदीं च अस्पष्ट झालीं आहेत. हे दोन्ही शिलालेख वाचले गेले नसल्यास एक दोन दिवस तेथें राहून तज्ज्ञांनीं ते वाचण्याचा प्रयत्न केला पाहिजे. जुन्या गोपाळगढीचा अवशेष दिसत आहे, ती गढी केव्हां नष्ट झाली कोणास ठाऊक, तिच्या कांहीं भागावर दुसरी गढी चार पांचशें वर्षांपूर्वी उभारली गेली; ती हि आतां पडून तिच्या एका कोपऱ्यांत दप्तरीचा दवाखाना झाला आहे. एका प्राचीन सुतारांत जैनांच्या तीर्थंकाराच्या मूर्ति आहेत, त्या केव्हांच्या आहेत सांगतां येत नाहीं. असें हें प्राचीन शहर प्राचीनसंशोधकांना प्रेक्षणीय आहे, यांत संशय नाहीं. मात्र तेथील काम अजून व्हावयाचें आहे.

सज्जनगडावर दरसालप्रमाणें उत्सव झाला. श्री. आबासाहेब महाराज वयानें लहान असून हि दगदगीला कंटाळत नाहींत. दररोजचीं सारीं कामें यथापूर्व पद्धतशीर रीतीनें वेळच्या वेळीं मोठ्या उत्साहानें करीत असतात. मुख्य अधिष्ठान, शेजघर, पेठेंतील मारुतीराय, अंगलाई, आणि मागील रम्य तटाच्या जवळील मारुती या पांच ठिकाणीं दर्शनार्थ लोकांच्या सारख्या

गर्दी जात असतात. त्याशिवाय चौंडे महाराज, विनायक महाराज, श्रीसमर्थदास महाराज, नारायणबुवा, बाबाजीबुवा, निंबकबुवा वगैरे सांप्रदायिकांच्या तळावर लोकांची सारखी रीघ असते. प्रदक्षिणेच्या वाटेवर एका खोलीवर लावलेली श्रीसमर्थग्रन्थसंग्रहालयाची नुसती पाटी उत्सवांत वाचावयास मिळते, पण संग्रहालयातील प्रत्यक्ष संग्रह पहावयास मिळण्याची सोय नसते, हें जरा चमत्कारिक वाटतें. पुढील वर्षापासून तशी सोय अवश्य झाली पाहिजे. गडावर बसण्याला अत्यन्त आनंदाचें व क्वचित् कांहींसें करमणुकीचें हि स्थान म्हणजे समाधीपाशीं होय. दर्शनार्थ येणारे लोक देवाला वाहण्यासाठीं फुलें व बुक्का, देवापुढें लावण्यासाठीं कापूर व उदबत्त्या, देवाला अर्पण करण्यासाठीं खडीसाखर, पेढे, नारळ आणि देवापुढें ठेवण्यासाठीं पैसा अडका आणीत असतात. त्यासाठीं दरवाज्यापाशीं संस्थानातून एक मनुष्य बसलेला असतो. परवाच्या उत्सवात मध्यंतरीं कांहीं वेळ त्या माणसास बाहेर जावयाचें होतें म्हणून त्या वेळात तें काम मी मजकडे घेतलें होतें तो वेळ किती आनंदात गेला आणि करमणूक हि झाली. दर्शनास येणाऱ्या प्रत्येकाच्या उपयोगी पडण्याची संधी मिळाली याचा आनंद आणि करमणूक निराळी च. भाविक लोक देवापुढें हात जोडून मागणें मागत. मागणें मागणाऱ्या त्या सर्व तऱ्हा पाहून करमणूक व्हायची. आपलें मागणें देवाला ऐकू जावें व आपण केलेल्या नवसाला कोणी तरी साक्षीदार असावा म्हणून विशेष भाविक असत ते आपला मनोदय देवाला मोठ्यानें निवेदन करीत व जणू साक्षीदार म्हणून मला बजावीत 'बाबा रे, देव सर्वसाक्षी आहे, तू न बोलतां हि देवाला सर्व ऐकू येतें व तुझें म्हणत त्याला कळतें', असें मी त्यांना म्हणावें, पण त्यांनी आपला हेका सोडूं नये. दर वर्षाप्रमाणें अष्टमीला जीर्णोद्धाराची सभा झाली. पुष्कळांचीं भाषणें झालीं, अहवाल सादर झाले. जांबेस मंदिराचें काम चाललें आहे व मूर्ति तयार होण्यास अवधि आहे, तेव्हां मूर्तिस्थापनेचा समारंभ या चैत्रात न होता १८५४ च्या चैत्र शु ९ स होणार, असें जाहीर झालें. दरम्यान शक्य तर आणखी कोणी आपल्या शिरावर घेऊन खवाळें टाकें दुरुस्त करणें व उत्सवात सर्वांची व, विशेषत स्त्रियांची जी मोठी गैरसोय होते ती दूर करणें वगैरे कामें करावीं, अशी विनंति करण्यात आली. त्याप्रमाणें त्या रात्रीं च चौंडे महाराजांनी कीर्तनात सर्वांना विनंति केल्यावरून पुढील वर्षाच्या आत ती गैरसोय दूर करण्यासाठीं पांचसहाशें रुपयांची मदत जाहीर करण्यात आली. आपासाहेब-

महाराजांचे धाकटे दोघे बंधु उत्सवास आले होते, त्यामुळें सर्वांना बरें वाटलें. औंधसंस्थानचे अधिपति श्रीमंत बाळासाहेब पंत प्रतिनिधी हत्ती, घोडे, शिपाई, प्यादे, वगैरे लवाजम्यानिशीं स्वतः आले होते, त्यामुळें उत्सवाच्या शोभेंत विशेष च भर पडली होती. श्रीमंत बाळासाहेब नवमीच्या दिवशीं दुपारीं औंधास परत गेले व मी दुसरे दिवशीं श्रीसमर्थमंदिराच्या कार्यासाठीं

औंधास प्रथम च गेलों. मी पूर्वी औंध शहर पाहिलें नव्हतें. औंध शहरांत प्रवेश करतां च माझ्या निदर्शनास पहिली गोष्ट आली ती ही कीं, शहर अत्यन्त स्वच्छ आहे. दोन दिवस सर्वंच गांवांत हिंडून तो च ग्रह कायम झाला. यमाई देवीच्या प्रशस्त सभामंडपांत तिन्ही दिवस प्रवचनें झालीं. तिन्ही दिवस प्रवचनांस श्रीमंत बाळासाहेब, श्रीमंत सौ. माईसाहेब, सर्व लहान मोठे अधिकारी, विद्यार्थी, शहरांतील सुखवस्तु लोक, पुरुष, स्त्रिया वगैरे हजर असत. श्रीमंतांनी सर्व राजवाडा दाखविला. राजवाड्यात पहिली गोष्ट त्यांनीं दाखविली ती श्रीसमर्थांची तयार होत असलेली शाडूची मूर्ति होय. मूर्ति तयार होणार आहे श्रीमंतांच्या नजरेखालीं व तिचा सर्व खर्च देणार आहेत हैद्राबादचे श्री. वामनराव नाईक साहेब. परंतु ती अडचणीमुळें नाईक साहेब मूर्ति पाहण्यास या वेळीं येऊं शकले नाहींत. त्यांनीं एकवार शाडूची मूर्ति पाहून पसंत केली म्हणजे मग संगमरवरी दगडावरील काम सुरू होईल. राजवाड्यांतील देवस्थान, श्रीराममंदिर, शर्जेख्याचा दिवाणखाना, ग्रन्थसंग्रहालय वगैरे भाग पाहिले, त्या च प्रमाणें देवीच्या देवळांत दुसऱ्या मजल्यावर असलेली प्रचंड लायब्ररी, अपूर्व चित्रांचा व मूर्तींचा संग्रह वगैरे वस्तु पाहण्यांत आल्या. लायब्ररींतील कांहीं ऐतिहासिक ग्रन्थ दुर्मिळ आहेत. कै. राजवाडे यांनीं दिलेला मौल्यवान् हस्तलिखित ग्रंथसंग्रह या च लायब्ररींत दोन कपाटात ठेवला आहे. श्रीमंत बाळासाहेब चित्रकलेचे मोठे भोक्ते आहेत. तेव्हां त्यांच्या वाड्यांत आणि देवालयांत आणि लायब्ररींत सर्वत्र चित्रें च चित्रें असावींत हें योग्य च होय. त्यांचा सारा काळ आंखलेला असतो व त्या आंखणीप्रमाणें ( Time Table ) त्यांचीं सर्व कामें चालतात. सूर्याच्या नमस्कारावर त्यांचा मोठा भर आहे. ते स्वतः नियमितपणें नमस्कार घालतात इतकें च नव्हे, तर आपल्या साऱ्या रयतेस त्यांनीं बहुधा हें वळण लावलें आहे. मराठी आणि इंग्रजी शाळेंतील सर्व मुलांनीं नमस्कार घातले च पाहिजेत, अशी सक्ती आहे. विद्यार्थ्यांनीं नमस्कार घाल-

ण्याची वेळ ठरलेली आहे. त्या वेळीं मी गेलों होतों व तो गंभीर आणि शांत देखावा पाहून श्रीमंतांची धन्यता वाटली. नमस्कारामुळें एकूण एक विद्यार्थ्यांचें शरीर कसलेलें व प्रमाणशीर दिसलें. या गोष्टीचें अनुकरण सर्वत्र, झालें पाहिजे, असें मनांत आलें. गांवाबाहेरील, डोंगरावरील देवीचें मूळपीठ हि एके दिवशीं सकाळीं पाहून आलों. तें हि स्थान रम्य आणि प्रेक्षणीय आहे. श्रीमंतांचीं दोन कीर्तनें हि ऐकावयास मिळालीं. अशीं कीर्तनें मला करतां येतीं तर कीर्तनें करीत च मी सान्या महाराष्ट्रभर हिंडलों असतों. श्रीमंतांच्या या गुणाचा कधीं काळीं बृहन्महाराष्ट्रास लाभ घ्यावयास सांपडेल काय ? राजवाड्याबाहेर या गावीं आणखी एक उपयुक्त संस्था व एक गुणी गृहस्थ आहेत. विद्वद्रत्न पंडित श्रीपाद दामोदर सातवळेकर व त्यांचें भारत मुद्रणालय हीं औंधचीं भूषणें होत. बृहन्महाराष्ट्रास त्यांची ओळख आहे, गुणाची पारख आहे व वैदिक आणि पौराणिक वाङ्मयाची त्यांनीं केलेली सेवा परिचित आहे, तेथें मी जास्त काय सांगणार ? श्रीमंतांनीं व पंडितजींनीं कांहीं ग्रन्थ दिले आहेत, त्यांचा परामर्श आपण यथावकाश पुढें घेऊं.

सांगलीच्या प्रत्येक माणसाचा च मी ऋणी आहे. या दौन्यांत सर्वांत जास्त मदत सांगलीची झाली. त्याचें कारण न बोलतां हि मला आणि सांगलीच्या लोकांना ठाऊक आहे. सन १९०० पासून १९१४ पर्यंत कै. सी. डॉ. हरि श्रीकृष्ण देव हे सांगलीस चीफ मेडिकल ऑफिसर होते व त्या अवधींत ते आपल्या सौजन्यानें, दयाळुत्वानें, परोपकारबुद्धीनें रावापासून रंकापर्यंत सर्वांस सारखे प्रिय झाले होते. ते होते तोंपर्यंत डॉक्टरास ' व्हिजिट फी ' म्हणून कांहीं द्यावी लागते याचें ज्ञान सांगलीच्या लोकांस झालें नव्हतें. राजवाड्यात कोणाला कांहीं होवो किंवा एकाद्या झोपडींत कोणी आजारी पडो, वेळ अवेळ, रात्र अपरात्र न पाहतां ते सर्वांच्या सेवेस सारखे च तत्पर असत. तेव्हां त्यांच्या विषयीं सांगलीच्या जनतेस वाटणाऱ्या प्रेमादराचा एक किरण त्यांच्या भावाच्या वाट्यास येऊन तो ७७२ रुपयांच्या रूपानें प्रकट झाला. गेल्या सोळा सतरा वर्षांत सांगलींत केवढें स्थित्यंतर झालेलें पाहिलें. सर्व अंगांनीं सांगलीची सारखी भरभराट होतेशी दिसली. कृष्णाकांठच्या तपोवनांत श्रीसमर्थ आणि आनंदमूर्ति यांचीं स्मारकस्थानें होतीं च, पण नवा पूल, नूतन अनाथविद्यार्थिगृह, नवीन श्रीराममंदिर, लोकमान्यांचा पुतळा यांच्या योगें तपोवनाच्या रमणीयतेंत किती तरी भर पडली आहे. विष्णु रामचंद्र वेलणकर यांनीं उभारलेला ' श्रीगजानन वीव्हिंग मिल्स ' नावाचा कापड्या-

पातळांचा कारखाना म्हणजे विष्णुपंतांच्या यशस्वी धाडसाचें प्रत्यक्ष उदाहरण होय. निखालस असहाय स्थितींत आरंभ करून केवळ आपल्या बुद्धिमत्तेच्या व सचोटीच्या जोरावर आज लक्षावधी रुपये किंमतीचा प्रचंड कारखाना उभारून आणि चालवून विष्णुपंत दाखवीत आहेत, हें त्यांचें उदाहरण महाराष्ट्रांतील बुद्धिवान्, ज्ञानवान् आणि कर्तृत्वशील तरुणांना उद्बोधक आणि मार्गदर्शक झाल्यावांचून राहणार नाहीं. श्रीमंत आप्पासाहेब यांची भेट झाली. त्यांनीं तरी 'डॉक्टर देवाचे बंधु' म्हणून च श्रीमंत सौ. राणीसाहेबांना ओळख करून दिली. थोडें फार रामदासी वाङ्मय उभयतांच्या अवलोकनांत आलेलें आहे; नुकतें च विलायतेहून आल्यामुळें उभयतांच्या मागें कामाची गर्दी होती. सत्कार्योत्तेजक सभेचा व्याप आणि 'श्रीसमर्थमंदिर' यांचा त्यांना विसर पडणें शक्य नव्हे. सांगलीस शके १६२९ तील ग्रन्थराजाची प्रत पहावयास मिळाली, तिची हकिकत अन्यत्र सांगूं. पूर्वीं ठाऊक नसलेली सांगलीची एक नवीन गोष्ट निदर्शनास आली. किती तरी जणांच्या घरीं खासगी श्रीरामदेवतार्चनें पाहिलीं. गणपतराव फडके यांचे चिरंजीव सदाशिवराव फडके वकील व हणमंतरावजी यांचे चिरंजीव रघुनाथराव ऊर्फ बापुराव कोटनीस वकील यांनीं मजसाठीं फार श्रम घेतले.

मिरज येथें श्रम करणें यशवंतराव खरे, दामोदर मोरेश्वर भट मास्तर व सदाशिव भालचंद्र ऊर्फ 'सभा' जोशी यांच्या वांट्यास आलें होतें. प्रवचनें सरकारी नाटकगृहांत झालीं. श्रीमंत बाळासाहेब पटवर्धन पूर्ण श्रीसमर्थभक्त आहेत. श्रीरामदास आणि रामदासी ग्रन्थमालेचे व मासिकाचे ते पहिल्यापासून ग्राहक व वाचक आहेत. पहिल्या आणि तिसऱ्या प्रवचनास स्वतः श्रीमंत बाळासाहेब व दुसऱ्या प्रवचनास श्रीमंत युवराज तात्यासाहेब हजर होते. त्या दिवशीं श्रीमंत बाळासाहेबांचें स्वतःचें श्रीज्ञानेश्वरीवर अन्यत्र प्रवचन आधींपासून ठरलेलें होतें, त्यामुळें ते येऊं शकले नव्हते. वयस्थितिपरत्वें श्रीमंतांचे ठिकाणीं विरक्तपणाचीं लक्षणें जास्त दिसून येऊं लागलीं आहेत. पोथ्यापुस्तकें, पुराणें, उपनिषदें, गीता, भागवत, ज्ञानेश्वरी, दासबोध इत्यादि धार्मिक ग्रंथांच्या सहवासांत त्यांचा बराचसा काळ जातोसें दिसतें. श्रीसमर्थांचे महाराष्ट्रावर अपरंपार उपकार झालेले आहेत, त्याच्या स्मारककार्याला करावी तेवढी मदत थोडी च होणार आहे, अशी प्रस्तावना करून तूर्त अल्प मदत म्हणून श्रीमंतांनीं दोनशें पंचवीस रुपये माझ्या हवालीं केले. मला उपकार

पाटलें, मिरजेस दोन उपयुक्त सार्वजनिक संस्था पाहण्यात आल्या. एक खरेमंदिर. हें एक टुमदार स्मारक गांवच्या लोकानीं कें. इतिहाससंशोधक वासुदेवशास्त्री खरे याच्या स्मरणार्थ उभारलेलें आहे. त्या मंदिरात च मिरजविद्यार्थीसंघानें केलेला ग्रंथसंग्रह ठेवलेला आहे. पांच पन्नास विषयावरील सुमारें पांच हजार ग्रन्थांचा संग्रह झालेला आहे. त्यांचा विद्यार्थ्यांना व इतराना फार उपयोग होत आहे. दुसरी सस्था म्हणजे भानुतालिम. ही सस्था स्थापन होऊन बासष्ठ वर्षे झालीं. तेवढ्या अवधींत या संस्थेचीं अनेक स्थित्यतरें होऊन आज विला चिरस्थायी स्वरूप प्राप्त झालें आहे. कुस्ती हें या संस्थेचें पहिल्यापासून वैशिष्ट्य असून तिच्यातील विद्यार्थ्यांनीं अनेकदा ढाल जिंकून आणली आहे व बक्षिसें मिळविलीं आहेत. मिरजेस च श्रीवेणाबाईंचा मठ आहे. मठात हस्तलिखित ग्रन्थसंग्रह फार च थोडा उरला आहे. जो उरला आहे त्यांतून थोडा निवडून काढला व तो मठपतींच्या परवानगीनें बरोबर आणला आहे. त्यात काय आहे तें अन्य प्रसंगीं वाचकास सादर करूं. मठाची हल्लींची जागा वेणाबाईंची शिष्या व गिरिधरांचे गुरु बायाबाई यानीं मिळविल्याची शके १६२० तील असल सनद मठात आहे. तिची हि नकल पुढें मागें सादर करू.

कोल्हापुर हें या दौऱ्यातील शेवटचें ठिकाण होय. श्रीमन्महाराज सरकार याचा मुक्काम कोल्हापुरास नसल्यामुळें त्याची भेट होणें अशक्य झालें. राजाराम कॉलेजचे प्रिंसिपॉल डॉ. बाळकृष्ण याच्या अध्यक्षतेखालीं आर्यसमाजाचा उत्सव चालू होता. त्या जागीं ता. २१ व ता. २२ रोजीं सायकाळीं सात वाजता व ता. २२ आणि ता. २३ रोजीं रात्रीं नऊ वाजतां श्रीरामाचे पारावर प्रवचनें झालीं. पहिल्या च प्रवचनाचे शेवटीं डॉ. बाळकृष्ण यानीं माझ्या मतांचा पुरस्कार करून स्पष्टपणें प्रतिपादिलें कीं, श्रीसमर्थांनीं सान्या देशभर जें हजारों शिष्यांचें जाळें पसरविलें होतें त्याचा श्रीशिवाजीमहाराजाना राज्यस्थापनेच्या कामीं अवश्य उपयोग झाला असला पाहिजे, आग्र्याहून निसटून सुखरूप स्वदेशीं परत येताना त्याना या शिष्याची मदत झाली असावी, ही गोष्ट समजते, श्रीशिवाजी महाराजाना राज्यस्थापनेच्या कामीं श्रीसमर्थांची मदत झाली असली पाहिजे, ही गोष्ट नाकारणें शक्य नव्हे, किंबहुना, तशा मदतीवांचून कदाचित् राज्य स्थापलें च गेलें नसतें. मात्र त्या उभयतांची प्रथम भेट केव्हा झाली, हा प्रश्न अजून अनिर्णीत आहे, असें धरून चालावें, असें डॉ. बाळकृष्ण यानें मत दिसलें. डॉ. बाळकृष्ण हे इतिहासज्ञ आहेत,

आज येथे वर्षे ते श्रीशिवचरित्र लिहिण्यांत गुंतले आहेत, शिवाय महाराष्ट्राला ते तिऱ्हाईत आहेत, तेव्हां अशा अभ्यासकाचे मत विशेष आदरणीय होय, यांत शंका नाहीं. श्रीयुत वासुदेव दत्तात्रय तोफखाने म्हणून एक निष्ठा-वंत समाजसेवक कोल्हापुरास असतात. चार मित्रांच्या सहाय्याने त्यांनी एक नमुनेदार विद्यापीठ खोलविले आहे. मांजी महाराजांची त्यांच्यावर फार कृपा असे; त्यांची महत्त्वाकांक्षा फार दांडगी आहे. भोजी महाराजांनी शहराबाहेर माळावर पांच पन्नास एकर जमीन त्यांना दिलेली आहे. त्या जागीं त्यांनी एक तपोवन स्थापिलें असून त्यांचे विद्यार्थी त्या तपोवनांत राहतात. कोल्हापुरास माझ्या कार्यांत मला त्यांचे आणि मल्हार धोंडो ऊर्फ बळवंतराय कुळकर्णी शिरढोणकर वकील यांचे फार सहाय्य झालें. सांगलीचे बाबुराव फाटनीस मुद्दाम एक दिवस मिरजेस आणि पुन्हां कोल्हापुरास आले होते.

दौऱ्यांत ठिकठिकाणीं मी पुष्कळांना त्रास दिला. आणखी असा त्रास किती दिवस आणि कोण कोणाला द्यावा लागणार आहे, कळत नाहीं. काय करावें ?

धुळें–१८५२ फाल्गुन व. ६

---

( १४० )

॥ श्रीराम ॥

## श्रीसमर्थसंप्रदायजीर्णोद्धारादिकार्याचा

### जमाखर्च वगैरे

१८५२ फाल्गुन शु. १४ ( ३-३-३१ ) पासून

१८५३ वैशाख शु. १२ ( २९-४-३१ ) पर्यंत

| जमा | | खर्च | |
|---|---|---|---|
| २०-०-० | सौ. आनंदीबाई केशवराव पुराणिक, इंदुर | ११६५-८-० | स्थापत्यविशारद श्री. वासुदेवराव गोगटे यांच्या खातीं नांवें |
| २५-६-६ | डॉ. एम्. एस्. काळे, जालना | ४०० | ता. २७।३।३१ |
| १६-०-० | एस्. डी. गोसावी, मुंबई | १७० | ता. १०।४।३१ |
| २६-६-० | दासानुदास वासुदेव रामचंद्र | | |

दवळे, चापळ, इर्ळी — १२५ ता. १७।४।३१
रहिमतपुर — २०० ता. २४।४।३१
१७-०-० शाहुपुरी व्यापारी मंडळी, करवीर, तर्फे कालोबा लाटकर, कोल्हापुर — २७०-८ ता. २८।४।३१
५५४-० प्रवासखर्च अनेकांचा मिळून
१५-०-० बिमजे येथील मदत — १५-०-० छापणावळ
१० विष्णु वामन आपटे — १२-०-६ टपालखर्च, रजिस्ट्रेशन, इन्शुअरन्स, वगैरे
५ शिवाजी जयराम लोटलीकर — १२४७-१३-९ एकूण खर्च

२-८-० ' मातृस्मरणार्थ ' इस्तें बाबुराव व शामराव नगरे, मुंबई
४७-८-० अनंत सखाराम वणीकर, अहमदाबाद
१० फेब्रुवारी
१० मार्च
२७॥८ इतर
१२-१४-० के. दा. पुराणीक, इंदुर मार्फत
७॥२ श्रीमती चंद्रभागाबाई मुजुमदार
५ श्री. अन्नपूर्णाबाई राजूरकर
१ म्हो. आ. बर्वे. यात ४४ मजा जाता
१८- ६-० बारामतीजवळच्या माळेग्रात कॉलनी तर्फे डी. पी. वागरे
५- ०-० मोरेश्वर दत्तात्रय क्षीरसागर, आडरकवडा, संकल्पित पंधरापैकीं पहिला हप्ता
२५- ०-० विश्वनाथ गोपाळ गोखले अ. इंजिनिअर, डे. जिमखाना, पुणें
२४- ०-० श्री. अमृताई राजवाडे, ठाणें
१- ४-० ' अक्षय्यमुपतिष्ठतु ', इस्तें ना. पां. नगरे, मुंबई

ता. ४।४ पासून तों ता. २५-४-३१ दोन्यांत वडगांव, तळेगांव, सातारें, उंबरज, मसूर, शिराळें, इसलामपुर, वाळवें, फलटण वगैरे ठिकाणीं मिळून श्रीसमर्थमंदिराला रु. ७१५-२-३ रोख मिळाले. फलटण येथील काम पुरें झालें नव्हतें व सातारा येथील काम अजून पुष्कळ राहिलें आहे.

१०·८ वडगांव येथील मदत

२ विनायक गणेश फणसळकर

२ केशव बापुजी गोखले

६ वा. पां. बवरे, पु. शि. मणगे, वा. रा. नांदे, पु. ए. पाध्ये, म. चिं. संत, मो. गो. बवरे, प्र. १

०·८ किरकोळ

६४·८ तळेगांव दाभाडे येथील मदत

५ श्रीसमर्थकृपा

१ पु. वा. परांजपे

०·४ किरकोळ

५८·४ नवीन समर्थ विद्यालयामार्फत

१२४ सातारा येथील मदतीचा पहिला हप्ता

२५ D. B. Cooper

२० रामभाऊ सोमण

१५ गोविंद रामचंद्र मर्तेक

१० वासुदेव केशव मंत्री

१० वासुदेव गणेश चिरमुले

१० पांडुरंग विष्णु चितळे, डॉ. मो. ना. अगाशे, आण्णासाहेब फान्हेरे, तात्यासाहेब जोशी, पांडुरंग दत्तात्रय पिंगळे, सरदार विष्णु नारायण मुतालिक, प्र. ५

६ रामचंद्र र. पंडितराव व काकाराव जोगळेकर, प्र. ३

२ लक्ष्मण सखाराम पोतनीस

६ आण्णासाहेब वैद्य, T. M. Shah, शि. ब. आठवले, न. गं. जोशी, ल. मो. आपटे, न. भि. जोशी, प्र. १

१३ उंबरज येथील मदत

११ भालचंद्र महादेव अगाशे

१ गोपाळ जीवाजी पुजारी

१ श्रीमारुतीचा मठ, हस्ते सीतारामबुवा

९३-१४ मसूर येथील मदत

५० लक्ष्मणराव घोसपुरकर वैद्य यांनीं पूर्वी च जमविलेले
११ श्रीमारुतीमठ, ब्रह्मपुरी, मसूर, हस्तें श्री. नारायण महाराज
५ सखाराम विश्वनाथ आफळे, शिक्षक, भोयाची वाडी
२ रघुनाथ विष्णु लिमये
२ शंकर बळवंत जगदळे पाटील
१६ गोपाळ गणेश आफळे, केशव सखाराम आफळे, विष्णु गोविंद आफळे, ग. ना. शेजवलकर, महिपत शानोबा शिंपी, वा. ना. काटदरे, ल. शा. आफळे, डॉ. कृ. वि. फाटक, श्री. गो. आफळे, कुमारी शकुंतला वैद्य, वि. थॉ. शेट्ये, वा. शि. जोशी, भा. र. पुरोहित, हेड मिस्ट्रेस शेजवलकर, श. वि. आफळे, श्री. काशीबाई तिवळकर, प्रत्येकीं १ रु.
७-१४ पोष्टमन, गुरव, सोनार, ब्राह्मण, पाटील, तेली, शिंपी, वगैरे मंडळीकडून किरकोळीनें

१-१-० शहापुर येथील श्रीमारुतीमठातर्फे रामभाऊ कुळकर्णी, रोख रुपया व एक सुपारी

५ चाफळ संस्थानचे कारभारी लक्ष्मण गंगाधर प्रधान

५ कऱ्हाड येथील बालकृष्ण व्यंकटेश देशपांडे

१ कासेगांव येथील बळवंतरावांच्या मातुःश्री

६६-०-३ शिराळें येथील मदत

१२ तरुण मित्रमंडळ, शिराळें
२ व्यंकटेश केशव हसमनीस
२ भास्कर सीताराम हर्षे
३७ वा. वि. जोशी, रा. ग देसाई, रा. सी. दडगे, वा. वा. हसमनीस, र. ना. कुळकर्णी, द. मा. देशपांडे, ना. द. हर्षे, अंबुताई किवळकर, वि. ग. नवागुळ, कृ. गो. गोरेवाळकर, श. र. राजोपाध्ये, अ. आ. हसमनीस, स. रा. चव्हाण, सी. का. नरसिंपुरकर, र. द. कुळकर्णी,

रा. ग. हातकलंगडेकर, वि. पां. आपटे, के. ह. घुणे-कर, व्यं. वि. दुप्तमनीस, मा. गो. पेठे, रा. गो. चिट-णीस, ग. र. दुप्तमनीस, म. रा. अनगळ, का. शि. दुप्तमनीस, अ. र. जोशी, अ. गो. जोशी, शं. ह. कुळकर्णी, शंकर दीक्षित श्रोत्रीय, बा. शं. नवांगुळ, रा. स. फणशे, ना. व. दुप्तमनीस, शी. द. जोशी, के. वि. कुळकर्णी, प. पां. कुळकर्णी, रा. पां. वझे वैद्य, रा.बा. नरसिंहपुरकर, ली. वा. भंडारी, प्रत्येकीं १ रुपया.

१३-०-३ किरकोळ

१०३-४-० इस्लामपुर येथील मदत

३५ नारायण गणेश पाटणकर, वकील

१० विनायकराव बादवराव ऊर्फ बाळासाहेब हातकलंगडेकर

१० महादेव लक्ष्मण रानडे, वकील

२० डॉ. भाऊसाहेब वैद्य, आबाराव देशपांडे वकील, त्रिंबक विठ्ठल डोंबरे, वकील, सदाशिव विठ्ठल दळवी, वकील प्र. ५

४ रामचंद्र केशव हुणमसागर

९ वासुदेवराव दामोदर मुंडले, गोविंदराव रानडे वकील, रघुनाथ दत्तात्रय देशपांडे वकील, प्र. ३

१४ पां. वि. खांडेकर, गो. का. कुळकर्णी खांगावकर, शं. वा. चाळिसे, गो. रा. नानर, ह. ज. जावडेकर, म. मुंबळीकराव, प्र. २

९ ना. रा. तांबवेकर भी. मो. दीक्षित, के. वि. गोडे, ल. आ. फलटणे, द. दा. तळपलकर, कृ. ह. चिटणीस, राममाऊ शेंडे, र. म. वैद्य, बा. त्रिं. देशपांडे, प्र. १

२-४-० किरकोळ

३१-८-० वाळवें येथें झालेली मदत

५ वासुदेव श्रीपाद देशपांडे

५ गोपाळ नरहर सप्रे (हडीकर)

४ नारायण अनंत कुळकर्णी, विष्णु रामचंद्र देशपांडे, नानासाहेब देशपांडे व सदाशिव वामन देशपांडे, प्र. २

१७ बापु कृष्णा ओतारी, दे. वा. देशपांडे, शं. व. पंचपोर, वा. वा. देशपांडे, श्र. भि. देशपांडे, ल.न. व्यास व गं.कृ. ग्रामोपाध्ये मिळून एक, के.वा. डेवोर, रा.रा. देशपांडे, गो. गो. देशपांडे, वि.वा. देशपांडे, ह. वि. परोळकर, रामाच्या मठातर्फे रामचंद्र बळवंत रामदासी, वि.र. फडनीस, गो. ना. कुळकर्णी, वा. आ. देशपांडे, रा. ग. देशिंगकर वैद्य, दादा नाया भोसले पाटील, प्रत्येकी १

२-८-० किरकोळीने

१९०-८-० फलटण येथील मदतीचा पहिला हप्ता

१०० श्रीमंत मालोजीराव मुधोजीराव ऊर्फ नानासाहेब नाईक निंबाळकर

९०-८-० नगरवासी मंडळी

टीप—फलटण येथें वर्गणी जमविण्याचें काम चालू च होतें. तेथून निघेपर्यंत हातीं आलेल्या रकमेची पोंच दिली आहे. बाकीची पोंच व सर्वांचीं नावें मागाहून देऊं.

१-०-० श्रीसमर्थकृपाकटाक्ष

९६९-११-० ३ एकूण नवीन जमा
४८५४- २-१० मागील शिल्लक

५८२३-१४-१ एकूण जमा
१२४७-१२-६ एकूण खर्च वजा

४५७६- १ ७ एकूण शिल्लक, पैकीं

८२६-०-० धुळ्याचे पोस्टल बँकेंत
२५७१-४-० सत्कार्योत्तेजक सभेकडे ठेव
११७८-१३-७ चिटणीसाजवळ परती

४५७६-१-७

शिवाय दोन तोळे सोनें

आजपर्यंत एकंदर रोख जमा रुपये ११६५०-७-१०

धुळें
१८५३ चैत्र शु. १२ } शंकर श्रीकृष्ण देव

## ( १४१ )

# आठव्या दौऱ्याची हकिकत

## —सातारा जिल्हा—

ता. ३ एप्रिल १९३१ ला निघालों तों ता. २७ एप्रिल रोजीं परत आलों. या दौऱ्यांतील मुक्कामाचीं गावें आणि तारखा येणें प्रमाणें :—

| ता. | गाव | ता. | गाव |
|---|---|---|---|
| ४,५ | वडगाव व तळेगाव दाभाडे | १५ | पाटण |
| ६ | मार्गांत पुणें | १६ | कऱ्हाडवरून कासेगांव |
| ७ ९ | सातारा | १७ | शिराळें |
| १० | सज्जनगड | १८ | इस्लामपुर |
| ११ | उंबरज | १९ | बोरगांव |
| १२ | मसूर, रहिमतपुर | २०,२१ | वाळवें |
| १३ | चाफळ | २२ | मार्गांत किर्लोस्करवाडी |
| १४ | धायटी | २३ २५ | फलटण |

तळेगांवीं नवीन समर्थविद्यालयांत ता. ५ रोजीं श्रीसमर्थवाङ्मयपरिषद् होती. तिला येण्याविषयीं विद्यालयाच्या प्रमुखांकडून आमंत्रण आलें होतें. त्यांना कळविलें कीं, श्रीक्षेत्र जांब येथील श्रीसमर्थमंदिरास हल्लीं दरमहा जो खर्च येत आहे तो भागविण्यापलिकडे मला तूर्त कांहीं सुचत नसल्यामुळें तळेगांवीं मंदिरासाठीं शें पाऊणशेंची मदत होणें शक्य असेल तर च आपण येऊं शकूं व त्यांनीं हि उलट कळविलें कीं, आपणांस हि त्या कार्याचा अभिमान आहे च, तरी परिषदेस जरूर यावें. त्याप्रमाणें एक दिवस आधीं च गेलों. प्रमुखाच्या बरोबर गावांत आणि शेजारच्या वडगांवीं गेलों आणि त्यांनीं ७५ ची मदत पुरी करून दिली. समर्थविद्यालयाचे प्रमुख च ते, त्यांना श्रीसमर्थमंदिराच्या कार्यांची इतकी आस्था वाटावी, हें योग्य च होय, पण मला त्याचे हे उपकार वाटले. परिषदेचें कार्य थाटांत झालें. श्रीसमर्थप्रताप हा ग्रन्थ परिषदेपुढें चर्चेला होता. येथून निघण्यापूर्वीं प्रतापातील नवीन माहिती, प्रत्यंतर माहिती व शंकास्थानें अशीं तीन टांचणें लिहून तीं बरोबर घेतलीं होतीं. जेवढा अवधि होता तेवढ्यात घाईघाईनें ठळक गोष्टींची चर्चा झाली. केसरीकार तात्यासाहेब करंदीकर, प्रोफेसर दत्तोपंत पोतदार, राष्ट्रीय

प्रचारक आप्पासाहेब आळतेकर, बोरगावचे श्रीसमर्थमूर्तिसंस्थापक केशव महाराज ऊर्फ श्रीसमर्थदास, मनोबोधाचे विवेचक वामनराव तळवलकर, राष्ट्रकार्यार्थ सर्वसंगपरित्याग केलेले भाईसाहेब कोतवाल, विद्यावाचस्पति भिडे शास्त्री इत्यादि विद्वानांनीं चर्चेत प्रमुखपणें भाग घेतला होता. पुष्कळ शंकांचें निराकरण झालें, तथापि कांहीं कायम च राहिल्या. श्रीसमर्थप्रतापाची दुसरी आवृत्ति काढावयाची आहे, तत्पूर्वी ही सर्व शंकास्थानें मासिकांत प्रसिद्ध करावीं असें ठरलें. तीं नवीन वर्षाच्या पुढील अंकांत देऊं. परिषदेची पुढील बैठक नागपुरास भरावी, म्हणून नागपुरातर्फे आमंत्रण करण्यास प्रतिनिधी आले होते, पण प्रतिवर्षी असली परिषद् भरविणें हें विद्यालयाचें एक कायमचें च अंग असल्यामुळें त्यांत खंड पडूं न देतां नागपुरकरांनीं जरूर निराळी परिषद् भरवावी, व परिषदेबरोबर प्रदर्शन हि भरवावें, अशी सूचना करण्यांत आली. श्री. तळवलकरांनीं आपला तारक मंत्र निबंध सादर केला. 'चाफळ येथील श्रीराममूर्तिसंस्थापनेपर्यंतचें श्रीसमर्थचरित्र' हा चर्चाविषय पुढील वर्षासाठीं सर्वानुमतें निश्चित करण्यात आला. परिषदेच्या चालकांना माझी एक सूचना आहे. परिषद् एका च दिवसांत उरकावयाची असल्यास परिषदेची बैठक सकाळीं दोन तास आणि तिसरा प्रहरीं तीन तास होत जावी. नेमलेल्या विषयाचा अभ्यास दरसाल पांच पंचवीस जण तरी करीत जातील, अशी खटपट करण्यांत यावी. दरवर्षी कोणा तरी थोर गृहस्थाची अध्यक्ष म्हणून व अभ्यासकांपैकीं कोणा एकाची प्रमुख वक्ता म्हणून अगाऊ योजना करण्यांत यावी. सकाळच्या बैठकींत अध्यक्ष व प्रमुख वक्ता यांचीं भाषणें व्हावींत व दुपारच्या बैठकींत दोन तास चर्चा व एक तास अवांतर काम होऊन परिषद् खलास व्हावी. पुढील वर्षासाठीं नेमलेल्या विषयांत माझ्या मतें कोणकोणते महत्त्वाचे मुद्दे येतात व त्यांच्या निर्णयासाठीं कोणते सदर्भग्रन्थ अभ्यासिले पाहिजेत, त्याचें एक टाचण सवडीनें एकाद्या अंकांत देण्याचा विचार मनांत येतो.

सातान्यास रा. ब. काळे व श्री. दादासाहेब करंदीकर नसल्यामुळें फार च थोडें काम करतां आलें. तथापि जें थोडें झालें तें श्री. भाऊसाहेब सोमण यांच्या शब्दानें व श्री. दामु अण्णा फडणीस व माधवराव देशपांडे यांच्या मेहनतीनें झालें. तें करून एक दिवस आणि एक रात्र सज्जनगडीं क्रमिली. गडावर असलेल्या श्रीसमर्थग्रन्थसग्रहालयाची व्यवस्था लावण्यांत

आली. मढोबा पुजारी हे एक सार्वजनिक गृहस्थ गडावर असतात. संग्रहालयाची व्यवस्था त्यांच्याकडे सोंपविण्यात आली आहे. त्यांची जी मला माहिती आहे, त्यावरून ते संग्रहालयाची काळजीपूर्वक व्यवस्था ठेवतील, अशी खात्री वाटते. गडावर नेहमीं व उत्सवांत श्रीसमर्थांच्या दर्शनास जाणाऱ्या सद्गृहस्थांनी संग्रहालयाचा जरूर उपयोग करावा. उंबरज व मसूर येथें मारुतीपाशीं एक एक रात्र राहून उंबरजेस श्री. व ल रामदासी यांच्या मदतीनें व मसूरास श्री. घोसपुरकर वैद्य, आफळे मंडळी व जगदळे पाटील यांच्या खटपटीनें मदत मिळवून व नजीकच्या शहापुरच्या मारुतीचें दर्शन घेऊन येऊन चाफळास रामापाशीं गेलों. चाफळखोऱ्याला श्रीसमर्थांचे वेळीं कर्यात नाणेघोळ म्हणत. त्या नाणेघोळचे त्या वेळीं बाबर हे देशमुख होते. बाबर देशमुखाचे त्या वेळचे मुख्य पुरुष परानजी किंवा पराजी म्हणजे च प्राणजी देशमुख हे होते. शके १५७१ च्या सुमारास श्रीसमर्थांनीं चाफळास श्रीरामाची स्थापना केली, त्या समयीं ज्या पांच जणांकडून श्रीरामाच्या पृष्ठावर हात ठेऊन घेऊन, या अधिष्ठानाची उपेक्षा करणार नाहीं, भक्तिपरंपरा चालवूं म्हणून शपथक्रिया करविली होती, त्यांत प्राणजी बाबर देशमुख हे एक होते. सांप्रदायिक विविध विषय, तृतीय खंड, यांतील ९९ व्या विषयांतरांत खराडे विरुद्ध कालभार यांच्या भांडणांत श्रीशिवछत्रपतींनीं शके १५९७ त जो निवाडा दिला आहे, त्या निवाड्याचे वेळीं धर्मसभेंत प्राणजी देशमुख हजर होते. अशा या बाबर देशमुख घराण्यांतील जुनीं कागदपत्रें महत्वाचीं असलीं पाहिजेत, हें उघड आहे. तीं कांहीं मिळालीं आहेत, पण पुष्कळ मिळवावयाचीं राहिलीं आहेत. चाफळखोऱ्यांत चाफळपासून दोन अडीच कोसावर धायटी म्हणून एक खेडें आहे. त्या धायटीस बाबर देशमुखाचीं सात आठ घरें आहेत, असें ऐकण्यांत असल्यामुळें कागदपत्रांच्या आशेनें धायटीस गेलों होतों, पण कांहीं प्राप्ति झाली नाहीं. कांहीं प्राप्ति झाली नाहीं, म्हणजे कागदपत्राची प्राप्ति झाली नाहीं, इतका च अर्थ, बाकी श्रीसमर्थांनीं अनेकदा रात्रीं अपरात्रीं पायाखालीं तुडविलेल्या त्या रम्य प्रदेशाचें दर्शन झालें, हा कांहीं लहानसहान फायदा नव्हे. वाचक मला हसणार नाहींत तर लहानांतला लहान मानलेला एक फायदा झाला तो सांगतों. श्रीसमर्थप्रतापांतील एक सोपा पण प्रचारांत नसलेला शब्द गाडीवाल्याच्या तोंडून ऐकावयास मिळाला. या डोंगरांत वाघ आहेत काय म्हणून गाडीवानास विचारलें असतां तो म्हणाला ' राहाता नाहीं, क्वचित् येतो ', आणि श्रीसमर्थप्रतापांतील ती ओवी मला आठवली :

आली. बंडोबा पुजारी हे एक आश्चर्यकारक गृहस्थ गडावर असतात. संग्रहालयाची व्यवस्था त्यांच्याकडे सोपविण्यांत आली आहे. त्यांची जी मला माहिती आहे, त्यावरून ते संग्रहालयाची काळजीपूर्वक व्यवस्था ठेवतील, अशी खात्री वाटते. गडावर नेहमीं व उत्सवांत श्रीसमर्थांच्या दर्शनास जाणाऱ्या सद्गृहस्थांनीं संग्रहालयाचा जरूर उपयोग करावा. उंबरज व मसूर येथें मारुतीपाशीं एक एक रात्र राहून जेव्हेज श्री. बाळु रामदासी यांच्या मदतीनें व मयूरास श्री. घोरपुरकर वैद्य, आफळे मंडळी व जगदळे पाटील यांच्या खटपटीनें मदत मिळवून व नजीकच्या शहापुरच्या मारुतीचें दर्शन घेऊन घेऊन चाफळास रामापाशीं गेलों. चाफळखोऱ्याला श्रीसमर्थांचे वेळीं कर्यात नाणेघोळ म्हणत. त्या नाणेघोळचे त्या वेळीं बाबर हे देशमुख होते. बाबर देशमुखांचे त्या वेळचे मुख्य पुरुष परानजी किंवा परांजी म्हणजे च प्राणजी देशमुख हे होते. शके १५७१ च्या सुमारास श्रीसमर्थांनीं चाफळास श्रीरामाची स्थापना केली, त्या समयीं ज्या पांच जणांकडून श्रीरामाच्या पुढ्यावर हात ठेऊन घेऊन, या अधिष्ठानाची उपेक्षा करणार नाहीं, भक्तिपरंपरा चालवू म्हणून शपथ क्रिया करविली होती, त्यांत प्राणजी बाबर देशमुख हे एक होते. सांप्रदायिक विविध विषय, तृतीय खंड, यांतील ९१ व्या विषयांकांत खराडे विरुद्ध काळभार यांच्या भांडणात श्रीशिवछत्रपतींनीं शके १५९७ त जो निवाडा दिला आहे, त्या निवाड्याचे वेळीं धर्मसभेंत प्राणजी देशमुख हजर होते. अशा या बाबर देशमुख घराण्यांतील जुनीं कागदपत्रें महत्वाचीं असलीं पाहिजेत, हें उघड आहे. तीं कांहीं मिळालीं आहेत, पण पुष्कळ मिळावयाचीं राहिलीं आहेत. चाफळखोऱ्यांत चाफळपासून दोन अडीच कोसांवर घायटी म्हणून एक खेडें आहे. त्या घायटीस बाबर देशमुखांचीं सात आठ घरें आहेत, असें ऐकण्यांत असल्यामुळें कागदपत्रांच्या आशेनें घायटीस गेलों होतों, पण कांहीं प्राप्ति झाली नाहीं. कांहीं प्राप्ति झाली नाहीं, म्हणजे कागदपत्रांची प्राप्ति झाली नाहीं, इतका च अर्थ, बाकी श्रीसमर्थांनीं अनेकदां रात्रीं अपरात्रीं पायाखालीं तुडविलेल्या त्या रम्य प्रदेशाचें दर्शन झालें, हा कांहीं लहानसहान फायदा नाहे. वाचक मला हंसणार नाहींत तर लहानांतला लहान आणखी एक फायदा झाला तो सांगतों. श्रीसमर्थप्रतापांतील एक सोपा पण प्रचारांत नसलेला शब्द गाडीवाल्याच्या तोंडून ऐकावयास मिळाला. या डोंगरांत वाघ आहेत कीं? म्हणून गाडीवानास विचारलें असतां तो म्हणाला ' राहाया नाहीं, कचित् येतो '; आणि श्रीसमर्थप्रतापांतील ही ओवी मला आठवली :

समर्थें चाफळअधिष्ठानीं श्रीराम संस्थापिले।
मग सुंदर मठीं समर्थांचे रहवे जाले।
नाना गिरिकंधरीं दासविहरे निर्मिले।
नाना मठ करविले लोकोद्धारा ॥ स प्र. ७–२

राहवा म्हणजे वस्ती.

पाटणास हि श्री. बाळाभाऊ पेंढारकर यांच्या बरोबर केवळ श्रीमंत पाटणकर जहागीरदार यांच्या कडील कागदपत्रें पाहण्याच्या च विचारानें गेलों होतों. पाटणकरांचें घराणें पहिल्यापासून श्री सांप्रदायिक आहे. श्रीमंत सरदार भीमराव नागोजीराव ऊर्फ भाऊसाहेब पाटणकर याची भेट झाली. त्यांनीं कागदपत्रांची व्यवस्था फार उत्कृष्ट ठेवलेली आहे. निवडक कागद एक पेटीभर व अलीकडील कागदांचे सुमारें चारशें रुमाल आहेत. निवडलेल्या कागदांची फेरिस्त केलेली आहे ती पाहिली व प्रत्यक्ष कांहीं कागद हि पाहिले, त्यावरून कागदपत्रांचें स्वरूप सामान्यपणें लक्षांत आलें. सर्व कागद प्रत्यक्ष पाहून निवडून नकलण्यास महिना पंधरा दिवस सहज पाहिजेत. पुढें येण्याचें ठरवून कऱ्हाडावरून कासेगांवीं गेलों. कऱ्हाडास थांबलों नाहीं. सांप्रदायिकाच्या दृष्टीनें पाटणास एक ठिकाण महत्त्वाचें आहे. पाटणास मारुतीचें जुनें स्थान आहे. हेळवाकवरून चाफळाकडे किंवा चाफळाकडून हेळवाककडे जातां येतां श्रीसमर्थ या स्थानीं विश्रांति घेत. तें पाहिल्या वांचून कोणीं हि पाटण सोडूं नये. कासेगांव हें बळवंतराव कासेगांवकर वैद्य यांचें राहण्याचें ठिकाण होय. परमार्थाची तळमळ व परोपकाराची आवड असलेली जी थोडी फार मित्रमंडळी श्रीसमर्थकार्यांत मदत करीत असतात, त्यांत बळवंतरावांची गणना होते. उंबरज, मसूर, शिराळें, इसलामपूर, बाळवें व फलटण या ठिकाणीं ते मुद्दाम मदतीस आले होते ते बरोबर असल्यामुळें निधी गोळा करण्याचें काम मजवर फारसें पडलें नाहीं. त्यांनी मजवर फक्त प्रवचनापुरती जबाबदारी टाकून मजला संशोधनार्थ मोकळें सोडावें. कासेगांवाहून प्रथम थेट

शिराळें येथें गेलों व मग इसलामपुरास आलों. श्रीसंप्रदायांत शिराळें हें एक महत्त्वाचें ठिकाण आहे. श्रीसमर्थस्थापित अकरा मारुतीस्थानांपैकीं हें, एक स्थान होय. इतर ठिकाणांपेक्षां येथील मारुतीचें देवालय मोठें आहे, श्रीसमर्थशिष्य नीलंग्याचे आण्णाप्पा हे मूळचे शिराळ्याचे राहणारे होत,

आण्णाप्पांची व नीलंगे मठाची हकिकत सांप्रदायिक विविध विषय, द्वितीय खंड, विषयांक ७६, यांत आली आहे. त्या वेळीं, आण्णाप्पा हे शिराळ्याचे राहणारे होते, ही गोष्ट लक्षांत आली नव्हती. त्या विषयांकांत आण्णाप्पांची आरती दिली आहे, तिचे पाठ चुकले आहेत.

सुरवाल श्रीयाल करवीरापासी ॥

असा पाठ तेथें दिलेला आहे, त्या ऐवजीं

सुखआलय श्रीआलय करवीरापासी ॥

असा पाठ पाहिजे होता, ' श्रीआलय ' याचा च अपभ्रंश ' श्रीयाल ' दिसतो व ' श्रीयाल ' चा ' शिराळें. ' हें पूर्वी लक्षांत न आल्यामुळें श्रीसमर्थप्रतापांत २०-११ त ' श्रीआळय ' म्हणजे चाफळ असा चुकीचा अर्थ केलेला आहे.

आण्णाप्पांच्या परंपरेंतील एक घराणें आजमितीस हि शिराळ्यास आहे. त्यांच्या संग्रहीं आण्णाप्पांची मेखळा व शक १६९६ तील ग्रन्थराजाची एक प्रत आहे. मारुतीच्या पुढील शेतांत जयरामांची म्हणून एक समाधी आहे. हे जयराम कोण याविषयीं खात्री नाहीं. ते श्रीसमर्थांचे च शिष्य होते, अशी शिराळेकरांची समजूत आहे. त्यांच्या परंपरेंतील एक वृद्ध स्त्री शिराळ्यास उरली आहे. तिच्या कडून कांहीं निवळ गळाठा मिळाला आहे. तो सवडीनें पाहून कांहीं निर्णय करतां आला तर पुढें पाहू. समाधीमंदिराची फार अनास्था आहे. समाधीमंदिरावर पिंपळाचीं झाडें खुशाल वाढूं दिलेलीं आढळलीं! आस्था, सावधानता, शिस्त हीं ज्या संप्रदायाचीं एके काळीं प्रमुख लक्षणें होतीं, त्यांत आज इतका निष्काळजीपणा पहावयास सांपडावा, हा काळाचा महिमा होय. शिराळेकरांनीं त्या मंदिराकडे थोडेंसें लक्ष पुरवावें, अशी प्रार्थना आहे.

शिराळ्यास एका अपूर्व, प्रेक्षणीय, पूजार्ह वस्तूचा लाभ झाला. आण्णाप्पांच्या परंपरेंतील घराण्यांतून आलेली ग्रन्थराजाची एक अत्यन्त सुंदर, सुबक, मनोहर प्रत मिळाली . ती मी ज्या ज्या निकट मित्रांना दाखविली ते तिचें कौतुक च करीत राहिले. प्रतीची लांबी ६ " इंच, रुंदी २¾ " व उंची २½ " आहे. प्रत्येक पृष्ठावर सरासरी नऊ नऊ ओळी आहेत. अक्षरांकडे पहाणाराला हेवा उत्पन्न व्हावा, इतकें तें सुंदर आहे. १९ व्या दशकाच्या पहिल्या समासांतील सर्व लक्षणें या प्रतीला लागूं पडतात. प्रत तत्कालीन आहे याबद्दल मला शंका नाहीं व जो पाहील त्यास राहणार नाहीं. पण दुर्दैव असें

फॉ, प्रतीच्या शेवटीं शकाचा उल्लेख नाहीं, किंवा लेखकाचें नांव नाहीं। ती आण्णाप्पांच्या च हातची असावी, असें केवळ माझ्या आग्रहामुळें मनानें घेतलें आहे. आण्णाप्पांच्या हातची प्रत नीलंगे मठांत असल्याचा उल्लेख विषयांक ७६ त आहे च , तेव्हां ही प्रत त्यांचे च हातची आहे किंवा नाहीं , याचा निर्णय पुढें मागें करतां येईल.

शिराळें हें जुनें ठिकाण आहे. तेथें संशोधनास पुष्कळ वाव आहे., निवांतपणीं पुन्हां एकदां तेथें गेलें पाहिजे. शिराळ्यास मदत मिळविण्याचे वगैरे कामीं तरुणमित्रमंडळानें व रामचंद्र हणमंत देशपांडे आणि हरी मारुती देशपांडे यांनीं, ऊन तहान न पाहतां, फार मेहनत घेतली.

इसलामपुरास श्री. नारायणराव पाटणकर, वकील, गोविंदराव सागांवकर, वकील व डॉ. भाऊसाहेब वैद्य यांच्या खटपटीनें वर्गणी जमली. शिराळें व इसलामपुर या दोन्ही ठिकाणीं बोरगांवचे श्री. केशव महाराज ऊर्फ श्रीसमर्थदास बरोबर होते. त्यांच्या समवेत इसलामपुराहून बोरगावीं रात्रीच्या मुक्कामाला गेलों. बरोबर इसलामपुरचे निशाणंत विनायकराव शिराळकर आले होते. रात्रीं च चिटणीसांकडे संशोधन झालें. चिटणीसांचें घराणें श्रीसांप्रदायिक होत. श्रीशिवछत्रपतीपासून तों स्वराज्याच्या अखेरपर्यंत लेखनाचें काम त्यांच्या कडे असे. तें त्या घराण्यांतील मंडळींचें अजून हि सुटलें आहे, असें म्हणवत नाहीं. त्यामुळें या घराण्यांत संशोधकाना नेहमीं च वाव मिळत राहणार. त्याप्रमाणें बोरगावीं रात्रीचा माझा मुक्काम वाया गेला नाहीं. रात्रींच्या एक दोन वाजे-पर्यंत ज्या चिटणीसांनीं मजसाठीं जागरण करून तत्परतेनें कागदपत्रें दाखविलीं त्याचे मजवर फार उपकार झाले आहेत. मिळालेल्या कागदपत्रांचा परामर्ष यथावकाश पुढें घेऊं. सकाळीं कृष्णेचें स्नान घडलें. श्रीसमर्थदासांनीं गेल्या चैत्र शुद्ध ९ स स्थापिलेल्या श्रीसमर्थमूर्तीचें दर्शनसुख अनुभवून लागलीं च वाळव्यास गेलों. बरोबर श्रीसमर्थदास व विनायकराव होते.

वाळवें येथें संशोधनक्षेत्र फार मोठें आहे.

> समर्थगुरुदेवें कृष्णातीरीं।
> रामचंद्रनामा तपस्वी ऐकिला सिध्देश्वरीं।
> रामथें त्यासी दर्शन दिधलें कृपेंकरीं।
> वाल्मीकग्रामीं अरुणोदईं॥ स. प्र.१८-५

हें वाल्मीकग्राम म्हणजे च वाळवें. वाळव्यास कृष्णेच्या दुसऱ्या तीरावर

आण्णाप्पांची व नीलंगे मठाची हकिकत सांप्रदायिक विविध विषय, द्वितीय खंड, विषयांक ७६, यांत आली आहे. त्या वेळीं, आण्णाप्पा हे शिराळ्याचे राहणारे होते, ही गोष्ट लक्षांत आली नव्हती. त्या विषयांकांत आण्णाप्पांची आरती दिली आहे, तिचे पाठ चुकले आहेत.

सुखवाल श्रीयाल करवीरापासी ॥

असा पाठ तेथें दिलेला आहे, त्या ऐवजीं

सुखआलय श्रीआलय करवीरापासी ॥

असा पाठ पाहिजे होता, ' श्रीआलय ' याचा च अपभ्रंश ' श्रीयाल ' दिसतो व ' श्रीयाल ' चा ' शिराळें. ' हें पूर्वी लक्षांत न आल्यामुळें श्रीसमर्थप्रतापांत २०-११ त ' श्रीआळय ' म्हणजे चाफळ असा चुकीचा अर्थ केलेला आहे.

आण्णाप्पांच्या परंपरेंतील एक घराणें आजमितीस हि शिराळ्यास आहे. त्यांच्या संग्रहीं आण्णाप्पांची मेखळा व शक १६९६ तील मन्यराजाची एक प्रत आहे. मारुतीच्या पुढील शेतांत जयरामांची म्हणून एक समाधी आहे. हे जयराम कोण याविषयीं खात्री नाहीं. ते श्रीसमर्थांचे च शिष्य होते, अशी शिराळेकरांची समजूत आहे. त्यांच्या परंपरेंतील एक वृद्ध स्त्री शिराळ्यास उरली आहे. तिच्या कडून काहीं निवळ गळांठा मिळाला आहे. तो सवडीनें पाहून कांहीं निर्णय करतां आला तर पुढें पाहू. समाधीमंदिराची फार अनास्था आहे. समाधीमंदिरावर पिंपळाचीं झाडें खुशाल वाढूं दिलेलीं आढळलीं! आस्था, सावधानता, शिस्त हीं ज्या संप्रदायाचीं एके काळीं प्रमुख लक्षणें होतीं, त्यांत आज इतका निष्काळजीपणा पहावयास सांपडावा, हा काळाचा महिमा होय. *शिराळेकरांनीं त्या मंदिराकडे थोडेंसें लक्ष पुरवावें, अशी प्रार्थना आहे.*

शिराळ्यास एका अपूर्व, प्रेक्षणीय, पूजार्ह वस्तूचा लाभ झाला. आण्णाप्पांच्या परंपरेंतील घराण्यांतून आलेली *मन्यराजाची* एक अत्यन्त सुंदर, सुबक, मनोहर प्रत मिळाली . ती मीं ज्या ज्या निकट मित्रांना दाखविली ते तिचें कौतुक च करीत राहिले. प्रतीची लांबी ६ " इंच, रुंदी २३/४ " व उंची २१/२ " आहे. प्रत्येक पृष्ठावर बरोबरी नऊ नऊ ओळी आहेत. अक्षरांकडे पहाणारांला हेवा उत्पन्न व्हावा, इतकें तें सुंदर आहे. १९ व्या दशकाच्या पहिल्या समासांतील सर्व लक्षणें या प्रतीला लागूं पडतात. प्रत तत्कालीन आहे याबद्दल मला शंका नाहीं व जो पाहील त्यास राहणार नाहीं. पण दुर्दैव असें

कीं, प्रतीच्या शेवटीं शकाचा उल्लेख नाहीं, किंवा लेखकाचें नांव नाहीं! ती आण्णाप्पांच्या च हातची असावी, असें केवळ माझ्या आशाळभूत मनानें घेतलें आहे. आण्णाप्पांच्या हातची प्रत नीलंगे मठांत असल्याचा उल्लेख विषयांक ७६ स आहे च, तेव्हां ही प्रत त्यांचे च हातची आहे किंवा नाहीं, याचा निर्णय पुढें मागें करतां येईल.

शिराळें हें जुनें ठिकाण आहे. तेथें संशोधनास पुष्कळ वाव आहे. निवांतपणीं पुन्हां एकदां तेथें गेले पाहिजे. शिराळ्यास मदत मिळविण्याचे वगैरे कामीं तरुणमित्रमंडळानें व रामचंद्र हणमंत देशपांडे आणि हरी मारुती देशपांडे यांनीं, ऊन तहान न पाहतां, फार मेहनत घेतली.

इसलामपुरास श्री. नारायणराव पाटणकर, वकील, गोविंदराव सागांवकर, वकील व डॉ. भाऊसाहेब वैद्य यांच्या खटपटीनें वर्गणी जमली. शिराळें व इसलामपुर या दोन्ही ठिकाणीं बोरगांवचे श्री. केशव महाराज ऊर्फ श्रीसमर्थदास बरोबर होते. त्यांच्या समवेत इसलामपुराहून बोरगावीं रात्रीच्या मुक्कामाला गेलों. बरोबर इसलामपुरचे निष्ठावंत विनायकराव शिराळकर आले होते. रात्रीं च चिटणीसांकडे संशोधन झालें. चिटणीसांचीं घराणीं श्रीसांप्रदायिक होत. श्रीशिवछत्रपतीपासून तों स्वराज्याच्या अखेरपर्यंत लेखनाचें काम त्यांच्या कडे असे. तें त्या घराण्यांतील मंडळींचें अजून हि सुटलें आहे, असें म्हणवत नाहीं. त्यामुळें या घराण्यांत संशोधकांना नेहमीं च खाद्य मिळत राहणार. त्याप्रमाणें बोरगांवी रात्रींचा माझा मुक्काम वाया गेला नाहीं. रात्रींच्या एक दोन वाजे पर्यंत ज्या चिटणीसांनीं मजसाठीं जागरण करून ततेतेनें कागदपत्रें दाखविलीं त्यांचे मजवर फार उपकार झाले आहेत. मिळालेल्या कागदपत्रांचा परामर्ष यथावकाश पुढें घेऊं. सकाळीं कृष्णेचें स्नान घडलें. श्रीसमर्थदासांनीं गेल्या चैत्र शुद्ध ९ स स्थापिलेल्या श्रीसमर्थमूर्तीचें दर्शनसुख अनुभवून लागलीं च वाळव्यास गेलों. बरोबर श्रीसमर्थदास व विनायकराव होते.

वाळवें येथें संशोधनक्षेत्र फार मोठें आहे.

> समर्थगुरुदेवें कृष्णातीरीं।
> रामचंद्रनामा तपस्वी ऐकिला सिध्देश्वरीं।
> रामथें तयासी दर्शन दिधलें कृपेंकरी।
> वाल्मीकग्रामीं अरुणोदईं ॥ स. प्र. १८–५

हें वाल्मीकग्राम म्हणजे च वाळवें. वाळव्यास कृष्णेच्या दुसऱ्या तीरावर

थिरगांवच्या हद्दींत सिद्धेश्वराचें पुरातन स्थान आहे. दोन दिवस आणि दोन रात्र वाळव्यास राहून एक क्षण वाया न दवडतां संशोधन केलें तरी तें पुरें झालें नाहीं. देशपांड्यांचीं दोन तीन घरें, दप्तरांचें घर, पुराणिकांचें घर, कुळकर्ण्यांचीं घरें, श्रीरामदासी मठ, इतक्या ठिकाणीं संशोधन झालें. कांहीं ठिकाणचे कागद मिळाले व कांहीं ठिकाणचे या खेपेस जरी मिळाले नाहींत, तरी पुढें मिळतील. वाळव्याहून कांहीं महत्त्वाचीं कागदपत्रें यापूर्वी च आप्पासाहेब रणदिवे यांनीं आणलीं होतीं व आतां जीं मिळालीं त्यांत वीस पंचवीस श्रीशिवकालीन आहेत. वाळवे येथील श्रीरामदासी मठाची हकिकत पूर्वीं श्री सां. वि. विषय, द्वितीय खंड, विषयांक ८६ यांत कोणा अनुचरानें लिहून पाठविलेली प्रसिद्ध च आहे. वाळव्याचे श्रीमंत आप्पासाहेब थोरात दिनकरराव यांची स्वारी परगांवीं गेलेली असल्यामुळें त्यांची मात्र भेट झाली नाहीं. देशपांडे, कुळकर्णी, देशिंगकर, वगैरे मंडळींनीं मनःपूर्वक सर्वतोपरी सहाय्य केलें. वाळव्यास संशोधनकार्य मात्र अजून पुष्कळ शिल्लक राहिलें आहे.

तिसरे दिवशीं तिसरा प्रहरीं वाळव्याहून निघून किर्लोस्करवाडीस रात्रीचा मुक्काम करून व दुसरे दिवशीं सकाळीं तो अजस्र कारखाना पाहून श्रीसमर्थदास थोरगांवीं परत गेले व मी आणि कासेगांवकर वैद्य आगगाडीनें लोणंदास जाऊन तेथून फलटणास सायंकाळीं पोंचलों.

फलटण हें एक चिमुकलें पण प्रगतिपर संस्थान आहे. संस्थानाधिपति श्रीमंत मालोजीराव मुधोजीराव ऊर्फ नानासाहेब नाईक निंबाळकर हे एक थोर मनाचे उदार राजे आहेत. दक्षिणमहाराष्ट्रांतील कित्येक भेद पदवीच्या लोकांस ज्या एका संकुचित व आत्मघातकी वृत्तीनें पछाडलेलें आढळतें तिचा श्रीमंत नानासाहेबांच्या मनाला स्पर्श हि झालेला नाहीं.

वाड्याला लागून च असलेल्या श्रीराममंदिरांत दोन दिवस प्रवचनें झालीं. दोन्ही प्रवचनांना हजर राहून श्रीमंतांनीं श्रीसमर्थकार्याविषयीं आपलें अगत्य दर्शविलें. श्रीसमर्थमंदिरास त्यांनीं रुपये शंभर तर अर्पण केले च, पण सत्कार्योत्तेजक सभेचा आजपर्यंतचा व्याप व आर्थिक स्थिति परभारें जाणून घेऊन सभेच्या कार्याविषयीं आपली सहानुभूति व्यक्त करण्यासाठीं सभेला म्हणून त्यांनीं आणखी निराळे शंभर रुपये दिले. या देणगीबद्दल सभा श्रीमंतांची ऋणी आहे.

फलटण हें पुरातन शहर दिसतें. एक गांवांत च व दुसरें गांवाबाहेर

अशी दोन जुनी देवालयें आहेत. तीं हजार दीड हजार वर्षांमागच्या संस्कृतीचा इतिहास सांगत आहेत. बाहेरील देवालयाची पडझड फार झालेली आहे. त्याच्या रक्षणाची कांहीं तरी योजना झाली पाहिजे. तसें च हें संस्थान श्रीशिवपूर्वकालीन असल्यामुळें संस्थानांत जुन्या वस्तु बऱ्या च असाव्यात. त्यांच्या रक्षणार्थ फलटण येथें एक पुराणवस्तुसंग्रहालय (Museum) अवश्य असावें. फलटणचा इतिहास आपण मागें एकवार लिहविला होता, पण तो बहुधा दंतकथांच्या च स्वरूपाचा असल्यामुळें आपण तो छापविला नाहीं, असें श्रीमंतांनीं सांगितलें. श्रीमंतांना माझी सूचना कीं, 'फलटणच्या इतिहासाचीं साधनें' ह्मणून अस्सल कागदपत्रांचा एकाद दुसरा भाग त्यांनीं प्रथम छापून काढवावा, ह्मणजे पुढें त्या आधारें इतिहास लिहिणारा इतिहास लिहील. Executive Council व Legislative Council स्थापून संस्थानानें जशी राजकीय बाबतींत प्रातिनिधिक स्वरूपाची सुधारणा केली आहे, त्याप्रमाणें 'संस्थानचा आत्मा' ह्मणजे त्याचा इतिहास होय, हें जाणून त्या इतिहासाची व इतिहाससाधनांची जोपासना श्रीमंतांनीं अवश्य करावी.

संशोधनास मला सवड झाली नाहीं. जेवढें यदृच्छेनें पहावयास व ऐकावयास सांपडलें तेवढ्यावरून मला आनंद वाटला. फलटण हें मानभावपंथाचें एक केंद्र दिसतें. येथें त्या पंथाचे एक दोन मठ आहेत. मठांत व मठाबाहेर पंथाचा ग्रन्थसंग्रह असला च पाहिजे. शोधिला पाहिजे.

संस्थानचे दिवाण श्री. बापुसाहेब गोडबोले व त्याचे परसनल असिस्टंट श्री. तेरेदेसाई मास्तर साहेब यांनीं मजसाठीं फार श्रम घेऊन मला उपकृत करून ठेवलें आहे. उरलेलें काम पुरें करण्यासाठीं कासेगांवकर वैद्यबुवांना फलटणास च मागें ठेवून मी ता. २५ रोजीं रात्रीं प्रवचनानंतर लागलीं च लोणंदस्टेशनवर गेलों व या अंकाचे तयारीसाठीं येथें आलों.

धुळें — वैशाख शुद्ध १३ (२०-४-२१)

## ( १४२ )

## श्रीसमर्थप्रतापाची आवृत्ति

संशोधन होऊन जें श्री सांप्रदायिक वाङ्मय नव्यानें प्रकाशांत आलें, त्यांत श्रीसमर्थप्रताप ग्रन्थाची योग्यता विशेष होय. श्रीसमर्थचरित्रांत या ग्रन्थानें पुष्कळ नवीन भर टाकली, इतकें च नव्हे, तर संशोधनाला चालना देऊन संशोधनाचे नवीन नवीन प्रांत संशोधकांच्या दृष्टिपथांत आणले. निंदकाच्या निंदेला हि या ग्रन्थानें थोडें निमित्त पुरविलें. जो प्रेमळ कथाभाग वाचून भक्ताचें अंतःकरण भक्तिप्रेमानें उचंबळून येऊन नेत्रावाटें प्रेमाश्रु व मुखावाटें

समर्थदेवा सद्गुरुरामा । परम पुरुषा पूर्णकामा ।
श्रीगुरुभजन न घडे आम्हां । गुरुभक्तांचीं धन्य जिणीं ॥

असले धन्योद्गार बाहेर पडावे, नेमका तो च कथाभाग पाहून निंदकाच्या *निंदेला भरतें यावें, याची उपपत्ति कशी लावावी ? असो, हा ज्याचा त्याचा* अधिकार आहे.

प्रतापाची पहिली आवृत्ति शके १८३४ त निघाली व ती केव्हां च संपली. आतां त्याची दुसरी व सर्वांगसुंदर आवृत्ति काढावयाची आहे. पहिल्या आवृत्तीची प्रस्तावना कायम ठेवून शिवाय नवीन माहितीची नवीन प्रस्तावना द्यावयाची आहे. पहिल्या आवृत्तींत, श्रीसमर्थ, श्रीक्षेत्र चाफळ व श्रीसमर्थसमाधि अशीं तीन च चित्रें दिलीं आहेत, तर दुसऱ्या आवृत्तींत आणखी किती तरी नवीन चित्रें देण्याचें मनांत येत आहे. नवी योजना झाली म्हणजे ती वाचकांस सादर होईल च. पुन्हां मूळ प्रतीशीं ग्रन्थ ताडून पहावयाचा आहे. नवीन टीपा विपुल द्यावयाच्या आहेत व पूर्वी दिलेल्या तपासावयाच्या आहेत. बऱ्या च शंका आहेत, त्यांचें निराकरण करण्याचा प्रयत्न करावयाचा आहे. त्या कामीं वाचकांचें हि सहाय्य घ्यावयाचें आहे.

अशी ही दुसरी आवृत्ति, श्री क्षेत्र जांब येथील श्रीसमर्थमंदिरांत १८५४ चैत्र शुद्ध ९ स श्रीसमर्थमूर्तिस्थापनेचा जो समारंभ होईल, त्या प्रसंगीं श्रीसमर्थ-चरणीं प्रत्यक्ष अर्पण व्हावी, असा हेतु आहे.

पुढील अंकीं शंकास्थानें नमूद करूं. वाचकांनीं श्रीसमर्थप्रताप ग्रन्थ आणखी एकवार वाचावयास हातीं घ्यावा, अशी विनंति आहे.